प्रकाशक :

**मनोहर यशवंत जोशी**, बी. ए, बी. कॉम.

प्रसाद प्रकाशन,

१८९२, सदाशिव पेठ, पुणे ३०

• • •

प्रकाशन :

**विजया दशमी**

**शके १८९३**

• • •

**मूल्य रु. ६**

• • •

मुद्रक :

**अ. वि. पाटील,**

विशाल सह्याद्रि प्रेस,

सह्याद्रि सदन, टिळक रोड,

पुणे ३०.

# प्रेम रुळतसे बोलतां

भारतभू दैवी समृद्धिनें समृद्ध आहेच, परंतु आसुरी संपत्तीच्या झगझगाटामध्यें तें तेज थिटे वाटूं लागले आहे. चार दिवसांची ही आसुरी संपत्ती चिरंतन सुख देणार नाहीं हें उघड आहे, तरीपण आजच्या मानवाला केवळ बाहेरचा झगझगाट मात्र दिसतो आणि तेच आपलें वैभव असें मानून तो या जगांत वावरतो. ज्यावेळीं कोणतीही आसुरी संपत्ती मानवाला समाधानाचं पाथेय देत नाहीं तेव्हां तो तिच्या व्यतिरिक्त वैभवाचा किंचितसा विचार करूं लागतो. तेव्हा त्याला कळून येते कीं आसुरी संपत्ती सुद्धां दैवी संपत्तीचें कवच आहे. ते दूर करतां आलें तर मानवी जीवन दैवी वैभवानें भरून जाईल. हें आसुरी कवच कसें उकलावयाचें आणि दैवी संपत्तीची जवळीक कशी साधावयाची याचा परामर्श घेण्यासाठींच या पुस्ताकाचा उपक्रम आहे. दैवी संपत्तीनें एक मनुष्य जरी समृद्ध बनला तरी अत्यल्प काळांत तो संबंध राष्ट्राचें भवितव्य घडवूं शकेल. राष्ट्राचें चिरंतन वैभव दैवी संपत्तीच्या गुणीजनांवर अवलंबून आहे. ही दैवी संपत्ती ज्या अनेक साधनांतून मिळवितां येते त्यांत स्तोत्र हें एक महान साधन आहे. या स्तोत्राच्या परिपाठानें सर्वसत्ताधीश बनतां येते असा विख्यात अनुभव पूर्वसूरींनी नमूद केला आहे. त्याचें प्रत्यंतर सर्वांना सुलभपणें घेतां यावें हा एकमेव उद्देश या पुस्तकाच्या पाठीशीं आहे.

या स्तोत्रांचें खरें सामर्थ्य त्यांच्या विनियोगांत आहे. " देवता प्रीत्यर्थे जपे विनियोगः । असा जो संकल्प आहे यांतच या स्तोत्राचें सर्व रहस्य आहे. या स्तोत्राच्या जपानें आपली आकर्षण शक्ती वाढत जाते. आपल्या उपास्य देवतेचे तेज आपण या शरीरानें ग्रहण करतो.

शरीर आणि त्या बरोबर आपलें मन तेजोमय बनतें. त्या तेज्यांत पूर्वी प्रत्ययाला न आलेल्या अनेक गोष्टी आपल्या प्रत्ययाला येतात. त्यांच्या अस्तित्वाचा अनुभव येतो. यालाच आपण आपली देवता आपणास प्रसन्न झाली असें म्हणतो. आपल्या या शरीरांत ते देवताचें तेज ग्रहण करण्याची शक्ती आहे हें सांगूनही सामान्य माणसाला पटणार नाही. परंतु अनुभवाची कास धरली तर त्याची सत्यता प्रत्ययाला तेव्हांच येते.

अशी अनेक स्तोत्रें आहेत. त्यांतल्या त्यांत ज्या स्तोत्रांचा पाठ लोक नित्य करतात किंवा ज्यांचा पाठ नित्य करण्याची आवश्यकता आहे अशाच स्तोत्रांचा या पुस्तकांत समावेश केला आहे. ज्यांचा प्रत्यय गोचर झाला त्यांचेच वैभव मी अक्षरांकित केलें आहे. जिज्ञासू साधकांनीं त्याचा अनुभव घ्यावा आणि आजच्या विस्कळित जीवन प्रवाहांत समाधान मिळवावें अशी आग्रहाची प्रार्थना आहे.

प्रसाद सारख्या प्रतिष्ठित मासिकानें या विषयाचा श्रीगणेशा आपल्या १९६९ च्या दिवाळी अंकानीं केला. तो प्रवाह इतका विस्तृत करण्याचें भाग्य मला ज्यांच्यामुळें लाभलें ते प्रसादचे संपादक श्री. मनोहर जोशी, स्तोत्रांचा परिमल कुंचल्यांनीं साकारणारे चित्रकार श्री. सुधाकर खाजगीवाले आणि मुद्रण माध्यमांनीं वाचक आणि मी यांचें प्रेमाचें नातें ज्यांनीं जोडले ते विशाल सह्याद्रीचे अभिनव कारागीर यांचा ऋणभार माझ्या मस्तकीं मी धारण करीत आहे. कारण त्या ओझ्याचें दुःख न वाटतां मला आनंदच वाटत आहे.

शके १८९३
विजयादशमी,
मंगळवार,
दि. २९-९-१९७१.

२३२ ब, शुक्रवार पेठ,
पुणे २.

## क्रमबोधिनी–

# श्री गणेश स्तोत्र

गणेशाचीं अनेक स्तोत्रें आज उपलब्ध आहेत. त्यांतल्या त्यांत हें केवळ आठच श्लोकांचे अल्पसें असें एक स्तोत्र आहे. या स्तोत्राचा विशेष म्हणजे भगवंताचे अत्यंत लाडके भक्त जे महात्मे नारद त्यांनी या स्तोत्राची रचना केली आहे. नारदपुराणांत या स्तोत्राचा समावेश करण्यांत आला आहे. कोणत्याही कार्यांत यशप्राप्ती व्हावी, कोणतेही संकट येऊ नये म्हणून गणपतीचें पूजन प्रथम करतात. गणपतीचें स्तवनही अगदीं प्रथम करतात. या प्रक्रियेमुळें साधकाचे सर्व मार्ग सुलभ होतात. यासाठीं गणेशाची स्तुती करून त्याचा आशीर्वाद प्राप्त करून घ्यावा एवढ्यासाठींच या स्तोत्राची ख्याती आहे. या स्तोत्राला कुठें संकटनाशन गणेशस्तोत्र असेंही म्हणतात.

हें स्तोत्र लहानसें असलें तरी त्याचा परिणाम दिव्य आहे, असा अनुभव आहे. या स्तोत्राचा अभ्यास केला तर आपणांस असें आढळून येईल कीं स्तोत्र म्हणून यात केवळ चारच श्लोक असून उरलेले चार

श्लोक हे त्या स्तोत्रपाठामुळें मिळणारी फलश्रुती कथन करणारे आहेत. हें स्तोत्र असल्यानें तें कसें म्हणावें वगैरे प्रश्न आपोआपच येतात.

ज्याला आपण अंगिकारलेल्या कार्यांत सुलभता यावी, कोणत्याही संकटांचा स्पर्शसुद्धा होऊ नये असें वाटत असेल त्यानें या स्तोत्राचा नित्य पाठ करावा. या स्तोत्राचा पाठ उषःकाली करावा असें सांगितलें आहे. रोज एकवीस वेळां, याप्रमाणें अखण्ड एकवीस दिवस या स्तोत्राचा पाठ नाभिस्पर्श जलांत अथवा वाहत्या पाण्यांत उभे राहून करावा. त्यामुळें हें स्तोत्र त्वरेनें सिद्ध होतें. एकदां स्तोत्र सिद्ध केलें म्हणजे त्याची फलश्रुती त्वरेनें गोचर होऊं लागते. या स्तोत्रात समाविष्ट नसलेली परंतु पुराणांत ज्यांचा समावेश करण्यात आला आहे अशा कांही फलश्रुती या स्तोत्रानें प्राप्त होतात. ज्याला आपलें शरीर तेजोमय किंवा कांतिमान करावयाचें असेल त्यानें शमीच्या वृक्षाखालीं बसून याचा नित्य पाठ करावा. रोज कमीत कमी एकदां तरी याचा पाठ व्हावा. वेळ असेल त्याप्रमाणें ९, ११, १६ किंवा २१ याप्रमाणें या स्तोत्राचे पाठ शमीवृक्षाच्या छायेंत केले तर शरीराला आरोग्य प्राप्त होते. अर्थातच त्यामुळें शरीर कांतिमान बनतें. दुर्वांच्या परिसरांत या स्तोत्राचा पाठ केला तर साधक पुत्रयुक्त होतो, किंवा या स्तोत्राचा पाठ करून दुर्वांचा रस प्राशन केला तर ज्याप्रमाणें शरीर अतिशय कांतिमान होतें त्याचप्रमाणें तो मनुष्य विद्यावान् बनतो. एखाद्याला संतती होत नसेल तर त्याला संतती होते.

मानवी शरीरांत योगप्रक्रियेंत सहा चक्रें कल्पिलेलीं आहेत. त्या चक्रांपैकी अगदीं प्रारंभाचें जें मूलाधार नांवाचें चक्र आहे तें मानवाच्या लिंग आणि गुदद्वार यांच्यामध्यें असलेल्या शिवणीमध्यें आहे. या चक्राला चार पाकळ्या असून त्यावर बीजाक्षरें आहेत. ती बीजाक्षरें

म्हणजे **वं शं षं सं** ही होत. यापैकी कोणत्याही एका अगर सर्व अक्षरांचा जप केला तरी या चक्रास गती प्राप्त होते. या चक्राच्या भोंवतीं जननयोग्य ग्रंथी आहेत. त्या शुद्ध होत जातात. त्यांतील विकृती नाहींशी होते आणि साधकाला जननक्षमता आपोआप प्राप्त होते. ह्या चार बीजांपैकी दोन महत्त्वाचीं बीजें ह्या स्तोत्रांत आलेलीं आहेत. त्यापैकी **वं** हें बीज पुरुषसंततीदायक आणि **शं** हें बीज सर्व मंगलता प्रदान करणारें आहे. **शं** ह्या बीजानें मनुष्य ज्ञानवान होतो तर **वं** या बीजानें साधक सामर्थ्यशील बनतो. या मूलाधार चक्राची देवता गजानन आहे. ज्यावेळीं ही जागा संवेदनाशून्य असते तेव्हा दुर्वेच्या रसानें या जागेला जाणीव प्राप्त होते. गणपतीला दुर्वा आवडतात. इतकेंच नव्हें तर दुर्वांशिवाय त्याची पूजा पूर्ण होत नाहीं असें म्हणतात. दुर्वांच्या परिसरांत राहिल्यानें देखील हें शरीरस्थल शुचिपूर्ण आणि संवेदनाक्षम होतें. या चक्राचा रंग लाल आहे. अर्थात भाविक भक्तांनी गणपतीचा शरीरवर्ण देखील लालच कल्पिलेला आहे. कारण लाल चक्राची देवता अन्य वर्णाची असूच शकणार नाही. हा मूलभूत भाग लक्षांत घेऊनच स्वामी रामदासांनी या स्थळाचें आणि त्या ठिकाणीं एकत्रित झालेल्या वाचा वगैरेंचें वर्णन आपल्या अमोघ वाणीनें केलें आहे. तो श्लोक असा—

**गणाधीश जो ईश सर्वां गुणाचा ।**
**मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा ।**
**नमूं शारदा मूल चत्वार वाचा ।**
**गमू पंथ आनंद या राघवाचा ॥**

या श्लोकावरून मूलारंभ साधकाला कोठे पोहोचवितो याची पूर्ण कल्पना या श्लोकांत दिली आहे. त्यावरून ध्यानांत येईल की पौराणिक, वैज्ञानिक आणि आध्यात्मिक भूमिकांचा आश्रय करून जरी आपण हें स्तोत्र

न्याहाळण्याचा प्रयत्न केला तरी देखील गणपती हीच अग्रपूज्य देवता कां आहे याचा बोध होईल.

प्रस्तुतच्या स्तोत्रांत गणपतीच्या बारा नांवांचा उल्लेख आलेला आहे. या प्रत्येक नांवाला विशिष्ट अर्थ असून त्या त्या नांवाच्या उच्चारानें कशा प्रकारची फलद्रुपता होते याचें वर्णनही त्यांतच अंतर्भूत आहे. इतकेंच नव्हे तर अशी स्थळें देखील या पृथ्वीतलावर आहेत. त्या त्या स्थळी जाऊन या गणेश देवतेची उपासना केल्यास तें तें फळ मिळतें असा श्रेष्ठींचा अनुभव आहे. रामदास स्वामींनी या स्थळांचा शोध घेऊन त्यांची निश्चिती केली आहे.

१. **वक्रतुण्ड** – मद्रास राज्यांत कन्नानूर येथील गणपती वक्रतुण्ड म्हणून प्रसिद्ध आहे.
२. **एकदन्त** – कलकत्ता येथे.
३. **कृष्णपिंगाक्ष** – कन्याकुमारी.
४. **गजवक्त्र** – भुवनेश्वर ( ओरिसा )
५. **लंबोदर** – गणपती पुळे, रत्नागिरीजवळ.
६. **विकट** – हृषीकेश.
७. **विघ्नराजेंद्र** – कुरुक्षेत्र.
८. **धूम्रवर्ण** – ल्हासा, तिबेट.
९. **भालचन्द्र** – धनुष्यकोडी.
१०. **विनायक** – काशी, धुंडीराज.
११. **गणपति** – गोकर्ण महाबळेश्वर–द्विभुज गजानन.
१२. **गजानन** – हिमालयांत पांडुरकेसर, गौरीकुंडाजवळ.

याशिवाय ह्या स्तोत्राची फलश्रुती स्तोत्रातच सांगितली आहे. याप्रमाणें आचरण केल्यास उक्त फलांचा लाभ होतो.

ज्या वेळीं या स्तोत्राची आवर्तनें करावयाचीं असतात तेव्हां शेवटचे चार श्लोक प्रत्येक वेळां म्हणण्यांत येत नाहींत. पहिल्या चार श्लोकांच्या एकवीस आवृत्त्या हाच या स्तोत्राचा नित्य पाठ समजला जातो. असा पाठ सकाळीं, दुपारीं आणि संध्याकाळीं केल्यास साधकाची सर्व विघ्नें दूर होतात आणि त्याला सर्व गोष्टींचा सहजपणे लाभ होतो. जो विद्यार्थी असेल त्यानें सकाळी एकवेळ याचा पाठ करण्यानें तो विद्यावान् होतो; ज्याला धनाची अपेक्षा असेल त्याला धन प्राप्त होते. याप्रमाणें सहा महिनेपर्यंत या स्तोत्राचा जप केला असतां पुत्रप्राप्ती होते. त्याचप्रमाणें मोक्षदायी मार्गांचा आपोआप त्याला लाभ होतो. एक वर्षपर्यंत सतत पाठ केल्यास अष्टसिद्धी आपण होऊन साधकाच्या जवळ वावरूं लागतात आणि त्याचें मनोगत पूर्ण करतात. त्याचप्रमाणें हें स्तोत्र स्वतः लिहून आठ शुचिर्भूत आणि आचारवन्त ब्राह्मणांना आदरानें समर्पण केल्यास गणेशाच्या प्रसादानें सर्व विद्या प्राप्त होतात.

या स्तोत्रांतल्या फलश्रुती साधकाला मिळतात यांत संशय खासच नाहीं. परंतु प्रस्तुतच्या जगांतला जो साधकांचा अनुभव आहे तो मात्र असा आहे कीं साधकाची उपासना कोणत्याही देवतेची असो, त्या देवतेची ओळख साधकाला सहजपणें होत नाहीं. त्यासाठीं त्याला गुरुप्राप्ती व्हावी लागते. अर्थात् गुरु शोधून आपल्याला आवडेल त्याप्रमाणें मान्य करणें हें सद्गुरुचें चिन्ह नव्हे; तर ज्ञानेश्वर महाराज म्हणतात त्याप्रमाणें,

**ऐसी कर्मसाम्यदशा । होय जेथ वीरेशा ।**

**तेथ सद्गुरु आपैसा । भेटेचि गा ।। ( ज्ञाने. १८.९६६ )**

गुरूंची भेट होण्याइतकी शिष्याची किंवा साधकाची तयारी असावी लागते. साधकाच्या तयारीशिवाय गुरूची भेट होत नाहीं;

आणि झालीच तर त्याचा फायदा व्हावा तसा होत नाहीं. गुरूची भेट होण्यासाठी कर्मसाम्यदशा यावी लागते. अर्थातच सामान्य माणसाला या दशेस येणे फारच अवघड असते. परंतु असे निश्चितपणें सांगता येते कीं या स्तोत्राच्या पठनानें साधकाला गुरुमार्गावर त्वरेनें येता येतें. एकदा साधकाने गुरुमार्गाचा अवलंब केला कीं त्याची आणि गुरुची आपोआप भेट होते. त्या भेटीबरोबर साधकाच्या बुद्धीचा मळकटा धुऊन टाकून गुरू आपल्या शिष्याला गुरुपदवीला आणतात. या सर्व दशेचे प्रवेशद्वार म्हणजे हे गणपती स्तोत्र आहे. या स्तोत्राच्या पाठाने त्याला त्या मार्गातील सर्व अडथळे दूर करतां येतात आणि आपोआप त्याला सर्व विद्या प्राप्त होतात. ज्ञानी होण्याच्या मार्गातील सर्व संकटे या स्तोत्रामुळे दूर होतात. म्हणूनच या स्तोत्राला 'संकष्टनाशन गणेशस्तोत्र' असें नांव देण्यात आलें आहे.



# संकष्टनाशनगणेशस्तोत्रम्

**श्रीगणेशाय नमः । नारद उवाच ।**

**प्रणम्य शिरसा देवं गौरीपुत्रं विनायकम् ।**

**भक्तावासं स्मरेन्नित्यमायु:कामार्थसिद्धये ।।१।।**

नारद म्हणाले.

( १ ) भक्तांच्या सर्व इच्छा पुऱ्या करणारा गौरीचा पुत्र विनायक याच्यापुढे मस्तक नम्र करून त्याचे नित्यस्मरण करावें. ( खालील नामाभिधानांनीं )

प्रथमं वक्रतुण्डं च एकदन्तं द्वितीयकम् ।
तृतीयं कृष्णपिङ्गाक्षं गजवक्त्रं चतुर्थकम् ॥२॥

( २ ) पहिले नाव वक्रतुंड, दुसरे एकदंत, तिसरे कृष्णपिंगाक्ष आणि चवथें गजवक्त्र.

लम्बोदरं पञ्चमं च षष्ठं विकटमेव च
सप्तमं विघ्नराजेन्द्रं धूम्रवर्णं तथाष्टमम् ॥३॥

( ३ ) लंबोदर हे पाचवे नांव, सहावे विकट, विघ्नराजेंद्र हे सातवे आणि धूम्रवर्ण हे आठवे आहे.

नवमं भालचंन्द्रं च दशमं तु विनायकम् ।
एकादशं गणपतिं द्वादशं तु गजाननम् ॥४॥

( ४ ) नववे भालचंद्र, दहावे विनायक, अकरावे 'गणपति आणि बारावे गजानन.

द्वादशैतानि नामानि त्रिसंध्यं यः पठेन्नरः ।
न च विघ्नभयं तस्य सर्वसिद्धिकरं प्रभो ॥५॥

( ५ ) या बारा नांवांनी सकाळ, दुपार आणि संध्याकाळ अशा तीन वेळी सर्व सिद्धी देणाऱ्या प्रभूचे जो चिन्तन करतो त्याच्यासमोर कोणतेच विघ्न येत नाही.

विद्यार्थी लभते विद्यां धनार्थी लभते धनम् ।
पुत्रार्थी लभते पुत्रान्मोक्षार्थी लभते गतिम् ॥६॥

( ६ ) विद्येची इच्छा असणाऱ्याला (या योगे) विद्या, संपत्तीची इच्छा असणाऱ्याला धन, पुत्राची इच्छा असणाऱ्याला पुत्रलाभ आणि मुमुक्षुला मोक्ष प्राप्त होतो.

**जपेद्गणपतिस्तोत्रं षड्भिर्मासैः फलं लभेत् ।**
**संवत्सरेण सिद्धिं च लभते नात्र संशयः ।।७।।**

( ७ ) हें गणपती स्तोत्र जो कोणी नित्य पठण करील त्याला सहा महिन्यांत वरील लाभ होईल आणि एक वर्षभर जो कोणी हे स्तोत्र पठण करील त्याला सिद्धी प्राप्त होतील यात संशय नाहीं.

**अष्टभ्यो ब्राह्मणेभ्यश्च लिखित्वा यः समर्पयेत् ।**
**तस्य विद्या भवेत्सर्वा गणेशस्य प्रसादतः ।।८।।**

( ८ ) हे स्तोत्र लिहून आठ ब्राह्मणांना जो कोणी समर्पण करील तो गणपतीच्या प्रसादानें सर्व विद्यावान होईल.

॥ इति श्रीनारदपुराणे संकष्टनाशनगणेशस्तोत्रं संपूर्णम् ॥



# श्रीरामरक्षा स्तोत्र

महर्षी वाल्मिकींनी लिहिलेल्या रामायणाप्रमाणे प्रभुरामचंद्रांचे सर्व चारित्र घडले. त्या रामचंद्रांची पुण्याई इतकी असीम होती की आजच्या काळांतसुद्धां त्याची मर्यादा आहे तशीच आहे. प्रभु रामचंद्रांच्या गांठी अनेक ऋषिवर्यांचे आशीर्वाद यांची रेलचेल होती. त्यामुळे जगांतली सर्व पापें ते स्वतः असतांना कुठे दडून बसली होती याचा ठावठिकाणा सुद्धा नव्हता. परंतु रामचंद्रांच्या अवतारसमाप्तीनंतर मात्र या पापांनीं हळू हळू डोकें वर काढण्यास प्रारंभ केला. त्या वेळी लोक त्या पापांना रामाचे, रामायणाचे भय घालून स्वतःजवळ येऊ देत नसत. पापेंही त्यांना भीत होती. म्हणून रामायणकालांत सर्वपुण्यदर्शनाचा लाभ आपणास होतो. तीनिही भुवनांत रामाच्या चारित्र्याची कीर्ति दुमदुमली. तेव्हां सर्व देव, दानव आणि मनुष्य एकत्र जमले. आपापल्या लोकातील पापमयता नाहीशी करण्यासाठी त्यांनी रामचरित्राची वांटणी करण्याचें ठरविले. तिघांनीही त्याला संमति दिली. पण याची वाटणी बरोबर

झाली पाहिजे आणि ती करणारा निःस्वार्थी असला पाहिजे. असा कोणी असला तरच ही वांटणी बरोबर होईल. सर्वांना बेत पसन्त पडला. पण यासाठी निवड कोणाची करावयाची हा प्रश्न बराच वेळ त्रास देत राहिला. प्रत्येकाचे चरित्र न्याहाळले गेले. सर्व देव, दानव आणि माणसें अपेक्षावान्. अपवाद होता तो फक्त एका शिवांचा. दिगंबर वृत्तीनें राहाणाऱ्या, स्मशानीं वास करणाऱ्या आणि अंगी विभूतीचें मण्डन मिरविणाऱ्या शिवांना मात्र यांच्या वाटणीत कांहीच हेतु नव्हता. त्यांनी या कृतीस मान्यता दिली. तरी पण एक अट शिवांनी सर्वांना घातली. ती अट म्हणजे संपूर्ण रामकथा वाटून त्याचा जो भाग आतां वाटता येणार नाही, याचे आता काय करावयाचे असा प्रश्न जेव्हा निर्माण होईल तेव्हां ते उर्वरित शिवांना देऊन टाकायचे. शिवांनी घातलेल्या अटी सर्वांना मान्य झाल्या. शिव एका उच्चासनावर बसले. त्यांच्यासमोर शतकोटी रामायणाची पाने ठेविली. त्यांच्यासमोर देव, शिवांच्या उजव्या हाताला मानव आणि डाव्या हाताला दानव गर्दी करून बसले. शिवांच्या परिसरांत असणारी भुतावळ शिवाच्या मागें उभी राहिली. काय चालले आहे याचे ज्ञान त्यांना नव्हते. सर्व मंडळी स्वस्थ चित्ताने बसली. शिवांनीं पवित्र प्रणवाचा उच्चार केला आणि पोथीचे पान उचलले. एकं एक पान वाचायचे आणि एकेकाला द्यायचे असा क्रम ठरला होता. देव म्हणाले, आम्ही सर्वश्रेष्ठ आहोत; दानव म्हणाले आम्ही श्रेष्ठ आहोंत. मानव गप्प बसून सर्व काहीं पाहात होते. शेवटी शंकरांनी निर्णय दिला. देव-दानवांनो तुमचा मोठेपणाचा तंटा तुम्ही मिटवा. तोपर्यंत मी हें पान मानवांना देतो. पहिले पान मानवांना दिले. दुसरे दानवांना आणि तिसरें देवांना. याप्रमाणे वाटप सुरू झाले. शतकोटी श्लोकांची वांटणी चालू झाली. प्रत्येकाला सारखें श्लोक मिळू लागले. तेहतीस कोटी, तेहतीस लक्ष, तेहतीस सहस्र, तीनशे, तेहतीस या प्रमाणे

वाटून झाल्यावर अखेर एक श्लोक उरला. त्याची वांटणी चालू झाली. अनुष्टुप छंदाचा एक श्लोक त्याची अक्षरे एकूण बत्तीस. प्रत्येकाला दहा दहा अक्षरें दिली. तीस अक्षरे संपली. दोन अक्षरे राहिली. न वाटता येण्याजोगी अक्षरे ती. यांचे काय करावयाचे असा प्रश्न येऊन पडला. पण भगवान् शिवांच्या अटीप्रमाणे त्याचा निर्णय अगोदरच लागला होता. तीं दोन अक्षरे म्हणजे "राम."

ही दोन अक्षरे म्हणजे सगळ्या रामायणाचे सार आहे. रामकथेतून ही अक्षरें दूर केली तर खाली काही उरणार नाही. इतकी मौल्यवान अक्षरे शिवांनी घेतली. देवांनी आपला वाटा स्वर्गात ठेवला. दानवांनी पाताळी नेला आणि मानवांनी भूलोकी ठेवला. दुसऱ्याच्या भूमीत आपण आपला ठेवा ठेवणं म्हणजे स्वतःला नागवणें आहे. स्वतःजवळ तरी कुठें ठेवणार, ज्यामध्ये 'राम' ही अक्षरें ठेवावींत असे शिवांस कांहींच स्थान आढळले नाहीं. शेवटी त्यांनी ती दोन अक्षरें आपल्या कंठांत ठेविली. कंठ अंतर-बाह्य रामरूपानें नटला. ज्या कंठांत अक्षरे ठेविली होती तो कंठ निळा झाला.शिव म्हणतात हे निळेपण माझें भूषण आहे. त्या वेळेपासून शिवांना नीलकंठ म्हणतात. कर्पूरगौर शिवांच्या कंठी ही मेघनीलता शोभून दिसते. त्यांच्या मूळच्या गौरकांतीवर त्या नीलभूषणाची दीप्ती पसरली.कीं शिवांचे स्वरूप मोहक दिसू लागले. ते रामनामानें नटले, रामकथेनें मोहून गेले, आणि राम चिंतनाने त्यांची समाधी लागली. खऱ्या अर्थाने शिवोऽहं शिवोऽहं असा त्रिभुवनाला साक्षात्कार झाला.

अनाहुत मिळालेल्या रामनामाचे वैभव पाहून ऋषिमुनींचे डोळे दिपले. रामनामाचा शिवांनी जसा ध्यास घेतला आणि ते महादेव झाले त्याप्रमाणे शिवध्यानाने आपणासही रामरूप प्राप्त होईल असा विचार करून अनेकांनी शिवव्रत स्वीकारले. बुधकौशिक हेही असेच एक महान्

ऋषी होते. राम-नामाचा ध्यास त्यांनाही लागला. शिवांना त्यांनी अनेकवार रामनामाची कीर्ती कानी पडावी म्हणून विचारलें. शिवांनी अवमान न करता रामनामाची कीर्ती गाइली पण रामनामातला गूढपणा मात्र कोणालाही सांगितला नाही. तें गूढ होते आणि गूढ राहाणेच योग्य होते. परंतु विश्वाचे कल्याण करणाऱ्या शिवांना तें गूढ हृदयी ठेववेना. अनेक दिवस हे गूढ तसेंच ठेवण्याचा त्यांनी प्रयत्न केला. पण गूढत्वाची तृषा लागलेल्या जनतेची तृषा सारखी वाढत होती. कोणत्या तरी निमित्ताने तें बाहेर यावे असें शिवांना देखील वाटले. शेवटी न राहून त्यांनी शिवव्रत स्वीकारलेल्या बुधकौशिकांना ते सर्व ज्ञान द्यावयाचें ठरविले. अत्यंत गुप्तपणे हें कसे देता येईल याचा पुरेपुर विचार शिवांनी केला. त्यांनी अशी एक वेळ शोधून काढली की आपण हें रहस्य ज्याला सांगायचे त्याच्याशिवाय ते कोणाला कळतां कामा नये, इतकेच नव्हे—असें गुह्यतम ज्ञान सांगण्यासाठी स्वतः शिव आले होते याचेही ज्ञान कोणाला होऊ नये म्हणून त्यांनीं रात्रीची वेळा शोधून काढली. बुधकौशिकांच्या स्वप्नविश्वांत प्रवेश करून त्यांनी त्यांचे केवळ अंतर जागविले आणि आपले गुह्यतम असे रामनाम—वैभव त्यांना सप्रयोग सांगितले. स्वप्नांत ऐकलेले सर्व काही त्यांनी आचरून पाहिले तेव्हा आपण स्वप्नांत जे ऐकले ते सर्व सत्य आहे याची त्यांना खात्री पटली. अनुभवानंदाने तो इंद्रियनिग्रह केलेला ऋषी अक्षरशः नाचूं लागला. त्यांचें मन नाचूं लागलें. अज्ञानी दुःखपीडित जनांत ते वावरू लागले तेव्हा 'त्यांच्या मनाला कळून चुकलं की या दुःखितांचें दुःख दूर करण्यासाठी रामनाम—वैभवाची गाथा लोकांच्या कानी घातली तर या अगाध ज्ञानाचा उपयोग होईल, अन्यथा माझ्या देहावसानाबरोबर हे गुह्यतम ज्ञानही संपुष्टांत येईल. त्यांच्या भावबंधित मनाला स्तोत्राचें गुह्यपण रुचले नाही. त्यांनी ते लोकांना सांगायचे ठरविले. बुधकौशिक ऋषींनी

ते सर्व ज्ञान अक्षरांकित केले, इतकेच नव्हे तर ते गेय केले. सुबोधतेसाठी छंदबद्ध केले. हे सांगतांना बुधकौशिक स्वतः सांगतात—

**आदिष्टवान् यथा स्वप्ने रामरक्षामिमां हरः ।**
**तथा लिखितवान् प्रातः प्रबुद्धो बुधकौशिकः ॥**

भगवान् शिवांनी बुधकौशिकाला स्वप्नांत ज्या प्रकारे ही रामरक्षा सांगितली त्याप्रमाणे प्रातःकाळी जाग्या झालेल्या बुधकौशिकानें ती लिहून काढली.

त्या प्रक्रियेनंतर रामरक्षा लोकांच्या मुखी लागू लागली. लोकांना तिंचे चांगल्या प्रकारे प्रत्यय येऊ लागले. आज तर ती आपले स्थान लोकांच्या अंतरांत पक्के करून बसली आहे. तसे पाहिले तर रामरक्षा म्हणजे केवळ अडतीस श्लोकांचे एक छोटेसे काव्य आहे. परंतु याची रचना मात्र मानवी मनाला मोह पाडणारी आहे. रामरक्षा हे काव्य जरी गीर्वाण भाषेंत असले तरी ते संस्कृत अतिशय सोपे आणि मर्मवेधक आहे. त्यांत जवळ जवळ पांच प्रकारची स्थलयोग्य वृत्ते वापरण्यांत आली आहेत.

रामरक्षा हे स्तोत्र म्हटले की त्याचा कर्ता, त्यांत प्रवेश कसा करावयाचा, त्या स्तोत्राची देवता कोणती याचा उल्लेख रामरक्षेच्यां प्रारंभातच आहे. हा प्रस्ताव समजून घेणे अगत्याचे आहे. त्यासाठी मूळचा प्रारंभ समग्र पाहाणेच इष्ट ठरेल.

( १ ) या स्तोत्राचा कर्ता—

अस्य श्रीरामरक्षास्तोत्रमंत्रस्य बुधकौशिकऋषिः ।

या रामरक्षा स्तोत्ररूपी मंत्राचा कर्ता बुधकौशिक ऋषी आहे.

( २ ) स्तोत्राची देवता–श्रीसीतारामचन्द्रो देवता ।

( ३ ) स्तोत्राचा प्रमुख छंद–अनुष्टुप् छन्दः ।

या स्तोत्रांतील अधिकतर श्लोक अनुष्टुप् छंदांत ग्रथित केलेले आहेत.

( ४ ) स्तोत्रशक्तिः—सीता शक्तिः । या स्तोत्राची शक्ति सीता ही आहे.

( ५ ) कीलक–किल्ली, प्रवेशद्वार असा ढोबळ अर्थ करावा.

श्रीमत् हनुमान् कीलकम् ।

श्री हनुमान हे या स्तोत्रात प्रवेश करण्याचे द्वार आहे.

( ६ ) स्तोत्राचा विनियोग— श्रीरामचंद्रप्रीत्यर्थे जपे विनियोगः ।

श्री रामचंद्रांच्या प्रीतीच्या लाभासाठी या स्तोत्राचा जप करणे म्हणजे त्यांचा विनियोग करणे होय.

जे स्तोत्र पठण करावयाचे ते कोणत्या देवतेचे आहे त्या देवतेचे ध्यान अगदी प्रथम करावे. हे ध्यान कसे करावे हे रामरक्षेच्या प्रारंभीं दिलेले आहे. या देवतेकडे जातांना कोणाच्या मार्फत गेले असता साधकाला त्वरेने देवांचे दर्शन होईल याचा उलगडा कीलक म्हणून केला आहे. मारुती हा रामाचा परमभक्त आहे. अन्य सर्वात रामाला अतीव जवळचा म्हणजे मारुती. म्हणून मारुतीचे साक्षीत्व मान्य करून रामरक्षा स्तोत्राचा प्रयोग म्हणावा.

प्रभू रामचन्द्रांचे साधक दर्शन घेतात. हे दर्शन कसे घ्यावे ? याचा जो सांप्रदाय आहे तो मात्र असा आहे की राममंदिरात जातांच अगदी प्रारंभी दास होऊन उभ्या असलेल्या मारुतीरायांच्या पायाचें आणि मग पुच्छ आणि मुखाचे दर्शन घ्यावे. मारुतीचे दर्शन घेतांना " आम्हांस राम दर्शन घडवा " अशी प्रार्थना त्यांना करावयाची असते. या प्रार्थनेनंतर

त्यांच्याकडे पाठ आणि राम मूर्तीकडे मुख येईल असे उभे राहावे. लक्ष्मण आणि जानकी यांचे अनुक्रमे दर्शन घ्यावे. त्यांनाही तशीच प्रार्थना करावी आणि प्रभूरामचंद्रांचे प्रथम पाय, जानु, कटी, नाभी, वक्षःस्थल, कंठ हनुवटी, मुख, नासिक, नयन आणि मस्तक याप्रमाणे एकेक अवयवाचे दर्शन घ्यावे. सर्व दर्शन पूर्ण झाल्यावर प्रभूंच्या पादस्पर्श प्रसाद तीर्थ घ्यावे असे आहे.

असे दर्शन का करावयाचे तर प्रभू रामाने साधकावर संतोषित व्हावे म्हणून. परंतु आपण जर प्रभूंना विचारलेत की आपण कशाने संतुष्ट व्हाल ? तर त्याचे उत्तर अगदीच अनपेक्षित असे मिळेल. एखाद्या पुत्राची माता ज्याप्रमाणे तिला स्वतःला चांगले म्हणण्यापेक्षां तिच्या पुत्राला चांगले म्हणण्याने सुखावते त्याप्रमाणेच प्रभू त्यांचे जे प्रियजन त्यांच्या गौरवगानानें सुखावतात. ज्ञानेश्वर आपल्या ज्ञानेश्वरीत तर असे म्हणतात की—

**पैं प्रेमळाची वार्ता । जे अनुवादती पांडुसुता ।**
**ते मानू परमदेवता । आपुली आम्ही ।। ज्ञाने. १२**

या वचनाप्रमाणे ईश्वर स्वतःच अशी ग्वाही देतात की जे माझ्या भक्तांच्या कथा वर्णितात त्यांना मी देव समजतो. म्हणून प्रभू रामचंद्रांचें दर्शन घेतांना प्रथम मारुती, लक्ष्मण, जानकी यांची दर्शने घेतल्यावर मग रामांचे दर्शन घेतले असता रामचंद्रांना अत्यंत संतोष होतो. बुधकौशिक स्वतः रामाला वंदन करतांना सुद्धां या तिघांच्या नांवांचा आदराने उच्चार करतात आणि मग रामाचे चरण वंदितात.

**दक्षिणे लक्ष्मणो यस्य वामे तु जनकात्मजा।**
**पुरतो मारुतिर्यस्य तं वन्दे रघुनंदनम् ।। ३१ ।।**

ज्याच्या उजव्या बाजूला लक्ष्मण, डाव्या बाजूला जनकजा जानकी आणि ज्याच्या समोर मारुती आहे अशा रामचंद्राला मी वन्दन करतो.

रामरक्षा याचा अर्थ रामाकडून ज्यायोगे संरक्षण होते असे जे स्तोत्र ते रामरक्षा स्तोत्र होय. परंतु प्रस्तुतचे स्तोत्र हे केवळ स्तोत्र नसून त्या नांवाप्रमाणे स्तुति तर आहेच पण त्याबरोबर मंत्र आणि मंत्रातून साधणारा रक्षाविधि आहे. भगवंताची स्तुति रामरक्षेत भरपूर आहे. परंतु ज्या योगे रामरक्षा हे नाम सार्थ होते असे रामरक्षेत असलेले श्लोक केवळ १२ च आहेत. या बारा श्लोकांतही पहिले सहा श्लोक म्हणजे खरीखुरी रामरक्षा आणि दुसरे श्लोक रक्षाकायार्थ केलेली सदिच्छा आहे. त्यामुळे असे म्हणतां येईल की, एकूण अडतीस श्लोकांपैकी रामरक्षा म्हणून केवळ १/६ भाग आहे. याशिवाय.

| | | |
|---|---|---|
| ( १ ) | राम यथार्थ वर्णन | ४ श्लोक |
| ( २ ) | रामस्तुति | ६ ,, |
| ( ३ ) | फलश्रुति | ६ ,, |
| ( ४ ) | रामायणाची रूपरेखा | ७ ,, |
| ( ५ ) | रामवन्दन | ९ ,, |
| ( ६ ) | रामभक्तस्तुति | १ ,, |
| ( ७ ) | पूर्वसूरीस्तव वंदन | १ ,, |
| ( ८ ) | रामरक्षा रामनाम महती | १ ,, |

याप्रमाणें अन्य श्लोक देखील रामरक्षेत समाविष्ट आहेत. अर्थात् यात काही श्लोक दोन शीर्षकांखाली मोडतात.

रामरक्षेतून स्तुति वगळल्यास, किंवा अन्य स्तुतीचे अथवा वर्णनाचे श्लोक वगळल्यास केवळ सहाच श्लोकांचा विचार रामरक्षा म्हणून करावा लागेल. ते श्लोक म्हणजे :

शिरो मे राघवः पातु भालं दशरथात्मजः ।
कौसल्येयो दृशौ पातु विश्वामित्रप्रियः श्रुती ।
घ्राणं पातु मखत्राता मुखं सौमित्रिवत्सलः ।
जिह्वां विद्यानिधिः पातु कण्ठं भरतवन्दितः ।
स्कन्धौ दिव्यायुधः पातु भुजौ भग्नेशकार्मुकः ॥
करौ सीतापतिः पातु हृदयं जामदग्न्यजित् ।
मध्यं पातु खरध्वंसी नाभिं जाम्बवदाश्रयः ॥
सुग्रीवेशः कटी पातु सक्थिनी हनुमत्प्रभुः ।
ऊरू रघूत्तमः पातु रक्षः कुलविनाशकृत् ।
जानुनी सेतुकृत् पातु जङ्घे दशमुखान्तकः ।
पादौ बिभीषणश्रीदः पातु रामोऽखिलं वपुः ।

या अकरा ओळी म्हणजे खरा रक्षामंत्र होय. हे मंत्र ज्या पद्धतीने दिले आहेत ती बुधकौशिकाची पद्धत मोठी लोभस आहे. रामचंद्राचें नांव घेऊन शरीराच्या प्रत्येक अवयवाचे रामचंद्र रक्षण करो असें प्रार्थितांना अवयवांच्या नांवाबरोबर प्रभू रामचंद्राच्या विशिष्ट नांवाचा विनियोग केला आहे. अर्थात या नामांचा उच्चार करताना संपूर्ण रामायणाची आठवण करून देण्याचें कार्य बुधकौशिकांनी केले आहें. मस्तकापासून पायापर्यंत रक्षणमंत्र म्हणताना रामचंद्रांच्या नांवाचा उल्लेख त्यांना प्रसंगानुरूप लाभलेल्या विशेषणांनीं केला आहे.

शिर म्हणजे मानवी शरीराचा सर्वोत्तम भाग. ज्याचे आपण स्तोत्र गातो ते प्रभू रामचंद्र, शिरोभूषणाप्रमाणे लोकांना आदरणीय असें जें राघवाचें कुल त्या रघु-कुलांत जन्म पावलेले होते. म्हणून "राघवः मे शिरः पातु ।" असे म्हणून रघुकुलभूषण अशा राघवानें सर्वशरी-

रोत्तम अशा माझ्या मस्तकाचे संरक्षण करावें अशी बुधकौशिक प्रार्थना करतात. त्याबरोबरच आपले नशीब म्हणजे आपली पैतृक संपत्ति. ही संपत्ति काय आहे याचे वृत्त भालप्रदेशीं रेखाटलेलें आहे. अशा माझ्या भालप्रदेशाचें रक्षण दशरथाचा पुत्र करो ही प्रार्थना सुस्थळी केली आहे असे वाटते. माता आपल्या एकुलत्या पुत्राकडे मनाची नजर लावून असे आणि राम मातृवचनांत होता. अशा प्रेमभऱ्या नजरेनें कौसल्येनें ज्याला सांभाळले त्यामुळे त्याला कौसल्येय असे संबोधतात असा तो राम आमच्या नेत्रांचें रक्षण करो. विश्वामित्र ऋषींच्या यज्ञसंरक्षणासाठी रामाचें सानिध्य लाभले. त्यामुळे विश्वामित्र त्या रामचंद्रावर अत्यंत खूष झाले. त्याला बला आणि अतिबला या विद्यांचे दान त्यांनी केले. रामांना घेऊन आश्रमांत जाताना सबंध रघुवंशाचा इतिहास आणि अन्य कथा विश्वामित्रांनी रामचंद्रांना सांगितल्या. रामांनी त्या अत्यंत आवडीनें ऐकल्या. त्याप्रमाणे आम्हां मानवांना प्रभुचे चरित्र ऐकण्यास मिळावे म्हणून त्या रामाने आमच्या कर्णद्वयाचे संरक्षण करावें. विश्वामित्राच्या यज्ञाचे रामाने रक्षण केले. विश्वामित्राचा यज्ञ पुरता झाला. असा मख-त्राता राम आमच्या नाकाचें रक्षण करो. बंधु लक्ष्मणाला अत्यंत प्रिय असणाऱ्या रामाने लक्ष्मणाचे जसे रक्षण केलें त्याप्रमाणे आमच्या मुखाचे त्यानें संरक्षण करावे. विश्वामित्राच्या सांनिध्यात असतांना राम लौकिक अर्थाने विद्यावान झाले. ही सर्व विद्या ज्या जिव्हेवर आहे त्या जिव्हेचे संरक्षण प्रभु विद्यानिधि रामचंद्र करोत. राम वनांत आल्यावर नंदी-ग्रामाहून भरत अयोध्येस आला. त्याला सर्व दुःखद वृत्त समजले. त्यानें रामाचा ध्यास घेतला आणि चित्रकूट पर्वतावर रामास भेटण्यासाठी त्यानें प्रयाण केले. रामाला पहातांच भरताचे शब्द कंठात अडकले. रामदर्शनाचा त्याला अपार आनंद झाला. भरतानें रामाच्या गळ्याला मिठी मारली. हिंदी भाषेंत जो ‘ गले लगाना ’ असा वाक्प्रचार आहे

तोच हा आचार. ज्या कंठामध्ये राम राहतो त्या कण्ठाचें रक्षण भरत-वन्दित—भरताकडून वन्दन केल्या गेलेल्या रामचंद्राने करावे. शार्ङ्गधनु धारण करण्याची शक्ती ज्या स्कंधात आहे अशा रामाने माझे स्कंध तसेच सामर्थ्यवान करावेत म्हणजे त्याचे आपोआपच रक्षण होईल. त्याचप्रमाणे शिवधनु मोडण्याचे सामर्थ्य ज्या बाहूंत आहे अशा तऱ्हेचे माझे बाहू हे रामा तूं सबल कर, ज्या हाताने रामाने जानकीचे पाणिग्रहण केले आणि म्हणून ज्याला सीतापती म्हणून संबोधतात अशा रामाने माझे हात सामर्थ्यशील करावेत. जमदग्नी ऋषींचा पुत्र परशुराम विवाहानंतर अयोध्येस परतत असताना हा जामदग्न्य मार्गात आडवा आला. निःक्षत्रिय पृथ्वी करणाऱ्या परशुरामाच्या दर्शनानें राम-परिवारातील सर्व क्षत्रियांचीं हृदये भीतीनें विदीर्ण होऊ लागली परंतु महासामर्थ्यशील रामानें या परशुरामाला जिंकले आणि प्रत्येकाच्या भयकंपित हृदयांत आनंद निर्माण केला. त्याप्रमाणे माझ्या हृदयांत आनंद निर्माण करून त्याचे रक्षण करण्याचे कार्य प्रभू जामदाग्न्याजित् करोत. खर नावाच्या राक्षसाचा वध करणाऱ्या रामानें शरीराच्या मध्य भागाचे रक्षण करावें आणि जाम्बवन्त नांवाच्या अस्वलाला अभयाश्रय देणाऱ्या रामानें माझ्या नाभीचें रक्षण करावें. नाभि-कमलाचे रक्षण म्हणजे वाचा-उगमाचें रक्षण होय. कारण परा वाणीचा उदय नाभीमध्ये होतो. परेतून पश्यंती, पश्यंतीतून मध्यमा आणि मध्यमेतून वैखरी प्रसवते. याप्रमाणे प्रभू रामचंद्र माझ्या वाणीचे स्वामी होऊन ती नियंत्रित करोत. सुग्रीवाचा सखा प्रभू राम तो माझ्या कंबरेचे संरक्षण करो. मारुतीरायांचा स्वामी माझ्या मांड्यांच्या पृष्ठभागाचे रक्षण करो आणि राक्षसांचे कुल निर्दालन करणाऱ्या रघुकुलांत श्रेष्ठतम असणाऱ्या रामानें माझ्या मांड्यांचे संरक्षण करावें. समुद्रावर सेतु बांधणाऱ्या रामाने माझ्या गुडघ्याचे रक्षण करावे. दशमुखान्तक रावण याचा अंत करणारा राम

माझ्या पोटऱ्यांचे रक्षण करो. बिभीषणाला राजैश्वर्य प्रदान करणाऱ्या रामाने माझ्या पायांचे रक्षण करावें. इतकेच काय पण या जगतीं रमविणाऱ्या रामानें माझ्या सकल देहाचें रक्षण करावें.

याप्रमाणे एकेका अवयवाचे रक्षण रामाकडून होवो अशी प्रार्थना साधक करतो. हा सर्व रक्षामंत्र ग्रथित असतांना रामायणांतील प्रसंगांची एक उत्कृष्ट माला स्मरण पुष्पानें बुधकौशिकाने गुंफिली आहे.

" राम हा रघुकुलांत जन्माला आला. तो दशरथात्मज आणि कौसल्येय होता. विश्वामित्राने त्याला आपल्या मखत्राणासाठी नेले त्या वेळीही लक्ष्मणानें त्याला सोडलें नाहीं. विश्वामित्रांनीं त्याला विद्या दिल्याने तो राम विद्यानिधी झाला. सीता-स्वयंवरामध्ये धनुर्भंग करून दिव्यायुध धारण करणारा असा राम झाला. सीतेला वरिल्यामुळें तो सीतापती, परशुरामाला जिंकल्यानें जामदग्न्यजित् झाला. पुढें वनवास चालू झाला. त्यांत खर राक्षसाला ठार मारले, जांबवंताला आपलासा केला, सुग्रीवाशीं सख्य करून राम त्याचा स्वामी बनला आणि त्याच वेळी मारुतीचे राम हे गुरु झाले. रामाने पुढे राक्षसकुलाचा नाश केला पण ह्यापूर्वी समुद्रावर सेतु बांधला. रावणाचा नाश करून त्याचे राज्य बिभीषणाला दिले आणि आपण सर्वांच्या हृदयाला आराम देणारा झाला. " हें झालें सर्व रामायण. या सर्व रामायणाचा आढावा याच श्लोक-पंक्तीत घेतला आहे.

याप्रमाणे या सर्व श्लोकपंक्ती म्हणजे सर्वसंरक्षक मंत्र, सर्व रामायण—स्मरणिका, आणि रामप्रार्थना यांचा त्रिवेणी संगम आहे. या त्रिवेणी संगमांत जो मनापासून अवगाहन करील त्याला सर्व संसारदुःखापासून मुक्त होता येईल. परंतु या स्तोत्राच्या उपासकाने हें स्तोत्र सिद्ध करून घेतलें पाहिजे. म्हणजे या स्तोत्राची प्रचीती त्वरेने

यऊ लागते. हें स्तोत्र सिद्ध करण्याच्या दोन पद्धती आहेत. या दोन्ही पद्धती सविस्तरपणें पुढें दिल्या आहेत.

**रामरक्षा-सिद्धतापद्धति—**

रामरक्षा आज जी प्रचलित आहे ती संपूर्ण पांढऱ्या कागदावर किंवा केतकी पत्रावर साधकाने स्वतःच्या हस्ताक्षरांत लिहून काढावी. ही लिहितांना साधकाचें मुख हिमालयाकडे असावे. यासाठीं कोणत्याही शाईचा उपयोग केला तरी चालेल. परंतु काळी शाई सर्वात चांगली. कागद अथवा भूर्जपत्र यांची लांबी साधकाच्या अकरा अंगुलांइतकी असावी. कागदाला अगर भूर्जपत्राला जे चार कोपरे असतात त्यांतील वायव्य म्हणजे डाव्या हाताचा वरचा आणि आग्नेय म्हणचे उजव्या हाताच्या खालच्या कोपऱ्यांत ‘ श्रीराम ’ ही अक्षरें लिहावीत. उरलेल्या कोपऱ्यांपैकी उजव्या बाजूच्या कोपऱ्यांत पानाचा क्रमांक आणि डाव्या हाताच्या कोपऱ्यांत ॐ असें लिहून मध्ये असणाऱ्या जागेंत अकरा ओळी लिहाव्यात. स्तोत्राला प्रारंभ करण्यापूर्वी श्रीगणेशायनमः । आणि स्तोत्र संपल्यावर तीन वेळां ॐ कार लिहावा. चैत्र, श्रावण, अश्विन किंवा मार्गशीर्ष या महिन्यांच्या पोर्णिमा या कार्यास चांगल्या. यांपैकी कोणत्याही पोर्णिमेच्या दिवशी एका पाटावर तांदुळाचे आसन तयार करून त्यावर ही पोथी ठेवावी. तिची विधीयुक्त पूजा करावी. पूजकांचे मुख उत्तरेस असावे. यथासांग पूजा केल्यावर साधकानें तिचें अकरा वेळा वाचन करावे. याप्रमाणें अकरा दिवस केलें म्हणजे रामरक्षा सिद्ध होते. १२ व्या दिवशी संपूर्ण उपोषण करावें. केवळ फलाहार दूध, पाणी यांशिवाय अन्य काहीही ग्रहण करूं नये, त्यानंतर तेराव्या दिवशीं आसनाच्या तांदुळाचा भात करून त्याचा अन्य पदार्थासमवेत नैवेद्य दाखवावा आणि तो भात स्वतः आणि ब्राह्मण यांनी भक्षण करावा.

त्यानंतर मात्र रोज रामरक्षेचा एक पाठ तरी केला पाहिजे. तरच साधनप्रवाह अनुस्यूत राहातो.

( २ ) यापेक्षां थोडी सोपी अशी रामरक्षा सिद्ध करण्याची पद्धत म्हणजे साधकानें या रामरक्षेचे रोज ११ वेळा पठण करावे. हे पठण करण्याची वेळ कोणतीही असली तरी चालेल; परंतु ती वेळ एकच असावी शक्यतो पहाटेची वेळ सर्वोत्तम. स्नान करून धूतवस्त्र परिधान करावे आणि पूर्वाभिमुख बसून रामरक्षेचे वाचन करावे. वाचतांना एकही उच्चार चुकणार नाही याची दक्षता घ्यावी. अन्यथा स्तोत्रसिद्धतेत व्यत्यय येईल. याप्रमाणे एकूण एकशें एकवीस दिवस पठण केले की रामरक्षा सिद्ध होते.

या एकशें एकवीस दिवसांचा पहिला दिवस चैत्र किंवा अश्विन महिन्यातील शुद्ध नवमी असावी. वाचतांना मध्ये कोणाशीही बोलू नये किंवा आसन सोडू नये. एकही दिवस खण्ड येऊ देऊ नये. कोणत्याही प्रकारे खण्ड पडल्यास पुन्हा प्रारंभापासून सुरवात करावी. या काळांत सर्व सुचिता पाळणे आवश्यक आहे. सुतक आणि रजस्वाला स्पर्श हे साधनेचा संपूर्ण नाश करतात म्हणून ते टाळावेत. अन्यथा त्यांचा विपरित परिणाम होतो. त्याबद्दल साधकाने दक्ष असावे. साधकाने अशा तऱ्हेने रामरक्षा स्वतः सिद्ध केली असे कोणाजवळही बोलू नये.

ज्या साधकाची रामरक्षा अशा प्रकारे सिद्ध झाली त्याने रोज एकदा तरी रामरक्षेचा पाठ करावा.

रामरक्षा कवच धारण करण्याची पद्धती :—

ज्या पुरुषाने रामरक्षा सिद्ध केली त्यालाच हे कवच निर्माण करता येते. ज्या माणसाला अनेकवार अपघात होतात, किरकोळ रोगांच्या तक्रारी सारख्या चालू असतात, घरांत सदैव असमाधान असते, काहीही

करू नये असे वाटते, लहान मुलांना सारखी दृष्ट लागते किंवा त्याची अन्नावरील वासना नाहीशी होते, शरीराची वाढ होण्यासाठी दिलेल्या औषधांचा उपयोग होत नाही अशा व्यक्तींना कायमचे कवच तयार करून देता येते.

ज्या व्यक्तीवर हे कवच करावयाचे असेल त्याने शुभ्र वस्त्रे परिधान करावीत आणि एका आसनावर बसावे. कवच करणाऱ्याने देखील पवित्र मनाने या व्यक्तीच्या सन्निध आसनावर बसावे. गोंवरीची शुद्ध रक्षा किंवा भस्म हाती घ्यावे. जवळ एक उदबत्ती लावून ठेवावी किंवा धूप घालून ठेवावा. दोघांनीही प्रभू रामचंद्राचे स्मरण करावे.कवच करणाराने प्रारंभापासून रामरक्षा म्हणण्यास प्रारंभ करावा. ध्यान-श्लोक संपेपर्यंत हातांतील विभूती चिमटीने चूर्णावी. ध्यानश्लोक संपल्यावर ती विभूती एका पानावर ठेवावी. पहिले तीन श्लोक पूर्ण झाल्यावर ज्या व्यक्तीवर हे कवच करावयाचे त्या व्यक्तीनें स्वतः किंवा कवचकाराने त्यातील थोडी थोडी रक्षा हाती घेऊन या पुढील श्लोकांचा प्रत्येक चरण तीन वेळा म्हणून त्या त्या अवयवांना ती विभूती लावावी.

उदा० **शिरो मे राघवः पातु** हा मंत्र तीन वेळा म्हणून या व्यक्तीच्या मस्तकाला विभूती लावावी.

याप्रमाणे प्रत्येक अवयवाला ती विभूती लावावी आणि अगदी अखेर **पातु रामोऽखिलं वपुः ।** असें म्हणून विभूतीचा हात सर्वांगावरून फिरवावा. कवचकाराने पुढील रामरक्षा म्हणण्यास शांतपणे सुरवात करावी आणि दुसऱ्याने ती एकाग्र मनाने हात जोडून ऐकावी. रामरक्षेतील राम रामेति हा अगदी अखेरचा श्लोक तीन वेळा म्हणावा. दोघांनीही प्रभुरामचंद्रास वन्दन करावे आणि आसन सोडावे.

हें कवच करीत असतां तीनपेक्षा अधिक माणसें असतील अशा

स्थळी ते करू नये. कवच केल्यावर विभूती झाडून टाकू नये. ती अंगावर राहू द्यावी.

या कवच्याप्रमाणें लहान मुलांना दृष्ट लागली असतां अंगारा करून देता येतो. रामरक्षा म्हणणाऱ्याने पानावर विभूती घ्यावी. समोर उदबत्ती अथवा धूप जाळत ठेवावा. विभूती चिमटीने कुस्करीत रामरक्षा म्हणण्यास प्रारंभ करावा. यापूर्वी त्या मुलाचें नाक्षत्रनाम मनांत म्हणून "अस्य बालकस्य दोषहरणार्थम् । किंवा या बाळाची दृष्ट दूर व्हावी म्हणून" असा संकल्प करून मग रामरक्षा म्हणावी. बालकास दृष्ट लागली असेल तर म्हणणाऱ्यास जांभया येण्यास प्रारंभ होतो. तशा जांभया येऊ लागल्यास रामरक्षेतील शेवटचा श्लोक तीन वेळ म्हणावा. रामरक्षा म्हणून झाल्यावर त्या विभूतीस नमस्कार करावा आणि रामनाम घेत बालकाला ती विभूती मस्तकी लावावी. शिल्लक उरलेली विभूती बाहेर जाऊन फुंकरून टाकावी.

कवच्याप्रमाणे रामरक्षा म्हणून रक्षाबंध दोरा देखील तयार करता येतो. काळा रेशमी गोफ घेऊन त्याला उदबत्तीच्या धुरावर क्षणभर धूपवावा आणि उजव्या हाताच्या मुठीत तो धरून ठेवावा. कवच्याच्या वेळी ज्याप्रमाणे रामरक्षा म्हणावी असे सांगितले आहे त्याप्रमाणेच रामरक्षा म्हणावी. नंतर तो दोरा लहान मुलाच्या हाताने हव्या त्या व्यक्तीच्या कंठात, डाव्या दंडात किंवा डाव्या मनगटात बांधवावा. त्यायोगे कवचाचे सर्व फायदे मिळतात. हा दोरा कमीत कमी १२१ दिवस शरीरावर राहिल्यानंतर तुटला किंवा काढून टाकला तरी चालेल.

संपूर्ण रामरक्षा म्हणजेच एक महान मंत्र आहे. तरीही विशिष्ट हेतूने विशिष्ट श्लोकांचा मंत्र म्हणून जप केला असता त्यांना विशेष महत्व प्राप्त होते. असे रामरक्षेचे एकूण पांच श्लोक आहेत.

रामो दाशरथिः शूरो लक्ष्मणानुचरो बली ।
काकुस्थः पुरुषः पूर्णः कौसल्येयो रघूत्तमः ॥१॥

वेदान्तवेद्यो यज्ञेशः पुराणपुरुषोत्तमः ।
जानकीवल्लभः श्रीमानप्रमेयपराक्रमः ॥२॥

रामाय रामभद्राय रामचन्द्राय वेधसे ।
रघुनाथाय नाथाय सीतायाः पतये नमः ॥३॥

मनोजवं मारुततुल्यवेगं जितेन्द्रियं बुद्धिमतां वरिष्ठम् ।
वातात्मजं वानरयूथमुख्यं श्रीरामदूतं शरणं प्रपद्ये ॥४॥

राम रामेति रामेति रमे रामे मनोरमे ।
सहस्रनामतस्तुल्यं रामनाम वरानने ॥५॥

या पांचही श्लोकांच्या पठणाने अनेक प्रकारची कार्यसिद्धि होते. यांपैकी प्रत्येक श्लोकांचे एक लक्ष उच्चारण केले असतां कामना पूर्ण होते. त्यांतल्या त्यांत प्रत्येक श्लोकाने प्राप्त होणारी सिद्धि निराळी आहे. या सर्व श्लोकांच्या उपासनेने सांसारिक कामना पूर्ण होतात. पारमार्थिक कामना मात्र पूर्णत्वाला पोहोचत नाहीत. या पांचही श्लोकांच्या उच्चारणाने काय प्राप्त होते याची रूपरेखा अशी आहे.

श्लोक १ ला :–या श्लोकाच्या उपासनेने आपल्या आप्तांचे अथवा मित्रांचे बिघडलेले संबंध चांगले होतात. कोर्टात किंवा अन्यत्र काही वाद असतील तर ते निकाली निघून त्यापासून साधकास होणारे दुःख होत नाही. त्याचप्रमाणे गेलेला पैसा परत येतो.

श्लोक २ रा :–यायोगे मनुष्य विद्यावान होतो. ज्यांची बुद्धि

मंद असेल त्यांनी या श्लोकाचे पठण करावे. एक महिन्याच्या मुदतीत अशा व्यक्तीत चांगला फरक दिसून येतो. विद्येमध्ये येणाऱ्या अनेकाविध अडचणी दूर होतात. विशेषतः वेदविद्या उत्तम रीतीने प्राप्त होते.

श्लोक ३ रा :–हा श्लोक स्त्रियांचे सौभाग्य वाढविणारा, कायम राखणारा आणि त्याबरोबरच पुरुषांची कीर्ती वाढविण्यास मदत करणारा आहे.

श्लोक ४ था :–शरीर निरोगी आणि सदृढ राहण्यासाठी या श्लोकाची उपासना करणे आवश्यक आहे. दीर्घायुष्य, उत्तम विवेक, आणि न्याय्य बुद्धी यायोगे निर्माण होते. इतकेच नव्हे तर तिचा विनियोगही चांगल्या प्रकारे करता येतो.

श्लोक ५ वा :–हा श्लोक सर्व सौख्यद असा आहे. याचा परिणाम श्लोकाचा जप करावयास लागल्यापासून सहा महिन्यांनी दिसू लागतो. श्लोक ४ आणि ५ या श्लोकांचा एकत्रित असा एक कोटी जप केला असता साक्षात रामाचे दर्शन घडते असा अनुभव आहे.

रामरक्षेच्या रोजच्या पठणाने घरातील सर्व पीडा दूर होते. इतकेच नव्हे तर मुलांना त्याच्या कोवळेपणी जर ही रामरक्षा शिकविली आणि त्याप्रमाणे त्यांनी ती सदैव म्हणण्याचा प्रघात ठेवला तर अशा मुलांची बुद्धि अतीव तीव्र होते. जीभ पातळ झाल्याने वक्तृत्व प्राप्त होते आणि त्यांचे सबंध आयुष्य कीर्तीमय होते. प्रत्यक्ष रामरक्षेतही या स्तोत्राची फलश्रुति आहे. श्लोक १० पासून १४ पर्यंत सर्व ऐहिक वैभव रामरक्षेच्या पठणाने मिळते. परंतु एवढ्यावरच रामरक्षेचे कार्य संपत नाही. स्वतः शरणागत झाल्यावर प्रभूरामचंद्र साधकावर कशा प्रकारे कृपा करतात याचेही मनोहर वर्णन यात आहे. हा सर्व फलनिधी मात्र पारमार्थिक आहे. रामनामाचे वैभव सांगणारी महर्षि वाल्मिकीची वाणी

आमच्यासारख्या सामान्यांना उपलब्ध झाली म्हणून त्यांचे ऋण मान्य करून बुधकौशिकाने आपले अबाधित नम्रत्व सिद्ध केले आहे. त्याचप्रमाणे रामनाम जपाचा खरा अगाध आनंद ज्या महापुरुषांनी घेतला त्यांत मारुतिरायांचें स्थान कोणीही हिरावून घेणार नाही. इतकेच काय पण आपल्या नांवाचा प्रभाव काय आहे हे प्रत्यक्ष रामचंद्राला सुद्धा माहीत नव्हते इतकी त्याची महती मारुतिरायांना पटली होती.

एकदां स्वतः श्रीरामचंद्र एका नदीच्या कांठी उभे होते. त्यांच्या मागे एका झाडावर मारुतिराय बसले होते. त्यांच्याही अंतरांत नामघोष चालला होता. परंतु श्रीरामचंद्रांच्या लक्षांत ही गोष्ठ आली नाही. त्यांच्या मनांत सहज विचार आला कीं सेतुबंधनाच्या वेळी या वानरांनीं माझे नांव दगडावर लिहिले आणि आश्चर्य म्हणजे तो दगड पाण्यात तरला. केवळ माझ्या नांवात हें वैभव आहे. आपण पण तसें करून पाहावे. असे म्हणून त्यांनीही एक दगड उचलला. त्यावर श्रीराम अशी अक्षरें लिहिली. तो एक-दोन वेळ निरखून पाहिला. राम काय करीत आहेत याकडे मारुतिरायाचे लक्ष गेले. बुद्धिमत्ता वरिष्ठ असलेल्या हनुमंतांना हा काय प्रकार आहे हें समजण्यास मुळीच वेळ लागला नाही. ते स्वस्थपणे पाहात बसले. प्रभू रामचंद्रांनी इकडे तिकडे पाहिले. आपल्या या वेड्या कृतीकडे कोणी पाहात नाही असं पाहून तो दगड त्या नदीच्या पाण्यांत टाकला आणि ते त्याच्याकडे पाहू लागले. पण अखेर दगडच तो. पदार्थविज्ञान शास्त्राप्रमाणे तो बुडाला. तोंच 'श्रीराम' अशी मोठ्याने गर्जना करीत झाडावरून मारुतिरायाने टुणकन उडी मारली आणि रामाच्या समोर ते प्राप्त झाले. रामचंद्रांना नमस्कार करून ते म्हणाले, रामा, तुमच्या नांवाचा प्रभाव तुम्हांला कसा कळणार-अगा थांनी कीर दूध गूढ । परी थानासि नव्हे कीं गोड ॥ तें आम्ही जे त्याचे सेवन करणारे त्यांनाच तें समजणार. आपल्या हातून जो सुटला तो तरावा

कसा ? तो बुडणारच. पण हें पहा असे म्हणून मारुतिरायांनी एक दगड उचलला. त्यावर श्रीराम ही अक्षरें लिहिली आणि तो दगड नदीच्या पाण्यात टाकला. दगड तरला. हे पाहून रामांना आश्चर्य वाटले. आपल्या नांवाची महती काय आहे ते रामांना कळून आले.

अशा या नामाची परंपरा अगाध आहे. बुधकौशिक म्हणतात, रामा ज्याला मी असे संबोधन आहे त्याचा उद्धार करा. हें सांगताना त्यांनी व्याकरण शास्त्राचा आश्रय करून एकुलता एक राम माझा उद्धार करो म्हणून भाकलेली करुणा किती तत्त्वपूर्ण आहे हें ध्यानी येईल.

**रामो राजमणिः सदा विजयते रामं रमेशं भजे ।**
**रामेणाभिहता निशाचरचमू रामाय तस्मै नमः ॥**
**रामान्नास्ति परायणं परतरं रामस्य दासोऽस्म्यहम् ।**
**रामे चित्तलयः सदा भवतु मे भो राम मामुद्धर ॥**

या श्लोकांत बुधकौशिकांचें खरे रचनाचातुर्य दिसून येते. त्याबरोबर रामरक्षेत रामचंद्राचा आणि स्वतः साधनाचा संबंध कसा असतो आणि कसा होतो याचा एक मौलिक अनुभव या श्लोकांत ग्रथित केलेला आहे. मी कोण आणि राम कोण ? मूळांत त्यांत असलेला दुरावा हळूहळू कसा कमी करावयाचा आणि अखेर रामप्रभू भक्तांचें आणि आपले मीलन कसें घडवून आणतात याचा उघड खुलासा या श्लोकी आहे.

साधक ईश्वराची उपासना करतो याचा अर्थ तो हळू देवाजवळ जातो. असा जात असतांना स्वतःच्या भोंवती असलेला जागतिक वस्तूचा पसारा तो कमी कमी करीत आणतो. म्हणजेच हा जो स्वतःच्या भोंवती असलेला पसारा साधक आटवितो आणि एकला उरतो. या प्रक्रियेला तप अशी संज्ञा आहे. सोप्या भाषेत सांगायचें तर देवाजवळ जाण्यासाठी

सांसारिक पसारा कमी कमी करावा लागतो. त्या योगे साधक देवाजवळ जातो. तेथे थांबतो. बसतो वगैरे याचाच अर्थ उप + आसना = उपासना. तपआणि उपासना यांत फरक नाही. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात—

**आत्मस्वरूपाचिया पसारा— । लागीं प्राणेंद्रिय शरीरा ।**
**आटणीं करणें जें वीरा । ते तप ॥ ज्ञाने. १६ ॥**

याप्रमाणें साधक स्वतःचा पसारा आवरूं लागला तर देहापर्यंत येईल. देह हा देखील पसारा आहे. देहाच्या आंत नांदणारा जो मी त्याचा देह हा पसारा आहे. या मीचा उद्धार करावा म्हणून रामरायांजवळ ही प्रार्थना आहे. ज्या वेळीं मीला विभक्ती प्रत्यय लागतो या वेळीं त्याचा विस्तार होऊं लागतो. जन्माला आल्याबरोबर मला किंचित असलेली स्मृती म्हणजे मीची प्रथमावस्था. त्यांत बदल कांहींच होत नाहींत. राम मला दूर तर वाटतो पण मी म्हणजे मात्र राम वाटत नाहीं याचें प्रतीक म्हणून या श्लोकांत राम या शब्दाची प्रथमा विभक्ती योजून रामापासून केवळ दोन बिन्दूइतका मी वेगळा आहे. मध्यें विसर्ग आहे. असें सुचवून रामाचें दुरून दिसणारे राजस सौंदर्य मला मोहवितें. त्यांतून राम हें माझें कर्म—दैवत म्हणून संबोधतो पुढें राम हेंच साधन होतें. त्या साधनानें मी सर्व कांहीं मिळवितो. याप्रमाणें कर्म, कारण आणि संप्रदान अशा मी भोंवती आणि मीपासून विभक्त असलेल्या दशा मी स्वतः अनुभवतो. रामाच्या पासून मी दूर आहे असें मला वाटूं लागतें तोंच मी रामाचा आहे असें माझें मन मला ग्वाही देतें आणि मी माझें चित्त रामांत आणून ठेवतों. तरीही मी रामापासून वेगळा आहे याचें मला दुःख होतेंच. म्हणून रामाला मोठ्यानें हांकारून मी सांगतो की, रामा माझा उद्धार कर. राम माझा उद्धार करतो. मी उद्धरतो.

अतिशय सोप्या भाषेत सांगायचें तर जसें सांगतां येईल. आपणास 'मी' कळतो. कारण आपल्या आत्म्याची ती एक स्फुटदशा आहे. म्हणून ती आम्हांस गोचर होते. गणित शास्त्रांत बिन्दू याची व्याख्या करतांना ज्याला लांबी आणि रुंदी नाही असे जें कांहीं त्याला बिन्दू म्हणतात. परंतु हा बिन्दू असें म्हणून आपण जो बिन्दू काढतो त्याला तर लांबी-रुंदी आहे. त्याचप्रमाणें व्याकरण शास्त्रांत शब्दांच्या आठ जाती आहेत त्यांच्या व्याख्याही आपणास अवगत आहेत. त्याप्रमाणें पाहतां नाम याची व्याख्या-वस्तूच्या नांवाला नाम म्हणतात. ही आहे तर नामाबद्दल येणारा शब्द त्याला सर्वनाम असें म्हणतात. या सर्वनामांत सुद्धां पुन्हा सहा प्रकार आहेत. त्यापैकीं पुरुषवाचक सर्वनाम म्हणून एक प्रकार आहे. या पुरुषवाचक सर्वनामाचे तीन प्रकार आहेत आणि या प्रत्येक प्रकाराचे आणखी दोन भेद आहेत. त्यांतील प्रथमपुरुष वाचक एकवचनी सर्वनाम म्हणजे 'मी'. हें जर सर्वनाम असेल तर त्याचें नाम कोणतें? याचे उत्तर देतां येत नाही. म्हणजेच जेथून वाचा परतते असें जें स्थान तो ईश्वर. म्हणजेच मी हा त्या ईश्वराचा पसारा आहे. त्या 'मी' चा उद्धार कर. म्हणजे मी हे जें बाह्य कवच तें दूर कर म्हणजे मी खराखुरा ईश्वरच होईन. पूर्णार्थाने ईशमय होणें ही राम-रक्षेची परिणती आहे. बुधकौशिक म्हणतो ही गोष्ट कशी शक्य होतें तें प्रत्यक्ष अनुभविणेंच योग्य. हा अमोल अनुभव ज्यांनी घेतला ते भगवान् शंकर आपल्या प्रिय पत्नीस-पार्वतीस सांगतातः —

**राम रामेति रामेति रमे रामे मनोरमे ।**

**सहस्रनामतस्तुल्यं रामनाम वरानने ॥**

राम राम असें नाम घेता ज्याला नांव नाही अशा अगाधत्वाचा

लाभ साधकाला होतो. हा अनुभव शिवांचा आहे. शिवांसारखा साधक आणि तापस शोधून मिळणार नाही.

करिता तापसांची कडसणी । कवणु जवळा ठेविजे शूलपाणी ॥

असे ज्ञानदेव गौरवार्थाने विचारतात की ज्यांचे उत्तर न देतांच मिळते. अशा थोरवीचे शिव या रामनामवैभवानुभवाचे कथन करतात. स्वतः साधक, नंतर उपासक आणि अखेर भक्त बनून याचा अनुभव घेणे हेच याचे खरे इंगित आहे. कारण यासाठी शब्द हे माध्यमच दुबळे आहे. इति शम् ॥

# सार्थ रामरक्षा

**श्रीगणेशाय नमः । अस्य श्रीरामरक्षास्तोत्रमन्त्रस्य । बुधकौशिकऋषिः । श्रीसीतारामचन्द्रो देवता । अनुष्टुप् छन्दः । सीता शक्तिः । श्रीमद्धनुमान् कीलकम् । श्रीरामचन्द्रप्रीत्यर्थे जपे विनियोगः ॥**

ह्या रामरक्षा स्तोत्राचा बुधकौशिक ऋषी हा कर्ता आहे. श्री सीतारामचंद्र ही स्तव्य देवता आहे, स्तोत्रातील (बहुतेक) श्लोक अनुष्टुप् छंदात आहेत, श्रीमान् हनुमान ही या स्तोत्रांत प्रवेश करण्याची किल्ली आहे आणि श्रीरामचंद्राची प्रीती लाभावी म्हणून या स्तोत्राचा सारखा पाठ करणे हा या स्तोत्राचा उपयोग आहे.

श्रीरामांची ध्यानमूर्ती अशी आहे.

अथ ध्यानम् । ध्यायेदाजानुबाहुं धृतशरधनुषं बद्धपद्मासनस्थं । पीतं वासो वसानं नवकमलदलस्पर्धिनेत्रं प्रसन्नम् । वामाङ्कारूढसीतामुखकमलमिलल्लोचनं नीरदाभं । नानालङ्कारदीप्तं दधतमुरुजटामण्डनं रामचन्द्रम् ।। इति ध्यानम् ।।

गुडघ्यापर्यंत लांब हात असलेल्या आणि ज्याने धनुष्य व बाणही हाती घेतली आहेत, जो मांडी घालून बसला असून ज्याने पीतांबर नेसलेला आहे, नवीनच उमललेल्या कमळाच्या पाकळीशी स्पर्धा करणारे असे सुंदर आणि आनंद ओसंडणारे ज्याचे डोळे आहेत, डाव्या मांडीवर बसलेल्या जानकीच्या मुखाकडे जो पाहात आहे, जलपूर्ण मेघाप्रमाणे ज्याची श्यामवर्ण कांती आहे, अनेक प्रकारच्या अलंकारांनी जो सुशोभित झाला आहे आणि ज्याने भव्य जटामंडळ मस्तकावर धारण केले आहे अशा रामाच्या मूर्तीचे ध्यान करावे. ( अंतश्चक्षूंनी पाहावे.)

चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरम्
एकैमकक्षरं पुंसां महापातकनाशम् ।।१।।

( १ ) ज्याचे एक एक अक्षर मानवाच्या महाभयंकर पापकर्माचा नाश करते अशा रघुकुल श्रेष्ठाच्या ( रामाचे ) चरित्राचा विस्तार शंभर कोटी श्लोकांचा आहे.

ध्यात्वा नीलोत्पलश्यामं रामं राजीवलोचनम् ।
जानकीलक्ष्मणोपेतं जटामुकुटमण्डितम् ।।२।।

( २ ) निळ्या कमळाप्रमाणे ज्याचा श्यामल वर्ण आहे, कमळाप्रमाणे ज्याचे डोळे आहेत, ज्याच्या समवेत लक्ष्मण आणि सीता आहेत आणि जटांच्या मुकुटामुळे जो शोभून दिसतो,

**सासितूणधनुर्बाणपाणिं नक्तंचरान्तकम् ।**
**स्वलीलया जगत्त्रातुमाविर्भूतमजं विभुम् ॥३॥**

( ३ ) ज्याच्या हाती तलवार आणि धनुष्य असून पाठीला बाणभाता बांधलेला आहे, राक्षसांचा संहारक, आणि जगाच्या रक्षणासाठी जन्मरहित सर्वव्यापी असतांना सुद्धा सहज लीलेने अवतीर्ण झालेल्या रामाचे ध्यान करून,

**रामरक्षां पठेत् प्राज्ञः पापघ्नीं सर्वकामदाम् ।**
**शिरो मे राघवः पातु भालं दशरथात्मजः ॥४॥**

( ४ ) सर्व इच्छा पुऱ्या करणाऱ्या, पापाचा नाश करणाऱ्या या रामरक्षा स्तोत्राचे शाहाण्या माणसाने पठण करावे, रघुवंशाचे भूषण असलेल्या रामाने, माझ्या मस्तकाचे रक्षण करावे. दशरथाच्या पुत्राने माझ्या कपाळाचे रक्षण करावे.

**कौसल्येयो दृशौ पातु विश्वामित्रप्रियः श्रुती ।**
**घ्राणं पातु मखत्राता मुखं सौमित्रिवत्सलः ॥५॥**

( ५ ) कौसल्येच्या रामाने माझ्या डोळ्याचे, विश्वामित्राला आवडणाऱ्या रामाने माझ्या कानांचे, यज्ञरक्षण करणाऱ्या रामाने माझ्या नाकाचे आणि सुमित्रानंदन लक्ष्मणावर प्रेम करणाऱ्या रामाने माझ्या मुखाचे रक्षण करावे.

**जिह्वां विद्यानिधिः पातु कण्ठं भरतवन्दितः ।**
**स्कन्धौ दिव्यायुधः पातु भुजौ भग्नेशकार्मुकः ॥६॥**

(६) सर्व विद्यांचा ठेवा अशा रामाने माझ्या जिभेचे, भरताने ज्याला वन्दन केले आहे अशा रामाने माझ्या कंठाचे, दिव्य आयुध धारण करणाऱ्या रामाने माझ्या खांद्यांचे आणि शिवधनुष्य मोडणाऱ्या रामाने माझ्या दोन्ही बाहूंचे रक्षण करावे.

**करौ सीतापतिः पातु हृदयं जामदग्न्यजित् ।**
**मध्यं पातु खरध्वंसी नाभिं जाम्बवदाश्रयः ।।७।।**

(७) सीतानाथ राम माझ्या दोन्ही हातांचे, जमदग्नीपुत्र परशु-रामाला जिंकणारा राम माझ्या हृदयाचे, खर राक्षसाचे हनन करणारा राम माझ्या शरीरमध्याचे, जाम्बवन्ताला आपलासा केलेला राम माझ्या नाभिकमलाचे-बेंबीचे रक्षण करो.

**सुग्रीवेशः कटी पातु सक्थिनी हनुमत्प्रभुः ।**
**ऊरू रघूत्तमः पातु रक्षःकुलविनाशकृत् ।।८।।**

(८) सुग्रीवाचा स्वामी माझ्या कंबरेचे, मारुतीचा प्रभू राम माझ्या मांड्यांच्या मागच्या भागाचे, रघुकुलांत श्रेष्ठ असणारा आणि राक्षसकुलाचा संहारक राम माझ्या मांड्यांचे रक्षण करो.

**जानुनी सेतुकृत् पातु जङ्घे दशमुखान्तकः ।**
**पादौ विभीषणश्रीदः पातु रामोऽखिलं वपुः ।।९।।**

(९) सेतू तयार करणाऱ्या रामाने माझ्या गुडघ्यांचे रावणाला ठार मारणाऱ्या रामाने माझ्या पोटऱ्यांचे, बिभीषणाला सर्व वैभव देणाऱ्या रामाने माझ्या पायांचे इतकेच काय श्रीरामाने माझ्या सर्व देहाचे संरक्षण करावे.

**एतां रामबलोपेतां रक्षां यः सुकृती पठेत् ।**
**स चिरायुः सुखी पुत्री विजयी विनयी भवेत् ॥१०॥**

(१०) रामसामर्थ्याने युक्त अशा या रक्षास्तोत्राचे जो पठण करील तो दीर्घायुषी, सुखी, संततिवान्, विजयी आणि विनयसंपन्न होईल.

**पातालभूतलव्योमचारिणश्छद्मचारिणः**
**न द्रष्टुमपि शक्तास्ते रक्षितं रामनामभिः ॥११॥**

(११) रामनामाने ज्याचे रक्षण केले जाते त्याला पाताळ, भूतल आणि आकाश यांत हिंडणारे कपटी लोक पाहू शकणार नाहीत.

**रामेति रामभद्रेति रामचन्द्रेति वा स्मरन् ।**
**नरो न लिप्यते पापैर्भुक्तिं मुक्तिं च विन्दति ॥१२॥**

(१२) राम, रामभद्र, किंवा रामचन्द्र असे म्हणून जो मनुष्य रामाचे स्मरण करतो त्याला पापे चिकटत नाहीत आणि शिवाय तो ऐहिक व पारमार्थिक वैभव मिळवितो.

**जगज्जैत्रैकमन्त्रेण रामनाम्नाभिरक्षितम् ।**
**यः कण्ठे धारयेत्तस्य करस्थाः सर्वसिद्धयः ॥१३॥**

(१३) जगाला जिंकणारा मंत्र जो रामनाम त्याने संरक्षित (असा एखादा पदार्थ) कंठात धारण केला असता त्याला सर्व सिद्धि प्राप्त होतात.

**वज्रपञ्जरनामेदं यो रामकवचं स्मरेत् ।**
**अव्याहताज्ञः सर्वत्र लभते जयमङ्गलम् ॥१४॥**

(१४) वज्राप्रमाणे अभेद्य असे हे रामरक्षा स्तोत्र जो म्हणतो त्याची आज्ञा सर्वत्र मानली जाते आणि त्याला जय व कल्याण प्राप्त होते.

**आदिष्टवान् यथा स्वप्ने रामरक्षामिमां हरः ।**
**तथा लिखितवान् प्रातः प्रबुद्धो बुधकौशिकः ।। १५ ।।**

(१५) ही रामरक्षा भगवान् शिवांनी ज्याप्रमाणे बुध-कौशिक ऋषींना स्वप्नात सांगितली त्याप्रमाणे त्यांनी जागे होतांच लिहून काढली.

**आरामः कल्पवृक्षाणां विरामः सकलापदाम् ।**
**अभिरामस्त्रिलोकानां रामः श्रीमान् स नः प्रभुः ।।१६।।**

(१६) कल्पवृक्षांचा विसावा, सर्व संकटे दूर करणारा, आणि तीनही लोकांना आनंद देणारा राम आमचा स्वामी आहे.

**तरुणौ रूपसंपन्नौ सुकुमारौ महाबलौ ।**
**पुण्डरीकविशालाक्षौ चीरकृष्णाजिनाम्बरौ ।।१७।।**

(१७) तरुण, स्वरूपसंपन्न, सुकुमार, महा–सामर्थ्यवान, कमल-पाकळीप्रमाणे विशाल नेत्र असलेले, आणि मृगाजिन वस्त्राप्रमाणे नेसलेले,

**फलमूलाशिनौ दान्तौ तापसौ ब्रह्मचारिणौ ।**
**पुत्रौ दशरथस्यैतौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ।।१८।।**

(१८) कन्दमुळे खाणारे, ज्यांनी आपली इंद्रिये जिंकली आहेत, तपोवान ब्रह्मचारी असे हे दशरथाचे पुत्र, एकमेकांचे बंधु राम आणि लक्ष्मण,

**शरण्यौ सर्वसत्त्वानां श्रेष्ठौ सर्वधनुष्मताम् ।**
**रक्षःकुलनिहन्तारौ त्रायेतां नो रघूत्तमौ ।। १९ ।।**

(१९) सर्व प्राण्यांना अभय देणारे, सर्व धनुर्धरामध्ये श्रेष्ठ आणि राक्षसांचा नाश करणारे रघुकुलोत्तम राम–लक्ष्मण आमचे रक्षण करोत.

**आत्तसज्यधनुषाविषुस्पृशावक्षयाशुगनीषङ्गसङ्गिनौ ।**
**रक्षणाय मम रामलक्ष्मणावग्रतः पथि सदैव गच्छताम् ॥२०॥**

(२०) सिद्ध धनु आणि बाण, व भाते धारण करणारे असे दोघे राम आणि लक्ष्मण माझ्या रक्षणासाठी माझ्या समोर चालोत.

**सन्नद्धः कवची खड्गी चापबाणधरो युवा ।**
**गच्छन् मनोरथोऽस्माकं रामः पातु सलक्ष्मणः ॥२१॥**

(२१) कवच घालून खड्ग आणि धनुष्यबाण घेवून सदैव सिद्ध असलेला आमचे मानसच जणु काही असा लक्ष्मणासह जाणारा राम आमचे संरक्षण करो.

**रामो दाशरथिः शूरो लक्ष्मणानुचरो बली ।**
**काकुत्स्थः पुरुषः पूर्णः कौसल्येयो रघूत्तमः ॥२२॥**

(२२) दशरथाचा शूर पुत्र, लक्ष्मण ज्याचा दास आहे, बलवान् ककुस्थ वंशात जन्मलेला, पूर्णब्रह्म कौसल्येचा पुत्र, रघुकुल श्रेष्ठ असा राम

**वेदान्तवेद्यो यज्ञेशः पुराणपुरुषोत्तमः ।**
**जानकीवल्लभः श्रीमानप्रमेयपराक्रमः ॥२३॥**

(२३) वेदांकडून ज्ञात होण्यास योग्य, यज्ञपुरुष, अनादि पुरुषोत्तम जानकीनाथ, वैभववान् आणि अतुल पराक्रमी.

**इत्येतानि जपन् नित्यं मद्भक्तः श्रद्धयान्वितः ।**
**अश्वमेधाधिकं पुण्यं संप्राप्नोति न संशयः ॥२४॥**

(२४) अशा ( नांवांनी ) नित्य जप करणाऱ्या, श्रद्धावान अशा माझ्या भक्ताला अश्वमेध यज्ञाच्या पुण्यापेक्षा अधिक फल प्राप्त होते यांत शंका नाही.

**रामं दूर्वादलश्यामं पद्माक्षं पीतवाससम् ।**
**स्तुवन्ति नामभिर्दिव्यैर्न ते संसारिणो नरः ॥२५॥**

(२५) दूर्वादलाप्रमाणे श्यामलवर्ण, कमलाप्रमाणे ज्यांचे डोळे आहेत पीतांबर ज्याने नेसलेला आहे अशा रामप्रभूची जे लोक ( त्याच्या वर सांगितलेल्या ) दिव्य नांवांनी स्तुती करतात ते जन जन्ममरणाच्या प्रवासांतून सुटतात.

**रामं लक्ष्मणपूर्वजं रघुवरं सीतापतिं सुन्दरं ।**
**काकुत्स्थं करुणार्णवं गुणनिधिं विप्रप्रियं धार्मिकम् ।**
**राजेन्द्रं सत्यसन्धं दशरथतनयं श्यामलं शान्तमूर्तिं ।**
**वन्दे लोकाभिरामं रघुकुलतिलकं राघवं रावणारिम् ॥२६॥**

(२६) लक्ष्मणाचा मोठा भाऊ, रघुकुलांत श्रेष्ठ, सीतेचा नाथ, रूपसंपन्न, ककुस्थ कुलांत जन्मलेला, करुणानिधी, सर्व गुणांचा ठेवा, विद्वान ज्याला आवडतात, धर्माप्रमाणे आचरण असलेला, राजश्रेष्ठ सत्यव्रत दशरथात्मज, श्यामवर्ण, शांतमूर्ती, लोकांना आनंद देणारा, रघुकुळाला तिलकाप्रमाणे शोभा देणारा आणि रावणाचा शत्रू अशा रामाला मी वंदन करतो.

**रामाय रामभद्राय रामचन्द्राय वेधसे ।**
**रघुनाथाय नाथाय सीतायाः पतये नमः ॥२७॥**

(२७) श्रीराम, रामभद्र, रामचन्द्र, वेधस्, रघुनाथ, नाथ, आणि सीतापतीला मी नमस्कार करतो.

**श्रीराम राम रघुनन्दन राम राम ।**

**श्रीराम राम भरताग्रज राम राम ।**

**श्रीराम राम रणकर्कश राम राम ।**

**श्रीराम राम शरणं भव राम राम ॥२८॥**

(२८) रघुकुलांत श्रेष्ठ असलेल्या रामा, भरताच्या जेष्ठ बंधो रामा, युद्धात कठोर होणाऱ्या रामा आमचा रक्षिता होता.

**श्रीरामचन्द्रचरणौ मनसा स्मरामि**

**श्रीरामचन्द्रचरणौ वचसा गृणामि**

**श्रीरामचन्द्रचरणौ शिरसा नमामि**

**श्रीरामचन्द्रचरणौ शरणं प्रपद्ये ॥२९॥**

(२९) श्रीरामाचे चरण मनाने मी स्मरतो, वाणीने त्याची कीर्ती गातो, मस्तकाने नमस्कार करतो, आणि त्यांच्या चरणी मी शरण येतो.

**माता रामो मत्पिता रामचन्द्रः ।**

**स्वामी रामो मत्सखा रामचन्द्रः ।**

**सर्वस्वं मे रामचंद्रो दयालुर्**

**नान्यं जाने नैव जाने न जाने ॥३०॥**

(३०) राम माझी आई, राम माझा पिता, रामचंद्र माझा धनी, राम माझा स्नेही, माझे सर्वस्व तो दयाधन रामचंद्र आहे. त्याशिवाय मी अन्याला जाणत नाही. त्रिवार जाणत नाही.

**दक्षिणे लक्ष्मणो यस्य वामे तु जनकात्मजा ।**
**पुरतो मारुतिर्यस्य तं वन्दे रघुनन्दनम् ॥३१॥**

(३१) ज्याच्या उजव्या बाजूस लक्ष्मण आहे, डाव्या बाजूला जानकी आहे आणि समोर मारूती आहे त्या रघुनंदनाला मी वंदन करतो.

**लोकाभिरामं रणरङ्गधीरं राजीवनेत्रं रघुवंशनाथम् ।**
**कारुण्यरूपं करुणाकरं तं श्रीरामचन्द्रं शरणं प्रपद्ये ॥३२॥**

(३२) लोकांना आनंद देणारा, युद्धांत धीरवान असणारा, कमल-नेत्र, रघुवंशाचा स्वामी, दया हे ज्याचे रूप, दया हाच ज्याचा आकार आहे त्या रामचंद्राला मी शरण आहे.

**मनोजवं मारुततुल्यवेगं । जितेन्द्रियं बुद्धिमतां वरिष्ठम् ।**
**वातात्मजं वानरयूथमुख्यं । श्रीरामदूतं शरणं प्रपद्ये ॥३३॥**

(३३) मनाप्रमाणे ज्याचा वेग आहे, वाऱ्याप्रमाणे वेगवान, इंद्रिये जिंकलेला, बुद्धिमानांमध्ये श्रेष्ठ, वायुपुत्र, वानराधिपती, आणि श्री रामचंद्राचा दूत अशा मारुतीला मी शरण आहे.

**कूजन्तं राम रामेति मधुरं मधुराक्षरम् ।**
**आरुह्य कविताशाखां वन्दे वाल्मीकिकोकिलम् ॥३४॥**

(३४) कवितारूपी खांदीवर बसून राम राम अशा गोड अक्षरांचे कूजन करणाऱ्या वाल्मिकीरूपी कोकिळाला मी वन्दन करतो.

**आपदामपहर्तारं दातारं सर्वसंपदाम् ।**
**लोकाभिरामं श्रीरामं भूयो भूयो नमाम्यहम् ॥३५॥**

(३५) संकटांना दूर करणारा, सर्व वैभव देणारा, लोकांचा आनंद अशा रामचंद्राला मी पुन्हा पुन्हा नमस्कार करतो.

**भर्जनं भवबीजानामर्जनं सुखसंपदाम् ।**

**तर्जनं यमदूतानां राम रामेति गर्जनम् ॥३६॥**

(३६) जन्म-मरणाचे मूळ जाळून टाकणारा, सर्व वैभव देणारा यमदूतांना भीती वाटणारा, असा राम राम हा घोष आहे.

**रामो राजमणिः सदा विजयते रामं रमेशं भजे ।**

**रामेणाभिहता निशाचरचमू रामाय तस्मै नमः ।**

**रामान्नास्ति परायणं परतरं रामस्य दासोऽस्म्यहं ।**

**रामे चित्तलयः सदा भवतु मे भो राम मामुद्धर ॥३७॥**

(३७) राम राजश्रेष्ठ असून तो सदा विजयी होतो. रमापती रामचंद्राला मी भजतो, ज्या रामाने राक्षस–सेना मारिली त्या रामाला मी नमस्कार करतो. रामाहून मला कोणी श्रेष्ठ नाही, मी रामाचा दास आहे, रामांत माझे मन मिळून जावो, हे रामा माझा उद्धार कर.

**राम रामेति रामेति रमे रामे मनोरमे ।**

**सहस्रनामतस्तुल्यं रामनाम वरानने ॥३८॥**

(३८) हे सुमुखी पार्वती, राम राम राम असे म्हणून मी रामांत रमतो. कारण श्रीरामाचे नांव विष्णुसहस्रनामाशी तुलना करणारे आहे असे भगवान शिव पार्वतीला सांगतात.

**इति श्रीबुधकौशिकविरचितं श्रीरामरक्षास्तोत्रं संपूर्णम् ।**

**॥ श्रीसीतारामचन्द्रार्पणमस्तु ॥**

याप्रमाणे बुधकौशिकांनी लिहिलेले रामरक्षास्तोत्र संपूर्ण झाले. ते श्रीसीतारामाच्या चरणीं अर्पण असो.



# श्री मारुती स्तोत्र

मारुती किंवा हनुमान ही देवता रामायणकालापासून भारतीयांना ज्ञात आहे. इतकेंच नव्हे तर मारुती ही एक शक्तिशाली देवता म्हणून केवळ महाराष्ट्रांतच नव्हे तर सर्व भारतभर आणि भारताच्या बाहेरसुद्धां कांही ठिकाणी या देवतेची पूजा प्रत्यही होत आहे. परंतु अन्य प्रांतापेक्षा महाराष्ट्रांत मात्र ह्या देवतेबद्दल विशेष आदर आहे. महाराष्ट्रांत अशा आदराचें त्वरेने विस्तारणारें बीज मात्र स्वामी समर्थ रामदासांनी पेरले याबद्दल वादाला जागा नाही. अर्थात प्रस्तुत स्तोत्राचे कर्ते देखील स्वामी रामदासच आहेत. यावरून या देवतेचे प्रेरक बीज त्यांनीं किती खोलवर रुजवलें होतें याची ओळख पटते. प्रत्यक्ष या स्तोत्राचा विचार करण्यापूर्वी स्तोत्राचा कर्ता, देवता, छंद, विनियोग आणि परिणाम यांचा प्रामुख्याने विचार करावा लागेल. तरच या स्तोत्राची सर्वांगीण महनीयता साधकांच्या ध्यानी येईल आणि

स्तोत्राबद्दल आवश्यक असणारी श्रद्धा निर्माण होऊन साधकाला आपलें अंतिम साध्य सहजपणें साधता येईल.

वाल्मीकि रामायणाच्या उत्तर–काण्डांतील पस्तीसाव्या सर्गांत मारुतीच्या अद्‌भुत सामर्थ्याची साक्ष पटलेल्या प्रभु रामचंद्रांनी तपोनिधी अगस्ती मुनींना या मारुतीबद्दल विचारणा केली. त्या वेळी मारुतीची जी कथा अगस्तींनी निवेदन केली ती मोठी मौलिक आहे.

सुमेरु नांवाचा एक पर्वत होता. भगवान् सूर्यनारायणाच्या प्रभावानें त्याला सुवर्णत्व प्राप्त झालें होतें. त्या ठिकाणीं केसरी नामक एक वानर राज्य करीत होता. अंजना या नांवाची त्याची पत्नी होती. ती महान तपस्विनी असून वायुदेवाची भक्त होती. वायुदेवाच्या कृपेने तिला चैत्र शुद्ध पौर्णिमेच्या दिवशीं एक पुत्र झाला. त्या पुत्राची कांती आश्विन मासांत पिकलेल्या धान्याप्रमाणें धूसर–पिवळी होती. मरुतपुत्र म्हणून त्याला मारुती असे लोक संबोधू लागले. जन्मानंतर लगेच त्याने आपल्या पराक्रमाला प्रारंभ केला. त्याला एकदां खूप भूक लागली म्हणून तो रडूं लागला. त्याला कांहीं तरी खायला द्यावें म्हणून अंजनी फळें आणण्यासाठीं अगदीं पहाटेच्या वेळीं अरण्यांत गेली. ती लवकर येत नाही असें पाहून मारुती घराच्या बाहेर पडला. त्या वेळीं पूर्वा पाजळली होती, आनंदली होती. रविराजाच्या स्वागतासाठी गुलालाचें उधळण करून तिनं साऱ्या जगाला सूर्यराज येत असल्याची ग्वाही देण्यासाठी, आणि त्याच्या स्वागतासाठी सिद्ध होण्यासाठी पक्ष्यांना पाठवलं. आपलं खाणं–पिणं दूर सोडून दिनराजाच्या आगमनाच्या वार्तेने आनंदलेले द्विजगण लोकांना पूर्वश्रीचा निरोप सांगून आकाशाकडे झेंपावले होते. बाळमूर्ती मारुतीनें तें पाहिलें. इतक्यांत उमाळ्यावर उमटलेलें लालबुंद सूर्यबिंब त्याला दिसलें. त्याच्या बालबुद्धीला वाटलें, काय उत्कृष्ट फळ आहे! पोटांतल्या भुकेनें त्याला जाणीव

दिली आणि मग मागचा पुढचा कांहीं एक विचार न करतां त्याने त्या सूर्यफलाच्या रोखाने जोरदार झेंप घेतली. योजन प्रतियोजन मागे टाकतां टाकतां हजारो योजने मागे टाकून तो पुढें सरसावला. आपल्या पुत्राची ही झेंप पाहून वायु आश्चर्यचकित झाला. पण लगेच त्याच्या लक्षांत आलें की आपल्या पुत्राची ही झेंप सूर्याकडे आहे. सूर्याचे चण्ड प्रकाशकिरण त्याला त्रास देतील. तो त्रास त्याला होऊं नये म्हणून तोहि त्याच्या बरोबर झेंपावला; पण मारुतीला त्याला गांठतां येईना. मारुती पुढें आणि वायु मागें अशी त्याची धांव चालू होती. वायूपेक्षां देखील त्याचा वेग जास्त होता. देव, दानव, यक्ष सर्व स्तिमित झाले. बालपणांत जर याचा हा पराक्रम तर उद्यां तरुणपणी त्याचें सामर्थ्य काय असेल. मारुती सूर्याजवळ पोहोचला. पण त्याच्याकडून होणाऱ्या भावी कार्याची कल्पना असल्याने सूर्याने त्याला त्रास दिला नाही. त्या दिवशीं सूर्यग्रहण होतें. राहू चंद्रसूर्यावर आक्रमण करीत असतानाच मारुतीने सूर्याच्या रथावर उडी मारली. त्याला पाहून घाबरलेला राहू इंद्राकडे गेला आणि मारुतीच्या आगमनाची वार्ता त्यानें इंद्राला सांगितली. इंद्रालाहि या वार्तेने क्रोध आला. राहूला घेऊन आणि ऐरावतावर आरूढ होऊन इंद्र युद्धाला सज्ज होऊन आला. सूर्याजवळ येताच त्याला सूर्याच्या संन्निध मारुती दिसला. इंद्राने आपल्या हातांतील वज्र मारुतीवर फेंकलें. वज्राचा प्रहार मारुतीच्या हनुवटीवर होऊन मारुती मूर्च्छित होऊन पडला. आपला पुत्र मूर्च्छित झालेला पाहतांच वायु त्याच्या मदतीला धांवला. त्याने आपल्या पुत्राला उचलून घेतलें. तो शुद्धीवर यावा म्हणून प्रयत्न केले परंतु तो शुद्धिवर येण्याचें कांहीं लक्षण दिसेना. तेव्हां त्याने मारुतीला घेऊन पृथ्वीवरील एका गुहेचा आश्रय केला आणि त्यानें आपलें नेहमीचें काम थांबविलें. वायु वहाण्याचें थांबतांच पृथ्वीवरील सर्व प्राणिमात्र श्वासोच्छवास न करतां

आल्यामुळें गुदमरू लागले. काहीं मूर्च्छित झाले तर कांहीं मरण पावले. पृथ्वीची ही स्थिति इन्द्रानें अवलोकन केली. त्याने सर्व देवांना आपल्या बरोबर घेतलें आणि तो ब्रह्मयाकडे गेला. ब्रह्मदेवाने त्यांची सर्व हकीकत ऐकून घेतली आणि तो समजावणीच्या स्वरांत म्हणाला, ' देव हो, या मारुतीकडून आपलें फार मोठें कार्य पुढें होणार आहे. तुम्ही त्याचा असा अपमान केलांत. तुमची फार मोठी चूक झाली. त्यामुळे वायूने आपले काम बंद केले आणि पृथ्वीवर सर्वत्र हाहाःकार उडाला. आपण आता सर्वच त्याच्याकडे जाऊं आणि त्याची क्षमा मागूं. आपण जर असें केले नाही तर सबंध पृथ्वी थोड्याच अवकाशांत जीवरहित होईल.'

ब्रह्मदेवाचें हें म्हणणें सर्व देवांना पटलें आणि अखेर वायु ज्या गुहेत आपल्या पुत्राला घेऊन बसला होता त्या ठिकाणी देव आले. ब्रह्मदेवाला पाहातांच वायूनें त्याला वन्दन केलें. आपल्या आभरणयुक्त हातांनी मारुतीला ब्रह्मदेवानें स्पर्श केला; त्याबरोबर मारुतीची मूर्च्छा गेली. वायु पुन्हा वाहूं लागला. त्याबरोबर सर्व पृथ्वी एकदम जिवंत झाल्याप्रमाणे दिसूं लागली. झाडें पुन्हा बहरलीं, कमलिनी विकासल्या आणि इतका वेळ निश्चल झालेली पृथ्वी पुन्हा हालचाल करू लागली.

वायुदेवतेच्या प्रसन्नतेसाठीं आणि मारुतीकडून भविष्यकाळी होणाऱ्या कार्यासाठी त्या मारुतीला अनेक देवांनी आशीर्वाद दिले आणि कांहींनीं वर दिले. इंद्र म्हणाला—हे वायो माझ्या हातच्या वज्राने तुझ्या पुत्राची हनुवटी विद्ध झाली होती. पण तेंच त्याचें भूषण ठरून त्याला ' हनुमान् ' असें नांव प्राप्त होईल आणि यापुढे माझ्या वज्राने त्याला कधीहि मृत्यु येणार नाहीं. असें म्हणून आपल्या गळ्यातली कमलमाला त्याने मारुतीला अर्पण केली.

सूर्य म्हणाला—मी माझ्या तेजाचा शंभरावा भाग मारुतीला अर्पण करतो. शिवाय सर्वशास्त्र पारंगत असा तुझा

पुत्र होईल, इतकेंच नव्हे तर त्याची बरोबरी करूं शकेल असा या पृथ्वीतलावर कोणी राहणार नाही, असा आशीर्वाद देतो.

वरुण म्हणाला—दशलक्ष वर्षे आयुष्य झालें तरी माझ्या हातून त्याला मृत्यु येणार नाही.

यम म्हणाला—माझ्या हातून याला मरण येणार नाही आणि शिवाय हा नेहमी निरोगी राहील.

कुबेर म्हणाला—युद्धांत याला कधींहि दुःख प्राप्त होणार नाही. शिवाय माझ्या गदेनें याचा वधहि कधी होणार नाहीं.

भगवान् शंकर म्हणाले—माझ्या आयुधांनी हा कधींही वध्य होणार नाही.

विश्वकर्मा म्हणाला—मी निर्माण केलेल्या अस्त्र अथवा शस्त्र यांच्याकडून हा अवध्य होऊन हा बालक चिरंजीव होईल.

ब्रह्मदेव म्हणाला—हा दीर्घायु होईल आणि ब्रह्मांडांतील कोणत्याहि उपायाने तो वध्य होणार नाही. हे वायो, हा तुझा पुत्र शत्रूंना भयंकर ताप आणि मित्रांना अभयदान करणारा होईल. आपल्या इच्छेप्रमाणें याला आपले स्वरूप बदलतां येईल आणि इच्छेप्रमाणें तीव्र किंवा मंद गति प्राप्त होईल. हा सर्वदा यशस्वी होईल.

याप्रमाणें मारुतीला वर देऊन आणि वायुदेवतेची अनुज्ञा घेऊन सर्व देव निघून गेले. वायु अंजनीकडे आला आणि पुत्राला तिच्या स्वाधीन करून वरदानाची सर्व हकीगत तिला कथन केली. ती ऐकून तिलाहि मोठा संतोष वाटला.

निरनिराळ्या वरांनी सामर्थ्यसंपन्न झालेल्या मारुतीनें निरनिराळया ऋषींच्या आश्रमांत शिरून यज्ञसाहित्याची नासधूस केली. ऋषींनाहि त्रास दिला. वायूने त्याला अनेक प्रकारें सांगून पाहिले पण मारुतीचा हा उद्योग मात्र थांबेना. तेव्हां भृगु आणि अंगिरस ऋषींच्या कुळांत उत्पन्न झालेल्या ऋषींनी त्याला शाप दिला की, 'हे वानरा, तूं ज्या बलामुळे आम्हास त्रास देत आहेस त्या सामर्थ्याची तुला विस्मृति होईल. परंतु तुझ्या पराक्रमाची तुला कोणीं आठवण करून दिली तर मात्र तुला पूर्वीचे सर्व बळ प्राप्त होईल. या शापाने मारुतीचे सामर्थ्य एकदम कमी होऊन तो सौम्य झाला आणि वावरूं लागला. पुढें हा सुग्रीवाचा सेवक म्हणून किष्किंधा नगरीत राहू लागला.

वाली अथवा सुग्रीव यांच्यापेक्षां मारुतीचे सामर्थ्य अधिक होतें परंतु स्वतःच्या सामर्थ्याबद्दल असलेल्या विस्मृतीमुळे त्याचा प्रभाव रामभेटीच्या पूर्वी रामायणांत गोचर होत नाही. मात्र रामांचे लक्ष्मणासह किष्किंधेला येणें म्हणजे मारुतीला त्याच्या सामर्थ्याचें प्रदान करण्यासाठीच होते की काय असे वाटते. वालीने सुग्रीवाची पत्नी पळवून नेली त्या वेळी एकाकी पडलेल्या सुग्रीवाबरोबर मारुती होता. वालीला मारुतीने सहज लोळवले असते परंतु त्याच्या सामर्थ्याची विस्मृति त्याच्या आड आली. वालीच्या भीतीने वावरणारा सुग्रीव राम–लक्ष्मणांना ऋष्यमूक पर्वतराजीमध्ये शंकित मनाने विहरतांना पाहून म्हणतो, हे दोघे बहुतकरून वालीचे हेर असावेत. त्यांच्या खऱ्या स्वरूपाचा शोध घेण्याचे कार्य कोणावर सोपवावे असा विचार करून समोर असलेल्या मारुतीला सुग्रीव म्हणतो, हे वानरेंद्रा तुझ्याजवळ चतुरता आहे, अमोघ वाणी आहे. तुझी राजकारणपटुता विख्यात आहे. या शब्दांबरोबर मारुतीला त्या त्या गुणांची स्मृति प्राप्त झाली. रामलक्ष्मण हे कोण आहेत हे शोधून काढण्याचे काम मारुतीने

आपल्याकडे घेतले आणि त्यांत तो विजयी झाला. इतकेच नव्हे तर रामाशी त्याचा झालेला संवाद त्याची विचारपटुता, वाक्पटुता; राजकारणपटुता यांचा चांगलाच प्रत्यय आणून देते. त्यानंतर सुग्रीव आणि राम यांचे सख्य होते. वालीला मारून रामाने सुग्रीवाची पत्नी मुक्त केली. सीतेचा शोध होण्यासाठी दक्षिण भारताच्या टोकाशी उभ्या राहिलेल्या मारुतीला त्याच्या बळाची स्मृति प्रभु रामचंद्राने दिली. त्याबरोबर रामाचे कार्य तो अगदी सहजपणे करूं शकला. ही त्याची शक्ति अखेरपर्यंत कायम टिकली. इतकेच नव्हे तर तींत अपरंपार वाढ झाली आणि तीच शक्ति चिरंतरपणे आजहि त्याच्या सांनिध्यांत अनुभवास येते असा मारुती-भक्तांचा एक अमोल अनुभव आहे.

प्रभु रामचंद्रांच्या कृपेने मारुती चिरंजीव झाला आणि त्याचा प्रत्यय आजही येतो. अर्थात मारुतीजवळ जाण्याचे जे अनेक मार्ग आहेत त्यांतील एक मार्ग म्हणजे "भीमरूपी स्तोत्राचे" विशेषपूर्ण पठण आणि उपासना होय. या स्तोत्राला यामुळे एक प्रकारचे आगळेपण प्राप्त झालेले आहे. हे स्तोत्र आकारविस्ताराच्या मानाने फारच लहान म्हणजे केवळ १७ श्लोकांचे आहे. पण खरे पाहिले तर त्या स्तोत्रांतील अखेरची फलश्रुति वजा करता शिल्लक राहिलेले १३ श्लोक म्हणजेच मारुतीचे खरेखुरे स्तोत्र होय.

हें स्तोत्र समर्थ रामदासस्वामींनी रचले. इतकेच नव्हे तर त्या स्तोत्राचा प्रभाव त्यांनी स्वतः अनुभविला होता. हे स्तोत्र लिहिण्यापूर्वी मारुतीने समर्थांना साक्षात् दर्शन दिलें. तें दर्शन ज्या कारणाने आणि जसें झाले त्याचे यथार्थ वर्णन स्वामींनी केले आहे. इतकेच नव्हे तर त्याच्या फलश्रुतीचा प्रत्यय स्वामींनी अनेकांना आणून दिला होता. त्याचें महत्त्व आपल्याच जीवनमर्यादेत त्यांनीं चांगल्याप्रकारे प्रस्थापित केलें

होते याची ग्वाही अनेक ठिकाणी मिळते. हे स्तोत्र स्वामींनी कसे लिहिले याबद्दल एक दन्तकथा आहे.

स्वामी रामनामाचा जप करीत गोदावरीच्या पवित्र जलात उभे असत. सूर्योदयापूर्वी तपाला उभे राहणारे रामदास सूर्य मस्तकावर येईपर्यंत उभे असत. त्याच वेळी एक माकड त्यांच्या समोरच्या अशोक वृक्षावर निश्चलपणे बसून असे. ते देखील रामदासांचा तो ' श्रीराम जय राम जय जय राम ' हा त्रयोदशाक्षरी जप शान्तपणें ऐकत असे. रामदास भिक्षेला निघून गेले म्हणजे हे माकड त्या ठिकाणाहून कोठेतरी निघून जात असे. हा कार्यक्रम अखण्ड बारा वर्षे चालला होता. स्वामींचा तेरा कोटी जप पूर्ण होताच या माकडाने झाडावरून उडी मारली आणि डोळे मिटलेल्या रामदासांच्या समोर उभे राहून त्यांच्या अंतरात त्याने प्रवेश केला. त्याबरोबर स्वामी भानावर आले. त्यांनी समोर पाहिले तो ते माकड. त्याला पाहाताच स्वामींना आनंद वाटला. त्या माकडाने महाकाय रूप धारण केले आणि स्वामींना कडकडून मिठी मारली. रामदास स्वामींना देखील हे माहीत होते की मारुती रामाशिवाय राहूंच शकत नाही. मारुती हे रामदर्शनाचे प्रवेश-द्वार आहे. ह्या गोड समजुतीनेच त्यांनी मारुतीची जी स्तुति केली ती स्तुति म्हणजे हे स्तोत्र होय. हें स्तोत्र मारुतीदर्शनानंतर उत्स्फूर्तपणे श्लोकबद्ध होऊन स्वामींच्या मुखांतून बाहेर पडले. एक कोटीला एक श्लोक याप्रमाणे रामदासांनी १३ श्लोक लिहिले. त्या एक कोटी जपाची महान पुण्याई एकेका श्लोकाच्या मागे उभी आहे. पुढील चार श्लोक फलश्रुतीचे आहेत आणि ही महती मारुतीनेच रामदास स्वामींना कथन केली. त्याप्रमाणेच ती श्लोकबद्ध करण्याचे कार्य मात्र स्वामी रामदासांनी केले, असे म्हणावे लागते.

अशा या स्तोत्रापासून जी फलश्रुती कथन केली आहे ती मिळविण्यासाठी हे स्तोत्र सिद्ध करावें लागतें. सर्व स्तोत्रांत या स्तोत्राच्या

सिद्धतेची पद्धत फारच सोपी आहे. त्याप्रमाणे याची पथ्ये देखील कमी आहेत.

चैत्र अथवा आश्विन हे महिने या सिद्धतेसाठी प्रशस्त मानले जातात. या महिन्यांच्या पोर्णिमा हे प्रारंभाचे दिवस असावेत. ह्यांपैकी कोणत्याही दिवशी सकाळी लवकर उठून प्रातर्विधी वगैरे संपवावा; स्नान करावें; घरातील असे एक स्थान निवडावे कीं साधना पूर्ण होईपर्यंत आपणास तें ठिकाण बदलावें लागणार नाही. खाली जमीन असेल तर ती गाईच्या शेणानें नित्य सारवलेली असावी आणि फरशी असेल तर ती पाण्याने पुसून घ्यावी. आपल्या समोर मारुतीची तसबीर ठेवण्याचा प्रयत्न करावा. आपण आसनावर बसावे, मारुतीरायांची पूजा करावी, आई वडील आणि आचार्य यांना वंदन करावे आणि एकाग्र चित्ताने या स्तोत्राचा पाठ वाचण्यास प्रारंभ करावा. पाठ वाचताना उच्चारांची शुद्धता आणि मनाची एकाग्रता राखणे हे फार मोठे कार्य आहे. पाठ म्हणतांना मारुतीच्या मूर्ती अथवा फोटोकडे पहात म्हणावा किंवा डोळे झाकून मारुतीच्या मूर्तींचे ध्यान करून पाठ म्हणावा. सगळ्यांत उत्तम मार्ग म्हणजे मारुतीचे ध्यान करून पाठ म्हणणें हे चांगले. त्या योगें मन आणि अन्य इंद्रिये सुद्धां एकटक होतात आणि त्याचा फायदा साधकाला मिळतो. मारुतीकडे पाहून पाठ झणणे वाईट नव्हे पण ती पद्धती गौण आहे. अर्थात कार्यसिद्धी दोन्हीहि मार्गांनी होते. हा पाठ म्हणत असतां आपले रोजचे अध्ययन किंवा पाठ म्हणणे संपेपर्यंत आसनावरून उठूं नये किंवा कोणाही जवळ कोणत्याही कारणासाठी बोलूं नये. इतकेच काय पण अन्य गोष्टीकडे पाहाणें देखील पूर्णपणें वर्ज्य केलें पाहिजे. या प्रमाणे वर्तन न केल्यास साधकाला त्याचा त्रास होण्याचा आणि स्तोत्रसिद्धतेला वेळ लागण्याचा बराच संभव असतो. त्यासाठी या पथ्याचे पालन करणें जरूर आहे. अशा तऱ्हेने रोज अकरा

वेळा या संपूर्ण स्तोत्राचा म्हणजे सतराही श्लोकांचा पाठ म्हणावा. अकरा वेळा पाठ म्हणून पूर्ण झाला कीं क्षणभर विसावा घ्यावा, मारुतीला एक पांढरे पुष्प वाहावें आणि मगच आसनावरून उठावे. याप्रमाणे अखण्ड एकशें एकवीस दिवस या स्तोत्राचे पठण केलें म्हणजे हे स्तोत्र सिद्ध होते. म्हणजे हे स्तोत्र एकूण १३३१ वेळां म्हणावे लागते. अर्थात हे स्तोत्र म्हणतांना म्हणण्याचा वेग देखील नियमित ठेवला पाहिजे. शिवाय हें स्तोत्र कसेंहि करून १३३१ वेळा म्हटले म्हणजे काम होतें अशी या पाठीमागची भूमिका नाही. रोज अकरा वेळा या प्रमाणेंच तें स्तोत्र पठण केलें तर तें पचनी पडतें. एकशें एकवीस दिवसांच्या अवधीत सर्व उपासना याप्रमाणे पचनी पडूं लागते. हें स्तोत्र पचनी पडले म्हणजे सर्व तऱ्हेचा विकास होऊ लागतो. एकदां अगदी पहिल्याप्रथमच या स्तोत्राचे एकशें एकवीस दिवसांचे पठण केलें तरी चालते. याप्रमाणे वर्तन न केल्यास ही उपासना मातते असा शिष्टानुभव आहे. या योगे अंगी प्रचंड सामर्थ्य प्राप्त होते. परंतु त्या सामर्थ्याचा स्वसंरक्षणाशिवाय अन्य कारणासाठी उपयोग केल्यास उपासना शापित ठरून स्वनाशाला कारणीभूत होते. मिळालेलें तर सर्व जातेच पण शरीरांत एखादे व्यंग देखील निर्माण होण्याचा संभव आहे. म्हणून या स्तोत्राच्या बाबतीत कोणत्याहि तऱ्हेची घाई अथवा अनास्था चालत नाही. त्याला जो वेळ द्यावा लागतो तो दिलाच पाहिजे. तरच या स्तोत्राची फळे चांगल्या प्रकारे हाती येतात.

रोज अकरा वेळां याप्रमाणें एकशें एकवीस दिवस हें स्तोत्र पठण केले म्हणजे एक मंडल होते. अशी अकरा मंडलें झाली म्हणजे मारुतिरायांचे साक्षात् दर्शन होते. परंतु त्यापूर्वी प्रत्येक मंडलाच्या पूर्तीनंतर कुण्डलीतील एक एक स्थान शुद्ध होत जाते. अन्य स्तोत्रापेक्षा या स्तोत्रात एक जो फायदा आहे. तो म्हणजे अकरा मंडलांत कुण्डलीतील बाराही स्थाने शुद्ध होतात. आणि त्यामुळे प्राप्त झालेल्या शुचिर्भूतपणामुळेच

मारुतीचे साक्षात् दर्शन होते. त्या आधी सुद्धा प्रत्येक मंडलाच्या पूर्ती-बरोबर मारुतीरायांच्या निरनिराळ्या प्रतिका-प्रतिमांचे दर्शन घडते. त्यांतल्या त्यांत वानर, माकड, अस्वल, सागर, पर्वत यांची दर्शने स्वप्नात अथवा समक्ष देखील होऊं लागतात. अर्थात ही दर्शनें इतकी भयंकर असतात की वानराचे दर्शन झाल्यास ते वानर इतके मोठे असतें कीं आपण उभे राहिलो असतां आपले हात जेमतेम त्यांच्या कटीपर्यंत जाऊन पोहोचतील. प्रत्येक रूपदर्शनाच्या बाबतींत येणारा अनुभव कमी अधिक प्रमाणात असाच आहे. या दर्शनाने साधक कित्येक वेळी इतका घाबरतो कीं त्याला काय करावे तें कळत नाहीं. अर्थात अशा वेळीं साधकाने अत्यंत सावध असणें जरूरीचें आहे. न घाबरतां अशा दृश्यांचें दर्शन घेणें ही उपासना पचनी पडल्याची खरी खूण आहे. याप्रमाणें सावधता बाळगली तर या मानवी देहाचें कल्याण फार दूरवर नाहीं.

मारुती हा भक्तोत्तम म्हणून मानला जातो. इतकेंच नव्हे तर मारुतीच्या भक्तीची ग्वाही तुकारामासारखे संतोत्तम देखील अगदीं मोकळेपणाने देतात. मारुतीच्या बाबतीत तुकारामांचा एक अनुभव त्यांच्या अभंगांतून पहाण्याजोगा आहे.

**शरण शरण हनुमंता । तूज आलो रामदूता ।**
**काय भक्तीच्या त्या वाटा । मज दावाव्या सुभटा ।**
**शूर आणि धीरं । स्वामीकाजी तू सादर ।**
**तुका म्हणे रुद्रा । अंजनीचिया कुमरा ॥**

या अभंगात तुकारामांसारखे भक्तोत्तम मारुतीला भक्तीच्या वाटा विचारतात. यावरून भक्तीचे अंतिम साध्य जे ईशमयता याकडे जाण्याच्या वाटेवर मारुतीराय आहेत. आपल्या सर्व सामर्थ्यानिशी ते आपल्या

भक्ताची आणि त्याच्या पुढच्या कल्याणाची सर्व काळजी वाहतात. त्यामुळे भक्तीच्या सर्वोच्चतेचा दारवंठा मारुतीरायांनी स्वाधीन ठेवला आहे. तो ओलांडू देणे किंवा त्यासाठी सामर्थ्य प्रदान करणे हे सर्वस्वी त्यांच्याच स्वाधीन आहे. श्रद्धेने, निश्चयाने आणि अखंड अशा या स्तोत्र-पाठाच्या द्वारे तो भक्तीचा दारवंठा आपल्याला सहजपणे दिसू शकतो. मारुतीरायाची अशा तऱ्हेची उपासना करणारा साधक अंती सर्व समृद्ध होतो.

**फलश्रुति :**

या स्तोत्राची फलश्रुति स्तोत्राच्या अखेरच्या १४ व १५ या श्लोकांत विशद केली आहे. मारुतीच्या या स्तोत्राची एकदा सिद्धता झाली म्हणजे आर्थिक, मानसिक, देहिक, सांसारिक आणि पारमार्थिक बळ या योगे प्राप्त होते. हे स्तोत्र दररोज सूर्योदयापूर्वी म्हणण्याचा प्रघात ठेवला तर मनुष्य निर्भय आणि विद्यावान होतो. प्रत्येक विद्येत त्याला गति प्राप्त होते आणि तो खऱ्या अर्थाने कीर्तिमान होतो. ज्याला रोज म्हणता येंणे शक्य नसेल त्याने दर शनिवारी आणि पौर्णिमेच्या दिवशी तरी याचा अकरा वेळा पाठ करून मारुतीच्या उजव्या खांद्यावर आणि दोन्ही पायांवर धवल पुष्पें वहावीत.

साडेसाती प्रत्येक मानवाच्या जीवनांत दोन तीन वेळां येतेच. अर्थात् त्याचा अनिष्ट त्रास ज्याला साडेसाती असेल त्याला भोगावा लागतो. शनी ही देवता शांत होणारी नव्हे. आपल्या भक्तावर या देवतेचे प्रेम आहे. त्याप्रमाणे शनीमहाराज संतुष्ट झाले तर आपल्या भक्ताला पृथ्वीचे साम्राज्य देऊं शकतील; परंतु जरा जरी त्यांना राग आला तरी प्राणांतिक वेदना मात्र ते त्याला प्रदान करतील. खुद्द शनीचा जप केला तरी देखील ही देवता इष्टफल देईलच अशी ग्वाही देतां येत नाही. शनी

कोणालाहि भीत नाही पण शनीला मात्र सर्वजण भितात. त्याला न भिणारी, आणि शनीला ज्या देवतेचा धाक आहे अशी देवता म्हणजे मारुती होय. शनीने आपल्या शक्तीचा प्रभाव सर्व देवदेवतांना एक-एकदा दाखविला आहे. परंतु मारुतीच्या पुढें मात्र त्याचा प्रभाव संपला असेंच म्हणावें लागेल. कित्येकजण शनी म्हणजेच मारुती असें समजतात परंतु ते सर्व चुकीचें आहे. कारण मारुती हा वायूसुत आहे तर शनि हा सूर्यपुत्र आहे. यावरून त्यांच्या एकूण चरित्रांतील धागादोरा भिन्न आहे याची जाणीव आपोआपच येईल. तरीपण यांचे संबंध एकदां असे गमतीदार आले आणि त्यांत मारुतीच्या सामर्थ्याची कल्पना शनिदेवाना आली. आपलेहि सामर्थ्य किती मर्यादित आहे याचीहि त्यांना ओळख.

श्रीराम, भगवान् शंकर अथवा बृहस्पती यांना शनीने आपला प्रभाव दाखविल्यावर शनीने एकदां आपला मोर्चा मारुतीकडे वळविला. एके दिवशी रामेश्वराच्या सागरपरिसरांत मारुती प्रभू रामचंद्रांचे भजन करीत स्वस्थ बसला होता. त्या वेळी शनी त्याच्या समोर जाऊन त्याला म्हणाला, हनुमन्ता, आतां मी तुमच्या राशीला येतो. तेव्हा मारुतीने शनीला सांगितले, 'मी रामाचे भजन करीत आहे' मला त्रास देऊं नकोस. पण शनीने तें न ऐकतां मारुतीला त्यानें त्रास देण्यास सुरुवात केली. तेव्हा मारुतीने शनीला चांगला धडा शिकविण्याचा विचार केला. त्याने शनीला पुन्हा बजावले, पण अद्यापपावेतो पराभव माहीत नसलेल्या शनीला तें कुठले रुचायला ? शनीने त्रास देण्याचे कार्य चालूच ठेविले. तेव्हा मारुतीने आपल्या शेपटाला आज्ञा केली की, शनीला सर्वांगे गुंडाळून टाक. त्याबरोबर शेपटीने शनीला पायापासून मस्तका-पर्यंत गुंडाळले. केवळ तोंड तेवढे उघडे होते. एवढे करून मारुति थांबला नाही; तर अशा स्थितीत मारुतीने त्या खडकाळ किनाऱ्यावर इकडून तिकडे जोरांने पळायला सुरुवात केली. मागे शेपटीला बांधलेला शनी

सारखा ठेचकाळूं लागला. शेपटाने बांधला गेल्यामुळे त्यांतून त्याला सुटता येईना. मारुती सारखा पळत होता. अखेर शनीने मारुतीला ओरडून थांबावयास सांगितले. कांही काळाने मारुती थांबला तेव्हां शनीचे सर्वांग दुखत होते. जखम मात्र कोठेंच नव्हती. शनी मारुतीला शरण आला. आणि म्हणाला, 'हे वायुपुत्रा' मला क्षमा कर. तुझ्या वांट्याला मी पुन्हा कधीहि येणार नाही. तेव्हा मारुतीने सांगितले– माझ्याच नव्हे तर माझ्या भक्तांच्या वाटेला जरी तूं गेलास तरी तुला आत्ताच्यासारखे दुःख पुन्हा भोगावे लागेल. तुला ही अट मान्य असेल तरच तुझी सुटका होईल. शनीने मारुतीची ही अट मान्य केली. मारुतीनें त्याला मुक्त केला तेव्हा तो घरी आला. मातेने त्याला तेल लावून स्नान घातले. तेव्हा त्याला जरा कुठे बरें वाटले. पण त्या दिवसापासुन मारुतीच्या अगर मारुती–भक्ताच्या वाटेस जाण्याचे धाडस शनीनें कधीच केलें नाही. ह्याचाच फायदा आजहि मारुतीच्या भक्तांना मिळतो. ज्याला साडेसाती आहे अशा माणसाने रोज या भीमरूपी स्तोत्राचे पाठ केले तर त्याचा सर्व प्रकारचा त्रास कमी होतो. शनीला अशा धाकानें दूर ठेवणें त्याला प्रसन्न ठेवण्यापेक्षां सोपें आहे. म्हणून अनेक लोक मारुतीलाच शनी समजून त्याला तेल, शेंदूर वगैरे वाहाणें चांगले आणि पुण्यकारक समजतात. परंतु तें योग्य आहे असें मात्र नव्हे.

लहान मुलें भीत असतील तर या मारुती स्तोत्राचा फार मोठा उपयोग होतो. ज्यानें हें स्तोत्र सिद्ध केलें आहे अशा माणसानें एकवार स्तोत्र म्हणून दिलेला अंगारा, पाणी अथवा तांदूळ भीति नाहीशी करतात. किंवा लहान मुलाला मांडीवर घेऊन या स्तोत्राचा पाठ केल्यास त्या मुलाची भीति नाहीशी होते. इतकेंच नव्हें तर या स्तोत्राच्या बाबतीत असाहि एक अनुभव आहे कीं मन्दबुद्धीच्या मुलांना हें स्तोत्र म्हणून मंतरलेलें पाणी दिलें तर एक वर्षांत त्या मुलाच्या

बुद्धीत फरक पडतो. ज्यांना बाहेरची बाधा झाली असेल त्यांनी या श्लोकाचे पाठ सदैव करावेत. त्यांची बाधा एक्कावन्न दिवसांत नाहीशी होतें. इतकेंच नव्हे तर ज्या ठिकाणीं असा पाठ रोज म्हटला जातो त्या ठिकाणी बाधित वारें राहूं शकत नाहीं. एक दोन नव्हे तर असे अनेक उपाय या स्तोत्रांनीं करता येतात आणि मानवाचें दुःख पूर्णपणें नाहीसे होतें. त्याच्या मनाला उत्तम प्रकारें गति लाभते. सर्व क्षेत्रांत त्याला प्रतिष्ठा प्राप्त होते.

## भीमरूपी स्तोत्र

भीमरूपी महारुद्रा वज्रहनुमान मारुती ।
वनारी अंजनीसूता रामदूता प्रभंजना ॥१॥
महाबळी प्राणदाता सकळां उठवी बळें ।
सौख्यकारी दुःखहारी धूर्त वैष्णवगायका ॥२॥
दीननाथा हरीरूपा सुन्दरा जगदंतरा ।
पातालदेवताहंता भव्य सिंदूरलेपना ॥३॥
लोकनाथा जगन्नाथा प्राणनाथा पुरातना ।
पुण्यवंता पुण्यशीला पावना परितोषका ॥४॥
ध्वजांगे उचली बाहो आवेशें लोटला पुढें ।
काळाग्नि काळरुद्राग्नि देखतां कांपती भयें ॥५॥
ब्रह्माण्डे माइली नेणों आंवळे दन्तपंगती ।
नेत्राग्नीं चालिल्या ज्वाला भ्रुकुटी ताठिल्या बळें ॥६॥
पुच्छ तें मुरडिलें माथां किरीटि कुण्डलें बरी ।
सुवर्णकटिकांसोटी घंटा किंकिणी नागरा ॥७॥

ठकारे पर्वता ऐसा नेटका सडपाताळू ।
चपलांग पाहता मोठे महाविद्युल्लतेपरी ॥८॥

कोटिच्या कोटी उड्डाणें झेपावें उत्तरेकडे ।
मंदाद्रिसारिखा द्रोणु क्रोधें उत्पाटिला बळें ॥९॥

आणिला मागुता नेला आला गेला मनोगती ।
मनासी टाकिले मागें गतीसी तुळणा नसे ॥१०॥

अणूपासूनि ब्रह्माण्डा येवढा होत जातसे ।
तयासी तुलना कोठे मेरुमान्दार धाकुटे ॥११॥

ब्रह्माण्डाभोवते वेढें वज्रपुच्छें करूं शके ।
तयासी तुलना कैची ब्रह्मांडीं पहातां नसे ॥१२॥

आरक्त देखिले डोळां ग्रासिले सूर्यमण्डलां ।
वाढतां वाढतां वाढें भेदिलें शून्यमंडला ॥१३॥

फलश्रुति–धनधान्यपशुवृद्धि पुत्रपौत्र समस्तही ।
पावती रूपविद्यादि स्तोत्रपाठें करूनियां ॥१४॥

भूतप्रेतसमंधादि रोगव्याधि समस्तहि ।
नासती तुटती चिंता आनंदें भीमदर्शनें ॥१५॥

प्रार्थना – हे धरा पंधरा श्लोकी लाभली शोभली भली ।
दृढदेहो निःसंदेहो संख्या चन्द्रकलागुणें ॥१६॥

रामदासी अग्रगण्य कपिकुलासी मंडन ।
रामरूपीं अंतरात्मा दर्शनें दोष नासती ॥१७॥

✤ ✤ ✤

# श्री व्यंकटेशस्तोत्र

व्यंकटेशस्तोत्र हे महाराष्ट्रांतील एक प्रमाणभूत आणि प्रभावी स्तोत्र म्हणून समजले जातें. भगवान् विष्णूच्या एका प्रभावी स्वरूपाचें हें करुण स्तवन आहे. हें स्तोत्र संपूर्ण मराठी असून त्याची रचना ओवी छंदात आहे. याच्या एकूण १०८ ओव्या आहेत. तसें पाहिलें असता इतर स्तोत्रांच्या मानाने हे स्तोत्र बरेच अलीकडे म्हणजे इ. स. १६७०च्या अलीकडें पलीकडे आहे. याचा रचनाकार देवीदास किंवा देवदास हा चैतन्यसांप्रदायी पुरुष आहे. याचा काल इ. स. १५८० ते १६८० असा आहे. हा यजुर्वेदीय शाखेचा ब्राह्मण असून अत्यंत धर्मपरायण होता. परंतु त्याच्या दुर्देवाने त्याला द्रारिद्य प्राप्त झालें. असें सांगतात कीं त्याची पत्नी एकदां त्याच्या दारिद्याला कंटाळली. तिनें नवऱ्याला सांगितले की आपले दारिद्य कायमचे नाहीसे होईल असे कांही तरी करा. तुम्ही एवढे शिकलेले परंतु तुमच्या विद्येचा आदर करणारा

कोणीही नाही. त्यापेक्षा तुम्ही ती विद्या ईश्वरार्पण करा आणि तिच्या बदल्यांत उदरभरणाची कांही विद्या घेतां आली तर पहा.

देवीदासाने तिला समजावून सांगितले की मी जी विद्या घेतली ती फुकट जाणारी नाहीं. विद्या केवळ गुरूकडून घेतली म्हणजे तिचा उपयोग करतां येतोच असे नाही. ती विद्या चांगली रुजावी लागते, पचावी लागते तरच तिचा परिणाम दिसतो. त्यासाठी मला आणखी तीन वर्षांचा अवधी लागेल. तोपर्यंत आपले दारिद्य दूर होणे कठीण आहे. ईश्वरानें आपल्या भोवती निर्माण केलेली परिस्थिती आपल्या केवळ प्रयत्नानें आपणास दूर करतां येणार नाही. त्या प्रयत्नाचे अधिष्ठान देवच असले पाहिजे. आपण दोघेही त्या ईश्वराची करुणा भाकूं. मला खात्री आहे की तो दयाधन आपल्यावर दयेचा वर्षाव करील. परंतु त्या मानिनीला ते कुठलें रुचायला. आपला नवरा आळशी आहे, आपण करतो तेच योग्य असा हट्टीपणाही त्याच्या अंगीं पूर्णपणे आहे. त्यामुळे आपल्या वाट्याला आर्थिक वैभव मुळीच येणार नाही. या विचाराचें प्रत्यंतर पुढे पुढे तिच्या कृतीत होऊं लागले. प्रत्येक वेळीं ती नवऱ्याला दोष देऊं लागली. त्यामुळे नवरा अत्यंत काळजीयुक्त राहूं लागला, खाल्लेलें अन्न त्याच्या अंगी लागेना. दिवसें दिवस तो क्षीण होत चालला. परंतु त्याच्या पत्नीच्या विचारांत मात्र फरक पडला नाही. पूर्वीप्रमाणेंच तिचें सारें आचरण चालूं होते.

शेवटी एक दिवस ती नवऱ्याला म्हणाली, लक्ष्मीची दया आपल्यावर होईल असे कांही मला वाटत नाही. तेव्हां तिच्या सौभाग्य-स्वामीची कृपा संपादन करावी असे मला वाटूं लागले आहे.

त्यावर नवरा काही बोलला नाही. अशाच अवस्थेत जर आपला नवरा राहिला तर आपल्या पदरीं वैधव्य येईल आणि जगांत आपल्याला

तोंड सुद्धां काढता येणार नाही असे म्हणून तिनें आपल्याच मनाशीं समजूत घातली आणि प्रेमळ शब्दानें ती नवऱ्याला म्हणाली " स्वामीं, भगवान् विष्णूंची जर आपल्यावर कृपा झाली तर निदान पुढील जन्मी तरी आपणास सुखांत राहातां येईल. आपण दोघेही त्या संकटनाशक देवाची आराधना करूं या."

बायकोच्या अंगचा ताठा कमी झाला आहे. तिची विवेकी वृत्ती जागृत झाली आहे असे पाहून तो तिला म्हणाला, " स्त्रिये, मी आता फारच क्षीण झालों आहे तेव्हां या घरांतून न जाता भगवंत ठेवतील त्या स्थितीत राहूनच तुला माझ्याबरोबर दिवस कंठावे लागतील. याच अवस्थेंत आपण देवाची कृपा संपादन करूं या. पत्नीने त्याच्या म्हणण्याला रुकार दिला. आपत्तीचा नाश करणारा देव म्हणून त्यांनी विष्णूची स्थापना केली आणि त्याची आराधना करण्यास प्रारंभ केला. देवीदास मानसोपचारांनी भगवंताची उपासना करी. फळें, फुलें आणि अन्य पूजा-साहित्याचा अवडंबर त्यानें कधीही उपयोगांत आणला नाही. त्याच्या त्या ध्यान–पूजेंत दिवसाचा किती काळ व्यतीत झाला याचेंही त्याला भान नसें.

एके दिवशी असाच तो आराधना करीत असता मध्यरात्र झाली. देवीदासाचें ध्यान चालूच होतें. निस्तब्ध अवस्थेंत त्याच्या सोबतीला भगवान् विष्णूशिवाय कोणीही जागे नव्हते. पत्नीला गाढ झोंप लागली होती. घटका दोन घटका गेल्या. देवीदासाच्या पत्नीला स्वप्न पडलें. तिने स्वप्नांत एक प्रचंड नाग पाहिला. त्या नागाने आपल्या नवऱ्याच्या मस्तकावर आपली फणा धरली असून आपला नवरा ध्यानपूर्ण अवस्थेंत बसला आहे. सुवर्णाच्या रंगाप्रमाणे त्या नागाचा वर्ण होता. देवीदासाच्या आसनाभोंवती त्याने वेढा दिला होता आणि त्याच्याप्रमाणेंच आपली फणा मस्तकी धरून तो निश्चल उभा होता. स्वप्न पाहून मनांत ती

घाबरली. तिने जवळ पाहिले अंथरूणावर नवरा नव्हता. तिच्या पोटांत चर्रर झाले. भीतीने तिच्या अंगाला घाम फुटला. काय करावें तें समजेना. अशा स्थितीत धीर करून ती उठली आणि बेभान होऊन ती देवघरांत आली.

तिने स्वप्नांत जें पाहिलें त्याप्रमाणें देवघरांत सर्व देखावा तिला दिसला. देवीदास स्वस्थ होता. आपली फणा त्याच्या मस्तकावर धरुन नागाने त्याला वेढा दिला होता बेभामपणे ती धांवत आली. सर्पाच्या वेढ्यातून नवऱ्याला वाचवावें, मग त्या नागाने आपल्याला दंश केला तरी चालेल असे म्हणून तिने एकदम "स्वामी ऽऽ" म्हणून किंकाळी फोडली. त्या सर्पाला हाताने पकडून दूर करण्याचा प्रयत्न केला. सर्पाला स्पर्श होतांच ती मूर्छित होऊन पडली. त्या किंकाळीने आपल्या ध्यानमग्नतेतून भानावर आलेल्या देवीदासाने पाहिले. आपली पत्नी मूर्छित पडली असून तिच्वा हातीं सोन्याचा सर्प आहे. त्याने तिला सावध केले. पण हातांतला सर्प मात्र तसाच होता. त्यामुळे तिने पुन्हा मोठ्याने किंकाळी फोडली आणि अर्धवट मूर्छित क्षाली. देवीदासानें तिचें मस्तक आपल्या अंकावर घेतले. तिच्या डोळ्यांना पाण्याने स्पर्श केला. ती चांगली शुद्धीवर आली तेव्हां तिला आपल्या नवऱ्याचे तेजःपुंज मुख दिसले. ते पाहून ती आनंदली आणि म्हणाली "स्वामी, त्या नागानें तुम्हाला कांही इजा तर केली नाहीना?"

"नाही. मला काहीच इजा झाली नाहीं. पण त्यानें आपल्या संसारातली इजा मात्र कायमची घालविली. पहा. तुला जो नाग वाटला तो नाग नाही. तुझ्या हातांत तो अजूनही तसाच आहे."

तिनं आपल्या हाताकडे पाहिले. तो नाग तिच्या हाती तसाच होता पण तो नाग सुवर्णाचा होता. शुद्ध सोन्याचा तो लांबलचक नाग

पाहून तिला अतिशय आनंद झाला. नवऱ्याच्या म्हणण्याची तिला प्रचिती आली. तिने ईश्वराचे आभार मानले.

सोन्याच्या नागाचा लाभ होतांच त्या दांपत्याचें सर्व दैन्य संपलें. त्यांनी भगवान विष्णूची कायमची आराधना चालू ठेविली. त्या उपासनेने देवीदासांची वाणी आणि लेखणी यांना अमोघ सामर्थ्य प्राप्त झाले. आपले सर्व दैन्य ईश्वरचरणीं अर्पण करतांना त्यांची वाणी मधुर बनली. मधुतेची साथ घेवून शब्द मुखावाटे बाहेर पडत. त्यांनी आपले मनोगत अखेर अक्षरांकित केलें आणि ईश्वरचरणीं वाहिलें. त्यावेळी भगवान् विष्णूला त्यानीं प्रार्थना केली. " देवा, तुझ्या पायी चंचल लक्ष्मी स्थिर झालेली आहे. आमच्याप्रमाणें अगाध दुःख तू कोणालाही देऊं नकोस. जे स्मरण करतील त्यांना जें जें हवे असेल तें तें देऊन त्यांचा संसार सुफल कर, सर्व वैभवाने त्या भक्तांचे घर भरून जाऊ दे. " हीच त्याची प्रार्थना त्याने आपल्या स्तोत्रांत ग्रथित केली आहे.

या स्तोत्राचे प्रामुख्याने चार भाग पडतात. श्रेष्ठांच्या संकेताप्रमाणें ग्रंथ निर्मितीचे आपले कार्य निर्विघ्नपणे पार पडावे म्हणून देवीदासाने विघ्नेश्वराच्या मंगल नामघोषाचा उद्‌घोष करण्याऐवजी विश्वव्याप्त प्रणवाचा उच्चार करून भगवान् विष्णूच्या अत्यंत आवडत्या नावानें हांकारून त्याला **आपण** आता काय सांगत आहोत तें ऐकावें अशी एक भावरूप प्रार्थना केली आहे. ज्ञानेश्वरांच्या मंगलाची री देवीदासानेही ओढली आणि आपल्या त्या बारीकशा ग्रंथाला साजुकता आणली. ज्ञानदेवांचा नमनक्रम यानेही तसाच अवलंबिला आहे. ॐकाराचा प्रारंभ करून हे स्तोत्र म्हणजे एखादें वेदसूक्त असावे इतका ढोबळ संकेत यानें स्वतः जवळ बाळगूनच ही स्तोत्ररचना केलेली आहे.

आपण कसे अनाथ होतो, तुझ्या नामाचा आणि तद्‌जन्य प्रीतीचा स्पर्श लाभला नसता तर माझें काय झालें असते ? असा स्पर्श ज्याला

लाभला नाही त्याला या जगती कसा वागवितोस आणि ज्याला तुझी आठवण आहे, तुझा मंगल स्पर्श अनुभवाला यावा म्हणून जे प्रयत्नशील आहेत, अधीर आहेत त्यांच्यासाठीं तू कसा शिणतोस याचे मधुतर वर्णन करून देवीदासानें आपल्या तृतीयांश कार्याची व्याप्ती केली आहे. तू स्वतः तसे पाहिले असता अत्यंत दुर्लभ आहेस परंतु तुझे नांव सुलभ असल्यानें आणि त्याच्या उच्चारणांत अपार शक्तीचा अनुभव असल्यानें एका प्रकारे आमच्यासारख्या दीनजनांवर तू कृपाच केली आहेस. त्या भगवंताच्या नामाची शक्ती कशी अमित आहे याचे वर्णन करताना देवीदास म्हणतात.

**तुझें नाम पतितपावन । तुझें नाम कलिमलदहन ।**
**तुझें नाम भवतारण । संकटनाशन नाम तुझें ॥ ३९ ॥**

अशा या नांवानी तुला हाकारतांना जीवकोटीचा एक एक फेरा तुटत जातो आणि तुझी सगुणमूर्ती अंतरांत आविर्भूत होते; हे स्पष्ट करण्यासाठी ४२ ते ५१ या दहा ओव्यांत चौऱ्यांशी नावें गुंफून, सर्वव्यापी भगवंत दहा ओव्यांत दशांगुले उरला असल्याची जाणीव देवीदासानें अगदीं सहजपणे करून दिलेली आहे. हा दशांगुले परमात्माच आविर्भूत होतो. त्याला ज्या ठिकाणी आठविला त्या ठिकाणी तो प्रकटतो असा देवीदासाचा चिर विश्वास आहे. हा भगवंत आविर्भूत झाला कीं त्याचे दर्शन या इंद्रियांना चोरूनच घ्यावे लागतें. तें स्वरूप कसे आहे. देवीदासाला जसा त्या रूपाचा प्रत्यय आला त्याप्रमाणे वाचेनें होण्याजोगे जे वर्णन आहे किंवा भगवंताच्या भावदर्शनांत विसरून जें बोललें गेले ते सर्व देवीदासानें ग्रथित केलें आहे. त्या अंतःचक्षूंपुढें हा भगवन्त साकारला की कसा दिसतो त्याचें वर्णन ५५ ते ७० या ओव्यांत व्यक्त केलें आहे.

निर्गुण निराकार असा भगवंत भक्ताच्या अंतरांत साकारतो. बाह्योपचारानें त्याची पूजा करणें अशक्य आहे. इतकेच काय समोर एखादी मूर्ती ठेवून त्यांत मनांत निर्माण झालेले ध्यान ओतून देखील त्याची पूजा करतां येणें शक्य नाही. कारण बाह्योपचार ही उपाधी आहे. भगवंताला कोणताही उपचार करण्यापूर्वी आपल्या विषयलोलुप इंद्रियांचा त्याला स्पर्श होतो. आणि त्यामुळे मलीन झालेला उपचार भगवंताला करावा हें सज्जन आचरण नव्हे. म्हणून अंतरांत आविर्भूत झालेल्या मूर्तीची पूजा मनाने करण्यासारखे उत्तम साधन नाहीं. म्हणून देवीदास मनानें या आविर्भूत विष्णूची पूजा कशी करावयाची याला क्रम देतात. त्या क्रमानें पूजा केल्यावर संतुष्ट झालेल्या भगवंता-जवळ त्यानी आपलें इष्टकाम कथन केले आहे. संसारी जीवांना ज्या ज्या गोष्टींची उणीव आहे त्या त्या गोष्टींच्या चिंतनांत मानव रमतो. त्यामुळे मनांत भगवंताचें स्मरण करायला मुळीच वेळ होत नाही. इतकेंच नव्हे तर त्या भगवंताचे कित्येक वेळीं विस्मरण देखील होते. या विस्मरणापासून जीवन दूर व्हावे, त्याला सर्व सांसारिक वैभवाची प्राप्ती व्हावी आणि त्या वैभवाचा विनियोग त्याने ईशप्रसाद नित्य राहण्यासाठी करावा असा मानस या स्तोत्राच्या पार्श्वभूमींत आहे. संसार सुफल करून परमार्थाची ओळख करून देणारें असें हें महान स्तोत्र आहे. या स्तोत्राची फलश्रुती सांगण्यांत आली आहे. ८२ पासून ८९ व्या ओवीपर्यंत त्याचा विस्तार करण्यांत आला आहे. यानंतर आपल्यावर भगवंताचा प्रसाद कसा झाला आणि तसा तो होण्यासाठी अन्य जनांनी काय करावें याचें विवेचन केलें आहे.

या स्तोत्राचे एक मंडळ म्हणजे एकवीस आवृत्त्या होत. तरीपण निरनिराळ्या आवृत्त्या केल्या असतां जी निरनिराळी फळें प्राप्त होतात त्याची पण नोंद देवीदासांनी आपल्या स्तोत्रांत केली आहे.

(१) सर्व प्रकारची इच्छा पूर्ण होण्यासाठी एका मंडळाचें पठण करावें.

(२) ज्याला पुत्राची इच्छा आहे त्यानें नव्वद दिवस आणि कन्येची इच्छा असणाऱ्यानें १२१ दिवस या स्तोत्राचें रोज एक वेळ, याप्रमाणें पठण करावें.

(३) धनाची इच्छा असणाऱ्याने केवळ २१ दिवस पठण केले असतां त्याची इच्छा पूर्ण होते.

(४) अनेक प्रकारची असाध्य दुखणी बरी करण्यासाठी एक मंडळ पुरे होते.

ही सर्व फळें संसारी जीवांसाठीं आहेत. या स्तोत्राचा उपयोग संसारी जीवांसाठी अधिक होतो. ग्रंथांत दिलेल्या या फळांखेरीज अन्य फळें देखील अनुभवांत आहेत.

विशेषतः या स्तोत्राचे पठण स्त्रियांना अधिक लाभदायक आहे. आपलें सौभाग्य चिरंतन राखण्यासाठी या स्तोत्राच्या पाठांचा फार मोठा उपयोग होतो. रोज एक मंडळ याप्रमाणे एकशें एकवीस दिवस याचें पठण केल्यास चिरंतन सौभाग्याची प्राप्ती होते. इतकेंच नव्हे तर नवऱ्याच्या अनेकविध व्याधी आणि दुःखे दूर करण्याचें सामर्थ्य या स्तोत्रांत आहे. त्याचा विधी तसें पाहिले असतां अत्यंत सोपा आहे. परंतु बंधनयुक्त आहे.

रोज सकाळीं पहाटे उठून शुचिर्भूत व्हावे. शुभ्र वस्त्रें परिधान करावीत. सकच्छ नेसणे ही अत्यंत आवश्यक अशी बाब आहे. कारण अंतर शुचिता आणि शरीर-शुचिता याच्याशीं वस्त्रपरिधानाचा मोठा संबंध आहे. भक्तिभावाने केले म्हणजे ईश्वराला पोहोचतें असला स्ववृत्ती-युक्तिवाद या कार्यांत उपयोगी पडत नाही. शुभ्र वस्त्रें परिधान केल्यावर

कुंकू आणि हळद लावावी. सुवर्ण आणि मौक्तिक यांचे अलंकार परिधान केल्यास चालतील. केस बांधलेले असावेत. या प्रमाणे स्वतःची तयारी झाल्यावर चटई, कांबळी किंवा धूतवस्त्राच्या आसनावर बसावें. तोंड पूर्वेस करावें. समोर पाट अथवा चौरंग ठेवावा. त्यावर मूठभर तांदुळाची राशी करावी आणि त्यावर विष्णू मूर्तीची स्थापना करावी. विष्णूमूर्ती नसेल तर सुपारी ठेवावी. सुपारी खराब झाल्यास बदलावी. अन्यथा बद्लण्याची आवश्यकता नाही. त्या सुपारीची पूजा करावी. त्यांत पांढरे पुष्प आणि तुळसीपत्रें याशिवाय अन्य पुष्पें नसावीत. त्या सुपारीच्या पुढें आपणास जी इच्छा असेल ती एका कागदावर लिहून ठेवावी. नवऱ्याचे नांव त्या चिठीत लिहावें. विशेषतः व्यावहारिक नामापेक्षा नाक्षत्रनाम लिहिणें अधिक चांगलें. ती चिठ्ठी मनांत वाचावी. कोणाला कळूं नये याची दक्षता घ्यावी. पुन्हा भगवंताला नमस्कार करावा. दीप आणि धूप किंवा उदबत्ती लावावी. संपूर्ण पाठ होईपर्यंत दीप विझणार नाही याची खात्री घ्यावी. नंतर एकाग्र चित्ताने पाठाला सुरवात करावी. प्रत्येक पठण पुष्पाने मोजावे. पाठ पूर्ण होतांच ती सर्व पुष्पें भगवंताला अर्पण करावीत. दुधाचा नैवेद्य दाखवावा आणि प्रस्थापित भगवंताचे विसर्जन करावे. हे व्रत स्त्रियांनींच करावयाचें असल्याने मासिक नैसर्गिक अडचणीचे चार दिवस खंड पडेल. तो विचारात घेऊन एकशे एकवीस दिवसाचें पठण पूर्ण करावें. पठण करतांना कोणाशीही बोलू नये अगर खुणा करून कांहीही सांगू नये. पठण पूर्ण झाल्यावर जमल्यास सुहासिनी आणि गाय यांना हळदकुंकू द्यावें. यापैकी कांहींच साधलें नाहीं तर घरांतील देवीची आठवण करून स्वतः हळद कुंकू लावावें.

एकशें एकवीस दिवस ज्या दिवशीं पूर्ण होतील त्या दिवशीं गव्हाची खीर हा प्रसाद करून शुचिर्भूत ब्राह्मण आणि वृद्ध सुहासिनीला भोजन

द्यावें आणि तिचें आशीर्वाद घ्यावेत. शेवटच्या दिवशीं आपली चिठी अग्नीला अर्पण करावी अगर सुपारी आणि तांदूळ यांच्यासह वाहत्या जलांत विसर्जन करावी. हें सौभाग्यदायी व्रत आहे. याचा अनुभव अगदी बोलका आहे.

रोज एक वेळ याप्रमाणें शुचिर्भूतपणें आसनीं बसून एकाग्र चित्ताने एकशें एकवीस दिवस याचे पठण केले असतां हें स्तोत्र सिद्ध होते.

धनार्थी आणि अनेकविध प्रापंचिक अडचणी दूर करण्यासाठी, त्याचप्रमाणें ईश्वराचें दर्शन मिळण्यासाठीं या स्तोत्राचा एक स्वतंत्र पठण विधी आहे.

रोज रात्री स्नान वगैरे करून शुचिर्भूत व्हावें. शुभ्र वस्त्रे परिधान करावीत किंवा सोंवळ्याने पाटाशिवाय अन्य कोणत्याही आसनावर बसावें. मस्तकीं गंध लावावें. दीप (तेलाचा अगर तुपाचा) तेवत ठेवावा आणि ठीक बारा वाजतां पठणास प्रारंभ करावा. एकवीस वेळां पठण करावें. एकाग्र चित्ताने पठण करतांना अन्य कोणाकडेही पाहू नये; अगर कोणाशीं बोलूं नये. अशा तऱ्हेनें अनेक अडथळे येण्याचा संभव असतो. अर्थात ती एक प्रकारची परीक्षाच आहे. या कोणत्याही अडथळ्यांना भिण्याचें कारण नाहीं. इतकेंच नव्हे, अनेक विलोभनीय किंवा तिरस्करणीय दृश्यें देखील दिसतील. तरी पण त्यांचा विचार करूं नये. या अन्यथा गोष्टीकडे लक्ष दिल्यास भगवंताचा अपमान होतो याची जाणीव ठेवावी. एकवीस दिवसांच्या वाचनानंतर ईश्वराची पूजा करावी. शक्यतर दुधाचा अभिषेक करावा. या वेळीं केवळ पुरुषसूक्त सोळा वेळां म्हणावें. त्या दुधाचा प्रसाद म्हणून उपयोग करावा. ही या व्रताची सांगता आहे.

याशिवाय ज्याला धन हवें असेल त्यानें देखील भगवान विष्णूची या स्तोत्रानें प्रार्थना करावी. लक्ष्मीचा नित्य सहवास लाभावा म्हणून भगवान् विष्णूना संतुष्ट करावें. परंतु भगवंताच्या समोर गरुड, हनुमंत, किन्नर, नारद वगैरे भक्त आहेत. हे भक्त भगवंताना मुळीच दूर जावू देत नाहीत. सदैव त्यांच्या समवेत त्यांच्या सेवेत आपलें जीवन व्यतीत करतात. ज्या ठिकाणीं भगवंत आहेत त्या ठिकाणीं लक्ष्मी सदैव असते. परंतु लक्ष्मी असेल तिथें भगवंत असेलच असें मात्र नाही. परंतु एकच वेळ अशी आहे कीं ज्या वेळी प्रभू आणि लक्ष्मी दोघेजण विश्रांतीसाठी एका ठिकाणीं येतात. त्या ठिकाणी पांच घटिकापर्यंत ते निवास करतात आणि मग आपापल्या भक्तांना दर्शन देण्यासाठीं बाहेर पडतात. असें हें त्यांचे स्थान अश्वत्थ वृक्ष. भगवंतांनी अर्जुनाला श्रीमत् भगवत्गीतेच्या दहाव्या अध्यायात ज्या आपल्या विभूती सांगितल्या त्यांत 'अश्वत्थः सर्ववृक्षाणाम्' म्हणून आपली एक विभूती कथन केली आहे. त्या अश्वत्थ वृक्षावर रात्रीच्या पहिल्या प्रहरीं लक्ष्मी आणि विष्णु वास करतात. अलीकडच्या वेळेप्रमाणें बोलावयाचें झाल्यास सकाळीं साडेपाच पर्यंत त्यांचा वास या वृक्षावर असतो. त्यावेळी त्या वृक्षाचें दर्शन घेऊन आणि पूजा करून विष्णूच्या प्रसादाची इच्छा केल्यास ती त्वरेनें पूर्ण होते. विष्णूच्या मागोमाग लक्ष्मी देखील घरांत प्रवेशते आणि जो पर्यंत भगवान् विष्णूची उपासना चालूं आहे तोंपर्यंत विष्णू आणि लक्ष्मी तेथून हलत नाहींत. हें व्रत अतिशय सोपे आहे. स्त्री अथवा पुरुष यांपैकी कोणींहि हें व्रत केल्यास त्याचें फळ त्याला मिळतें.

पहाटे स्नान करून शुभ्र वस्त्रे परिधान करावीत. हातांत पाण्याचा भरलेला तांब्या आणि जमल्यास अन्य पूजा साहित्य घेवून ज्या पिंपळाची मुंज झालेली आहे अशा पिंपळापाशीं यावें. त्याच्या मुळावर तांब्यातील पाणी वहावें आणि अन्य उपलब्ध साहित्याने पूजा करावी, प्रदक्षिणा

करावी आणि उत्तराभिमुख होऊन व्यंकटेश स्तोत्राचा एक पाठ करावा. पाठ पूर्ण झाल्यावर त्या पिंपळाला दोन प्रदक्षिणा घालाव्यात. प्रदक्षिणा पूर्ण झाल्यावर त्याला घट्ट मिठी मारून आपलें मस्तक आणि स्कंध यांचा वृक्षाला स्पर्श होईल असें पाहावें. त्यानंतर त्वरेनें घराच्या वाटेकडे तोंड करावें आणि चालूं लागावें. घरी येतांना व्यंकटेशाचें चिंतन करावें. कोणीं मार्गी भेटल्यास त्याला नमस्कार देखील करूं नये. मग बोलणें तर राहोच. याप्रमाणें येतांना मागें जरा देखील पाहावयाचें नाहीं. घरी आल्यावर घराच्या प्रवेशद्वारातून आंत आल्यावर पुन्हा आलेल्या वाटेकडे तोंड करावें आणि नमस्कार करावा. हें व्रत शनिवारींच करावयाचे असून असें सोळा शनिवार झाले म्हणजे हें व्रत पूर्ण झाले असें समजावें.

या व्रताचें आचरण चालूं असतां एखादी शुभ्रवस्त्र परिधान केलेली सुहासिनी अवचितपणें घरीं आली तर तिला पांढरी पुष्पें देऊन गौरवावे, जमल्यास दूध द्यावें, किंवा साखर द्यावी. तिची बोळवण करतांना ती अगदीं बाहेरच्या दारातून जावूं लागली आणि तिची पाठ आपल्याला दिसली कीं तिच्या पायांना नमस्कार करावा आणि मग घरांत यावे. याप्रमाणें हें व्रत केल्यास लक्ष्मीचा वास घरी होतो.

संततीसाठी ज्या वेळी या स्तोत्राचे पठण करावयाचे असतें तेव्हां ते उभयतांनीं करावयाचे आहे. पुत्रासाठीं नव्वद दिवस आणि कन्येसाठीं एकशेवीस दिवस हे स्तोत्र म्हणावे लागतें. या काळांत ब्रह्मचर्याला फार मोठे स्थान आहे. या काळांत स्त्रियांच्या नैसर्गिक अडचणीच्या चार दिवसांत पुरुषानी दोन पाठ करावेत. कोणत्याही तऱ्हेचे अशौच असेल तर या स्तोत्राचा पाठ करूं नये.

या सर्व लौकिक वैभवाचा आढावा घेतल्यावर त्यांतून परमार्थाकडे, साधकाचे मन लागते. इतर स्तोत्रापेक्षा या स्तोत्राची मांडणी थोडी

वेगळी आहे. हे स्तोत्र प्रथम साधकाला लौकिक दृष्टीने समृद्ध होण्याचे मार्ग सांगते. लौकिक वैभव मिळविल्यानंतर तृप्त झालेल्या साधकास परमार्थाकडे वळतांना अडचण पडणार नाही. रिकाम्या पोटीं तत्त्वज्ञान पचत नाही असा या ग्रंथकाराचा मानस दिसतो. त्यामुळे सांसारिक आणि पारमार्थिक लाभाचे विवरण देखील या ग्रंथात केले आहे. परमार्थात देखील समृद्धता प्राप्त व्हावी म्हणून देवीदासाने या स्तोत्रात मानसपूजेचा उपक्रम केला आहे.

मानवी मनांत निर्माण होणारे सर्व भाव निरनिराळ्या पूजा साहित्याने नटवून ईश्वराला अर्पण करणें याचें नांव मानसपूजा असें आहे. मनापुढें भगवान विष्णूची मूर्ती आणणें आणि पूजा समाप्त होईपर्यंत तशीच टिकविणें हें अत्यंत बिकट असें कार्य आहे. परंतु त्यासाठी देखील देवीदास आपल्या या स्तोत्रांत एक अल्पसा उपाय सांगतो आणि तो म्हणजे भगवंताच्या नांवाचा जप. त्यानें भगवंताची जी चौऱ्यांशीं नावें या स्तोत्रांत गुंफिली आहेत, त्यांतील वर्ण उच्चारण्यास किंचित अवघड असे आहेत. त्यामुळे त्या उच्चारांकडे लक्ष देणें आवश्यक आहे. इतकेंच नव्हे तर प्रत्येक नांवातून प्रकट होणारी भावमूर्ती चित्ताने स्मरली जावी असाही देवीदासाचा प्रांजल संकेत आहे. तो म्हणतो :

**आतां प्रार्थना ऐकें कमळापती । तुझे नामीं राहो माझी मती ।**
**हेंचि मागतो पुढतपुढतीं । परंज्योती व्यंकटेशा ॥**

याप्रमाणें आपले सर्व लक्ष नामांत ठेवून त्याच्या अर्थाचा सुगंध, आणि भावमूर्तीचें दर्शन घेण्याचा प्रयत्न केल्यास चित्त एकाग्र होण्यास चांगली मदत होते. एकाग्र चित्त असल्याशिवाय मानसपूजा करतां येत नाहीं. मन एकाग्र करण्याचे जे अनेक उपाय आहेत त्यांत मोठ्यानें नाम घेणें

हाही एक उपाय आहे. मनांतल्या मनांत नाम घेऊन एकाग्रता साधत नाहीं. एकाग्रता साधल्यानंतर मनांत भगवन्नामाचा घोष केला तरी चालेल. परंतु प्रारंभीं तें नाम मनांत म्हटल्यास मन लौकिक व्यवहारांत सतत धांवत राहील आणि नाम व लौकिक विचार यांचा झगडा निर्माण होईल. त्यांतच देहानं जर साथ दिली तर आतलें मन उसळी घेऊन बाहेर आल्याविना राहाणार नाहीं. या मानसपूजेचा अवलंब केल्यास —

**हृदयीं वसे परमानन्द । अनुभवसिद्ध सकळांशीं ।**

असा आपला महान अनुभव असल्याचे ग्रंथकार देवीदास सांगतो.

या विष्णूच्या नांवाचा उच्चार करतांना विशेष लक्ष द्यावें लागते असें मागें म्हटलेंच आहे. त्या सर्व ओव्यांत कंठस्थ व्यंजनें अधिक येवून आपली वाणी शुद्ध कशी होईल याची काळजी घेण्यांत आली आहे. जिव्हेनें नाम घेण्यापेक्षां त्याचा उच्चार कंठांतून करतां आल्यास अधिक चांगला असा भक्तांचा संकेत आहे. रामदास स्वामी या मंत्रांबद्दल असें स्पष्ट सांगतात कीं – पुढें वैखरी राम आधीं वदावा । यावरून वैखरीपेक्षां कंठवाणीला कसें महत्त्व प्राप्त झालेलें आहे याचा खुलासा होईल. हे सबंध स्तोत्र वैखरी वाणीनें म्हणताना ४२ ते ५१ या ओव्या कंठांतून म्हटल्यास त्या योगें वाणी शुद्ध होते. शब्दोच्चाराचे प्रमुख साधन जें जीभ ती पातळ होण्यास मदत होते. जीभ पातळ असणें हे वैभवाचे लक्षण आहे. किंवा ती होणे हे वैभवदायी आहे. त्या ध्येयानें तरी कां होईना या दहा ओव्या कंठातून म्हणण्याचा प्रयत्न केल्यास कंठाच्या मागची पश्चंती नांवाची वाणी जागृत होते. या वाणीच्या जागृतीने मनुष्याचे मन पूर्ण निष्पंद होते. मन निष्पंद करणें हें सर्व भक्ती अथवा योग मार्गातले महत्त्वाचे आणि अग्रिम साध्य आहे. ज्या साध्यासाठी

अनेक खडतर तपस्या करावी लागते त्या साध्यासाठी या स्तोत्राचा उपयोग फारच चांगला होतो. इतकेच नव्हे तर या विष्णूच्या नांवाचे अर्थ देखील फारच गोड असून प्रत्येक नामाच्या पाठीमागे एकेका कथेची उत्कृष्ठ प्रभावळ आहे. त्यामुळे भगवान् विष्णूच्या लीला ध्यानी आणून त्याला कायमचे चित्तांत ठेवणें सोपे जातें. ज्या माणसाचे उच्चार अडखळत असतील किंवा जी मुलें बोबडी बोलत असतील त्यांना या ओव्या अगदी सकाळच्या प्रहरी मोठ्याने आणि वैखरीने म्हणजे जिभेनें म्हणण्यास सांगितल्यास आणि त्याप्रमाणें त्यानीं त्या म्हटल्यास त्याचा परिणाम शंभर दिवसात दिसूं लागतो. इतकेंच नव्हे तर आणखी एकाद्या महिन्याच्या अवधीत तो बोबडेपणाचा दोष कायमचा नाहीसा होतो. ज्यांचे उच्चार स्पष्ट अगर जलद येत नसतील त्यानी देखील हा प्रयोग अवश्य करून पाहावा. त्याना देखील असे आढळून येईल की आपण कितीही जलद वाचले तरीही आपले उच्चार स्पष्टपणे बाहेर पडतात आणि ते चांगले परिणामकारक देखील असतात.

असें हे स्तोत्र सर्व बाजूनी चांगलें परिणामकारक आहे. हे स्तोत्र भगवान् विष्णूचे आणि त्यातल्या त्यांत संकटनाशक अशा त्याच्या पराक्रमी अवस्थेचे आहे. व्यंकटेशाच्या मूर्तीचे दर्शन घेतांना नेहमी त्याच्या समोर असलेल्या गरूडाचे दर्शन अगोदर घ्यावें. कारण गरुडाची अनुज्ञा न घेतल्यास त्याचा अपमान होतो आणि आपल्याला विष्णूचे जे प्रियकर दर्शन हवे असते त्यामध्ये व्यत्यय येतो. त्यामुळे गरुडाचें दर्शन प्रथम घ्यावे आणि त्यानंतर विष्णूच्या दर्शनास जावे. विष्णूची मूर्ती नेहमी उभी असते. सन्निध लक्ष्मी असते. कित्येक ठिकाणी ही लक्ष्मी नाही. तरीपण ज्या ठिकाणी लक्ष्मी आहे त्या ठिकाणी तिच्या पावलाचे आणि त्यातल्या त्यात दोन्ही अंगठ्यांचे दर्शन सर्व प्रथम घ्यावे. लक्ष्मीच्या दर्शनानंतर भगवान् विष्णूचे दर्शन घ्यावे. त्यांत पायापासून दर्शनास

आरंभ करावा. विष्णूचे पाय नेहमी समदर्शेत असतात. पायानंतर त्याच्या गळ्यातील वैजयंती, चार हातातील चार आयुधे, हृद्‌स्थान, कंठ, मुख, नेत्र, आणि मस्तक या प्रमाणे दर्शन घेऊन पुन्हा पायाशीं येवून थांबावे, नमस्कार करावा, प्रार्थना करावी आणि निरोप घ्यावा.

## श्रीव्यंकटेश स्तोत्र

श्रीगणेशाय नमः ।। श्रीव्यंकटेशाय नमः ।।

ॐ नमो जी हेरंबा । सकळादि तू प्रारंभा ।
आठवूनि तुझी स्वरूपशोभा । वंदन भावे करितसे ।।१।।

नमन माझे हंसवाहिनी । वाग्वरदे विलासिनी ।
ग्रंथ वदावया निरूपणीं । भावार्थखाणी जयामाजीं ।।२।।

नमन माझे गुरुवर्या । प्रकाशरूपा तूं स्वामिया ।
स्फूर्ति द्यावी ग्रंथ वदावया । जेंणे श्रोतयां सुख वाटे ।।३।।

नमन माझे संतसज्जनां । आणि योगियां मुनिजनां ।
सकळ श्रोतयां साधुजनां । नमन माझे साष्टांगीं ।।४।।

ग्रंथ ऐका प्रार्थनाशतक । महादोषांसी दाहक ।
तोषूनियां वैकुंठनायक । मनोरथ पूर्ण करील ।।५।।

जयजयाजी व्यंकटरमणा । दयासागरा परिपूर्णा ।
परंज्योति प्रकाशगहना । करितों प्रार्थना श्रवण कीजे ॥६॥

जननीपरी त्वां पाळिले । पितयापरी त्वां सांभाळिलें ।
सकळ संकटांपासूनि रक्षिले । पूर्ण दिधले प्रेमसुख ॥७॥

हें अलोकिक जरी मानावे । तरी जग हें सृजिलें आघवें ।
जनकजननीपण स्वभावें । सहज आलें अंगासी ॥८॥

दीननाथा प्रेमासाठी । भक्त रक्षिले संकटीं ।
प्रेम दिधले अपूर्व गोष्टी । भजनासाठी भक्तांच्या ॥९॥

आतां परिसावी विज्ञापना । कृपाळुवा लक्ष्मीरमणा ।
मज घालोनि गर्भाधाना । अलोकिक रचना दाखविली ॥१०॥

तुज न जाणतां झालों कष्टी । आतां दृढ तुझे पायीं घातली मिठी ।
कृपाळुवा जगजेठी । अपराध पोटीं घालीं माझे ॥११॥

माझिया अपराधांच्या राशी । भेदोनि गेल्या गगनासी ।
दयावंता हृषीकेशी । आपुल्या ब्रीदाशी सत्य करीं ॥१२॥

पुत्रांचे सहस्त्र अपराध । माता काय मानी तयांचा खेद ।
तेवीं तूं कपाळू गोविंद । मायबाप मजलागीं ॥१३॥

उडदांमाजी काळेगोरें । काय निवडावें निवडणारें ।
कुचलिया वृक्षांचीं फळें । मधुर कोठोनि असतील ॥१४॥

अराटीलागीं मृदुता । कोठोनि असेल कृपावंता ।
पाषाणासी गुल्मलता । कैशियापरी फुटतील ॥१५॥

आपादमस्तकावरी अन्यायी । परी तुझे पदरी पडिलों पाहीं ।
आतां रक्षण नाना उपायीं । करणें तुज उचित ॥१६॥

समर्थाचे घरींचें श्वान । त्यासि सर्वांहि देती मान ।
तसा तुझा म्हणवितों दीन । हा अपमान कवणाचा ॥१७॥

लक्ष्मी तुझे पायांतळीं । आम्ही भिक्षेसी घालोनि झोळी ।
येणें तुझी ब्रीदावळी । कैसी राहील गोविंदा ॥१८॥

कुबेर तूझा भांडारी । आम्हां फिरविसी दारोदारी ।
यांत पुरुषार्थ मुरारी । काय तुजला पैं आला ॥१९॥

द्रौपदीसी वस्त्रें अनंता । देत होतासी भाग्यवंता ।
आम्हांलागी कृपणता । कोठोनि आणिली गोविंदा ॥२०॥

भावेची करूनि द्रौपदी सती । अन्नें पुरविली मध्यरातीं ।
ऋषीश्वरांच्या बैसल्या पंक्ती । तृप्त केल्या क्षणमात्रें ॥२१॥

अन्नासाठी दाही दिशा । आम्हां फिरविसी जगदीशा ।
कृपाळुवा परमपुरुषा । करुणा कैशी तुज न ये ॥२२॥

अंगिकारियां शिरोमणी । तुज प्रार्थितो मधुर वचनीं ।
अंगीकार केलिया झणी । मज हातींचें न सोडावे ॥२३॥

समुद्रें अंगीकारिला वडवानळ । तेणें अंतरी होतसे विव्हळ ।
ऐसें असोनि सर्वकाळ । अंतरी सांठविला तयानें ॥२४॥

कूर्मे पृथ्वीचा घेतला भार । तेणें सोडिला नाहीं बडीवार ।
एवढा ब्रह्मांडगोळ थोर । त्याचा अंगीकार पैं केला ॥२५॥

शंकरें धरिलें हाळाहळा । तेणें नीळवर्ण झाला गळा ।
परी त्यागिले नाही गोपाळा । भक्तवत्सला गोविंदा ॥२६॥

माझ्या अपराधांच्या परी । वर्णितां शिणली वैखरी ।
दुष्ट पतित दुराचारी । अधमाहूनि अधम ॥२७॥

विषयासक्त मंदमति आळसी । कृपण कुव्यसनी मलिन मानसी ।
सदा सर्वकाळ सज्जनांशी । द्रोह करी सर्वदा ॥२८॥

वचनोक्ति नाहीं मधुर । अत्यंत जनांसी निष्ठूर ।
सकळ पामरांमांजी पामर । व्यर्थ बडिवार जगीं वाचे ॥२९॥

काम क्रोध मद मत्सर । हें शरीर त्यांचें बिढार ।
कामनाकल्पनेसी थार । दृढ येथें केला असे ॥३०॥

अठरा भार वनस्पतींची लेखणी । समुद्र भरला मषीकरूनी ।
माझे अवगुण लिहितां धरणी । तरी लिहिले न जाती ॥३१॥

ऐसा पतित मी खरा । परी तूं पतितपावन शार्ङ्गधरा ।
तुवां अंगीकार केलिया गदाधरा । कोण दोषगुण गणील ॥३२॥

नीच रतली रायासी । तिसी कोण म्हणेल दासी ।
लोह लागता परिसासी । पूर्वस्थिति मग कैंची ॥३३॥

गांवींचें होतें लेंडवोहळ । गंगेशी मिळतां गंगाजळ ।
कागविष्ठेचे झाले पिंपळ । तयांसि निंद्य कोण म्हणें ॥३४॥

तैसा कुजाति मी अमंगळ । परी तुझा म्हणवितों केवळ ।
कन्या देऊनियां कुळ । मग काय विचारावें ॥३५॥

जाणता असतां अपराधी नर । तरी कां केला अंगीकार ।
अंगीकारावरी अव्हेर । समर्थें न केला पाहिजे ॥ ३६ ॥

धाव पाव रे गोविंदा । हातीं घेवोनियां गदा ।
करीं माझ्या कर्माचा चेंदा । सच्चिदानंदा श्रीहरी ॥ ३७ ॥

तुझिया नामाची अपरिमित शक्ती । तेथें माझीं पापें किती ।
कृपाळुवा लक्ष्मीपती । बरवें चित्तीं विचारीं ॥ ३८ ॥

तुझें नाम पतितपावन । तुझें नाम कलिमलदहन ।
तुझें नाम भवतारण । संकटनाशन नाम तुझें ॥ ३९ ॥

आतां प्रार्थना ऐक कमळापति । तुझे नामीं राहो माझी मति ।
होंचि मागतों पुढत पुढती । परंज्योति व्यंकटेशा ॥ ४० ॥

तूं अनंत तुझीं अनंत नामें । तयांमाजीं अति सुगमें ।
तीं मी अल्पमति प्रेमें । स्मरूनि प्रार्थना करीतसें ॥ ४१ ॥

श्रीव्यंकटेशा वासुदेवा । प्रद्युम्ना अनंता केशवा ।
संकर्षणा श्रीधरा माधवा । नारायणा आदिमूर्ती ॥ ४२ ॥

पद्मनाभा दामोदरा । प्रकाशगहना परात्परा ।
आदिअनादि विश्वंभरा । जगदुद्धारा जगदीशा ॥ ४३ ॥

कृष्णा विष्णो हृषीकेशा । अनिरुद्धा पुरुषोत्तमा परेशा ।
नृसिंह वामन भार्गवेशा । बौद्ध कलंकी निजमूर्ती ॥ ४४ ॥

अनाथरक्षका आदिपुरुषा । पूर्णब्रह्म सनातन निर्दोषा ।
सकळ मंगळ मंगळाधीशा । सज्जनजीवना सुखमूर्ती ॥ ४५ ॥

गुणातीता गुणज्ञा । निजबोधरूपा निमग्ना ।
शुद्ध सात्विका सूज्ञा । गुणग्राह्या परमेश्वरा ॥ ४६ ॥

श्रीनिधि श्रीवत्सलांछनधरा । भयकृद्भयनाशना गिरिधरा ।
दुष्टदैत्यसंहारकरा । वीरा सुखकरा तूं एक ॥ ४७ ॥

निखिल निरंजन निर्विकारा । विवेकखाणी वैरागरा ।
मधुमुरदैत्यसंहारकरा । असुरमर्दना उग्रमूर्ती ॥ ४८ ॥

शंखचक्रगदाधरा । गरुडवाहना भक्तप्रियकरा ।
गोपीमनरंजना सुखकरा । अखंडित स्वभावें ॥ ४९ ॥

नानानाटक-सूत्रधारिया । जगव्द्यापका जगद्वर्या ।
कृपासमुद्रा करुणालया । मुनिजनध्येया मूळमूर्ती ॥ ५० ॥

शेषशयना सार्वभौमा । वैकुंठवासिया निरुपमा ।
भक्तकैवारिया गुणधामा । पाव आम्हां ये समर्थी ॥ ५१ ॥

ऐसी प्रार्थना करूनि देवीदास । अंतरीं आठविला व्यंकटेश ।
स्मरतां हृदयीं प्रगटला ईश । त्या सुखासी पार नाहीं ॥ ५२ ॥

हृदयीं आविर्भवली मूर्ती । त्या सुखाची अलोकिक स्थिती ।
आपुले आपण श्रीपति । वाचे हाति वदवीतसे ॥ ५३ ॥

तें स्वरूप अत्यंत सुंदर । श्रोतीं श्रवण कीजे सादर ।
सांवळी तनु सुकुमार । कुंकमाकार पादपद्में ॥ ५४ ॥

सुरेख सरळ अंगोळिका । नखे जैसी चंद्ररेखा ।
घोटीव सुनीळ अपूर्व देखा । इंद्रनीळाचियेपरी ॥ ५५ ॥

चरणी वाळे घागरिया । वांकी वरत्या गुजरिया ।
सरळ सुंदर पोटरिया । कर्दळीस्तंभाचियेपरी ॥ ५६ ॥

गुडघे मांडिया जानुस्थळ । कटितटीं किंकिणी विशाळ ।
खालतें विश्वउत्पत्तिस्थळ । वरी झळाली सोनसळा ॥ ५७ ॥

कटीवरतें नाभिस्थान । जेथोनि ब्रह्मा झाला उत्पन्न ।
उदरीं त्रिवळी शोभे गहन । त्रैलोक्य संपूर्ण जयामाजीं ॥ ५८ ॥

वक्षःस्थळीं शोभे पदक । पाहोनि चंद्रमा अधोमुख ।
वैजयंती करी लखलख । विद्युल्लतेचियेपरी ॥ ५९ ॥

हृदयीं श्रीवत्सलांछन । भूषण मिरवी श्रीभगवान ।
तयावरतें कंठस्थान । जयासी मुनिजन अवलोकिती ॥ ६० ॥

उभय बाहुदंड सरळ । नखें चंद्रापरीस तेजाळ ।
शोभती दोन्ही करकमळ । रातोत्पलाचियेपरी ॥ ६१ ॥

मनगटीं बिराजती कंकणें । बाहुवटीं बाहुभूषणें ।
कंठी लेइली आभरणें । सूर्यकिरणें उगवलीं ॥ ६२ ॥

कंठावरुतें मुखकमळ । हनुवटी अत्यंत सुनीळ ।
मुखचंद्रमा अति निर्मळ । भक्तस्नेहाळ गोविंदा ॥ ६३ ॥

दोन्ही अधरांमाजीं दंतपंक्ती । जिव्हा जैसी लावण्यज्योती ।
अधरामृतप्राप्तीची गती । तें सुख जाणे लक्ष्मी ॥ ६४ ॥

सरळ सुंदर नासिक । जेथें पवनासि झालें सुख ।
गंडस्थळींचें तेज अधिक । लखलखीत दोहीं भागीं ॥ ६५ ॥

त्रिभुवनींचे तेज एकवटलें । बरवेंपण सिगेसि आले ।
दोही पातयांनी धरिले । तेच नेत्र श्रीहरीचे ॥ ६६ ॥

व्यंकटा भृकुटिया सुनीळा । कर्णद्वयाची अभिनव लीळा ।
कुंडलांच्या फांकती किळा । तो सुखसोहळा अलौकिक ॥ ६७ ॥

भाळ विशाळ सुरेख । वरती शोभे कस्तुरीटिळक ।
केश कुरळ अलौकिक । मस्तकावरी शोभती ॥ ६८ ॥

मस्तकीं मुकुट आणि किरीटी । सभोंवतीं झिळमिळ्यांची दाटी ।
त्यावरी मयूरपिच्छांची वेठी । ऐसा जगजेठी देखिला ॥ ६९ ॥

ऐसा तूं देवाधिदेव । गुणातीत वासुदेव ।
माझिया भक्तीस्तव । सगुणरूप झालासी ॥ ७० ॥

आतां करूं तुझी पूजा । जगज्जीवना अधोक्षजा ।
आर्ष भावार्थ हा माझा । तुज अर्पण केला असे ॥ ७१ ॥

करूनि पंचामृतस्नान । शुद्धामृत वरी घालून ।
तुज करूं मंगलस्नान । पुरुषसूक्तें करूनियां ॥ ७२ ॥

वस्त्रें आणि यज्ञोपवीत । तुजलागीं करूं प्रीत्यर्थ ।
गंधाक्षता पुष्पें बहुत । तुजलागीं समर्पू ॥ ७३ ॥

धूप दीप नैवेद्य । फल तांबूल दाक्षिणा शुद्ध ।
वस्त्रें भूषणें गोमेद । पद्मरागादिकरूनि ॥ ७४ ॥

भक्तवत्सला गोविंदा । ही पूजा अंगीकारावी परमानंदा ।
नमस्कारूनि पादारविंदा । मग प्रदक्षिणा आरंभिली ॥ ७५ ॥

ऐसा षोडशोपचारें भगवंत । यथाविधि पूजिला ह्रदयांत ।
मग प्रार्थना आरंभिली बहुत । वरप्रसाद मागावया ॥ ७६ ॥

जयजयाजी श्रुतिशास्त्रआगमा । जयजयाजी गुणातीत परब्रह्मा ।
जयजयाजी ह्रदयवासिया रामा । जगदुद्धारा जगद्गुरू ॥ ७७ ॥

जयजयाजी पंकजाक्षा । जयजयाजी कमळाधीशा ।
जयजयाजी पूर्णपरेशा । अव्यक्तव्यक्ता सुखमूर्ती ॥ ७८ ॥

जयजयाजी भक्तरक्षका । जयजयाजी वैकुंठनायका ।
जयजयाजी जगपालका । भक्तांसी सखा तूं एक ॥ ७९ ॥

जयजयाजी निरंजना । जयजयाजी परात्परगहना ।
जयजयाजी शून्यातीत निर्गुणा। परिसावी विज्ञापना एक माझी ॥८०॥

मजलागी देई ऐसा वर । जेणे घडेल परोपकार ।
हेंचि मागणे साचार । वारंवार प्रार्थीतसे ॥ ८१ ॥

हा ग्रंथ जो पठण करी । त्यासी दुःख नसावें संसारीं ।
पठणमात्रें चराचरीं । विजयी करीं जगातें ॥ ८२ ॥

लग्नार्थियाचें व्हावें लग्न । धनार्थीयासी व्हावे धन ।
पुत्रार्थीयाचे मनोरथ पूर्ण । पुत्र देऊनि करावे ॥ ८३ ॥

पुत्र विजयी आणि पंडित । शतायुषी भाग्यवंत ।
पितृसेवेसी अत्यंत रत । जयाचें चित्त सर्वकाळ ॥ ८४ ॥

उदार आणि सर्वज्ञ । पुत्र देई भक्तालागून ।
व्याधिष्ठांची पीडा हरण । तत्काळ कीजे गोविंदा ॥ ८५ ॥

क्षय अपस्मार कुष्टादिरोग । ग्रंथपठणें सरावा भोग ।
योगाभ्यासियासी योग । पठणमात्रे साधावा ॥ ८६ ॥

दरिद्री व्हावा भाग्यवंत । शत्रूचा व्हावा निःपात ।
सभा व्हावी वश समस्त । ग्रंथपठणें करूनियां ॥ ८७ ॥

विद्यार्थियासी विद्या व्हावी । युद्धीं शस्त्रें न लागावी ।
पठणें जगांत कीर्ति व्हावी । साधु साधु म्हणोनिया ॥ ८८ ॥

अंती व्हावें मोक्षसाधन । ऐसें प्रार्थनेसी दीजे मन ।
एवढे मागतो वरदान । कृपानिधे गोविंदा ॥ ८९ ॥

प्रसन्न झाला व्यंकटरमण । देवीदासासी दिधलें वरदान ।
ग्रंथाक्षरीं माझें वचन । यथार्थ जाण निश्चयेंसीं ॥ ९० ॥

ग्रंथीं धरोनी विश्वास । पठण करील रात्रंदिवस ।
त्यालागीं मी जगदीश । क्षण एक न विसंबे ॥ ९१ ॥

इच्छा धरूनि करील पठण । त्याचें सांगतों मी प्रमाण ।
सर्व कामनेसी साधन । पठण एक मंडळ ॥ ९२ ॥

पुत्रार्थियानें तीन मास । धनार्थियानें एकवीस दिवस ।
कन्यार्थियानें षणमास । ग्रंथ आदरें वाचावा ॥ ९३ ॥

क्षय अपस्मार कुष्ठादिरोग । इत्यादि साधनें प्रयोग ।
त्यासी एक मंडळ सांग । पठणेंकरूनि कार्यसिद्धी ॥ ९४ ॥

हें वाक्य माझें नेमस्त । ऐसे बोलिला श्रीभगवंत ।
साच न मानी जयाचे चित्त । त्यासी अधःपात सत्य होय ॥९५॥

विश्वास धरील ग्रंथपठणीं । त्यासी कृपा करील चक्रपाणी ।
वर दिधला कृपा करूनी । अनुभवें कळों येईल ॥ ९६ ॥

गजेंद्राचिया आक्रांतासी । कैसा पावला हृषीकेषी ।
प्रल्हादाचिया भावार्थासी । स्तंभांतूनि प्रगटला ॥ ९७ ॥

व्रजासाठीं गोविंदा । गोवर्धन परमानंदा ।
उचलोनियां स्वानंदकंदा । सुखी केले तये वेळीं ॥ ९८ ॥

वत्साचेपरी भक्तांसी । मोहें पान्हावे धेनु जैसी ।
मातेच्या स्नेहतुलनेसी । त्याचपरी घडलेंसे ॥ ९९ ॥

ऐसा तूं माझा दातार । भक्तांसी घालेसी कृपेची पांखर ।
हा तयाचा निर्धार । अनाथनाथ नाम तुझें ॥ १०० ॥

श्रीचैतन्यकृपा अलौकिक । संतोषोनि वैकुंठनायक ।
वर दिधला अलौकिक । जेणें सुख सकळांसी ॥ १०१ ॥

हा ग्रंथ लिहितां गोविंद । या वचनीं न धरावा भेद ।
हृदयीं वसे परमानंद । अनुभवासिद्ध सकळांसीं ॥ १०२ ॥

या ग्रंथींचा इतिहास । भावें बोलिला विष्णुदास ।
आणिक न लगती सायास । पठणमात्रें कार्यसिद्धि ॥ १०३ ॥

पार्वतीस उपदेशी कैलासनायक । पूर्णानंद प्रेमसुख ।
त्याचा पार न जाणती ब्रह्मादिक । मुनी सुरवर विस्मित ॥ १०४ ॥

प्रत्यक्ष प्रगटले वनमाळी । त्रैलोक्य भजत त्रिकाळीं ।
ध्याती योगी आणि चंद्रमौळी । शेषाद्रिपर्वतीं उभा असे ॥ १०५ ॥

देवीदास विनवी श्रोतयां चतुरां । प्रार्थनाशतक पठण करा ।
जावया मोक्षाचिया मंदिरा । कांहीं न लगती सायास ॥ १०६ ॥

एकाग्रचित्तें एकांतीं । अनुष्ठान कीजे मध्यरात्रीं ।
बैसोनियां स्वस्थचित्तीं । प्रत्यक्ष मूर्ति प्रगटेल ॥ १०७ ॥

तेथें देहभावासी नुरे ठाव । अवघा चतुर्भुज देव ।
त्याचे चरणीं ठेवोनि भाव । वरप्रसाद मागावा ॥ १०८ ॥

॥ इति श्रीदेवीदासविरचितं श्रीव्यंकटेशस्तोत्रं संपूर्णम्

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

# श्री दत्तात्रेय स्तोत्र

दत्तात्रेयांचें गुणगान करणारी जी अनेक स्तोत्रें आहेत त्यांत या स्तोत्राचा समावेश आहे. या स्तोत्रांत दत्तात्रेयांचे केवळ गुणगान अगर स्तुती आहे असें नसून या स्तोत्राच्या निमित्तानें अनेक गोष्टींचा खुलासा देखील यांत केला आहे. असे जरी असले तरी या स्तोत्राचे स्थान दत्तात्रेयांच्या गौरवगाथेंतच आहे. यांत श्लोकांचा विस्तार तसा फारसा मोठा नाही. केवळ अठरा श्लोक आणि ते देखील अनुष्टुप् छंदातील म्हणजेच अत्यल्प विस्ताराचे आहेत. परंतु या स्तोत्राचा परिणाम मात्र फार मोठा आहे. ज्ञानदेवांच्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे—

**बिंब जरी बचके एवढें । तरी प्रकाशा त्रैलोक्य थोकडें ।**
**शब्दाची व्याप्ती तेणें पाडें । अनुभवावी ॥**

हें ओवी-वचन या स्तोत्राच्या बाबतीत यथार्थ लागू होते. या श्लोकांतील प्रत्येक श्लोक विचार करावयास लावणारा आहे. कारण

श्लोकाच्या अखेरीस दत्तात्रेय नमोऽस्तु ते । असे शब्द असल्याने केवळ नमस्कारापुरता या श्लोकांचा अन्य विस्तार असावा असे वाटतें. परंतु सूक्ष्मपणें अवलोकन केल्यास त्यांतील मर्म आणि श्लोकव्याप्ती कळून येण्याजोगी आहे.

या स्तोत्राची रचना देवर्षि नारदांनी केली. या स्तोत्राचा समावेश नारदपुराणांत करण्यांत आला. श्रीगुरु दत्तात्रेयांच्या आशुतोष वृत्तीची ओळख करून देतांना स्तोत्राचा अवलंब केला आहे. नारद हे महान भगवत् भक्त होते, इतकेंच नव्हें भक्तीच्या पवित्र क्षेत्रांतील एक अनुभवी अधिकारी आणि अति उच्चपदस्थ अशी व्यक्ती होती. नारद हे ब्रह्मदेवाचे पुत्र आहेत ही गोष्ट जरी सत्य असली तरी ब्रह्मपुत्र होण्यापूर्वीचे त्यांचें जें आयुष्य आहे तेंही पाहाणें खासच उचित ठरेल. कारण नारदीय जन्माच्या पूर्वी त्यांची लौकिक स्थिती, सेवा-वृत्ती, आणि भगवंतापाशीं जाण्याचा यांचा अवाढव्य प्रयत्न यांचे चित्र डोळ्यांसमोर आले म्हणजे नारदांच्या भक्तीची सीमा खासच असीम वाटूं लागते. नारदपण त्यांना कांही एका जन्मांत प्राप्त झाले नाही. काहीच्या मतें त्यांना पूर्वीचें चार जन्म घ्यावे लागले तर काहींच्या मतें एका जन्मातल्या सेवेच्या पुण्याईनें त्यांना पुढील जन्मांत अमोघ पुण्य प्राप्त झाले. काही असो, त्यांनी आपल्या पूर्व आयुष्यांत घेतलेले जे अनेकविध अनुभव होते ते या जन्मात बोलके झाले आणि त्यांचेंच रूपांतर अक्षर वाङ्मयांत झालें. त्यामुळें नारदांच्या प्रत्येक वचनाला आणि कृतीला विशेष अर्थ प्राप्त झाला आहे. अर्थात त्या अर्थांचा मागोवा घेतच संसारी माणसाला भक्तीचा सोज्वळ मार्ग आक्रमण करावा लागतो. त्या मार्गातले लहानसान खड्डे देखील त्यांनी स्पष्टपणें सांगितले आहेत. त्याचप्रमाणें भक्तीच्या उच्चतम क्षेत्रांत ज्या ठिकाणी वाचा परत फिरते अशा स्थळांचा देखील त्यांनी

अगदीं अचूक निर्देश केला आहे. या बाबतीत नारदांचे किंवा नारदांच्या नांवावर मोडणारे जे ग्रंथ आहेत त्यांच्याकडे पाहिले म्हणजे याचीं चांगली स्पष्टता होते. विशेषतः त्यांची ८४ भक्तीसूत्रे म्हणजे संसारी जगातील चौऱ्यांशीचा फेरा चुकविण्याचें ते खरोखरीच एक अमोल माध्यम आहे याचा निराळा निर्वाळा देण्याची आवश्यकता राहात नाही. अल्पाक्षरी या सूत्रांची महती अभ्यासूंना निराळी सांगण्याची जरूरी नाही. या सूत्रांवरून एवढाच बोध घ्यायचा की अशी सूत्रें प्रकाशांत आणणारा महात्मा कोणत्या दर्जाचा असेल, त्याची भूमिका काय असेल, आणि ही सूत्रे लिहिण्यापूर्वी त्यानें ती पूर्ण अंगी बाणवलेली असली पाहिजेत. त्यासाठी त्याच्या आयुष्याचा किती काळ व्यतीत झाला, त्यांचे प्रयत्न काय स्वरूपाचे होते याचीही चोखंदळपणे छाननी करणें योग्य ठरेल. शब्द सारखे दिसले तरी उच्चारणारा तो काय प्रकारें म्हणजे कोणत्या मूल्यमापानें उच्चारीत आहे यांची कल्पना शब्द ऐकणारा तेव्हांच जाणतो. शब्दाच्या मागे निर्माण होणारें वजन किंवा तेजाची प्रभावळ ही काही आपोआप निर्माण होत नाही. त्याच्यासाठी अवाढव्य तपस्या खासच लागते. नारदांच्या चरित्राचा मागोवा या दृष्टीतून घेणें मोलाचे ठरेल.

नारद हे भक्तोत्तम होते. पण अगदी प्रथम जन्मांत ते एक दरिद्री मातापित्यांच्या उदरी जन्मलें. तेथेंच ते वाढलें आणि त्याच जीवन प्रवाहाचें मापन करतांना असें कां? याचे उत्तर त्यांनी शोधण्याचा प्रयत्न केला. त्यांत त्यांना असें आपोआप आढळून आले कीं जगातील लौकिक दारिद्य संतसंगती आणि दीर्घोद्योग यांच्या अभावानें प्राप्त होते. त्यांत आपलेपण सारखे बोचत असतें. ज्यानें आपणांस जन्माला घातले त्या ईश्वराची त्यांना आठवण कालांतरानें होत असते. परंतु तिचें सातत्य मात्र असत नाही. कारण एकदां ईश्वराची आठवण झाली की कांही

काळांतच बुजते. पुन्हा केव्हां आठवण होईल त्याची निश्चिती कांहीच नसते. नारदांनी आपल्या पहिल्या जन्माचें वर्णन अशाच प्रकारें केलें आहे. आई आणि वडील यांच्या सानिध्यांत सुद्धां मी अर्धभुका असे. भुकेच्या पोटीं हातून काय घडणार नाही? पापाबरोबर पुण्याचाही संचय कधी होतो. घरीं खायला मिळेल कां याचाच शोध मी घेत होतो. त्या आशेनें गंगा नदीच्या परिसरांत मी आलों. एका धर्मशाळेत काही साधू होते. त्यांच्याजवळ खायला प्यायला भरपूर होतें. मी तेथें गेलों. त्यांची थोडी फार सेवा केली. त्यांनी मला खायला दिलें; माझें मन तृप्त झालें. त्यांच्या ईश्वरविषयक गोष्टी मी ऐकू लागलों. पण मला ईश्वर म्हणून कोणी या जगाचा नियंता आहे याची पुसटशी ओळख झाली. कांही दिवसांनी ते साधू निघून गेले आणि मीही माझ्या घरीं आलों. घरचें दारिद्य अल्पसें कमी झालें होते. त्यांतच मला या ईश्वराची केव्हां केव्हां आठवण होई. असाच सबंध जन्म गेला. पुढच्या जन्मांत मी जन्माला आलों तेव्हां घरची उत्तम स्थिती होती असें नव्हें. मागच्या जन्मीची ईश्वराबद्दलची आठवण मला वारंवार होऊ लागली. त्यांतूनच त्याला पाहावें अशी इच्छा निर्माण झाली. त्याच बळावर मी घरांतून बाहेर पडलों असता मला कांही साधूंचें दर्शन झालें. त्यांचें बोलणें आणि ईश्वराच्या सांनिध्यात जाण्याचा मार्ग जाणून घेवून मी घरी आलो. ईश्वराच्या भेटीची इच्छा बळावली असतांनाच माझा दुसरा जन्म संपला. तृतीय जन्मांत मात्र ईश्वराच्या आठवणीनें आणि इच्छेने मला ग्रासून टाकलें. ईश्वराचें दर्शन हा माझा एक विषय झाला. अर्थात् इतर विषय देखील होतेच. त्यांच्या-कडे माझें अद्याप दुर्लक्ष झालेलें नव्हतें. अनेक विषयांमधील ईश्वर हा एक विषय. इतर विषयांपेक्षा तो अधिक आवडे इतकेच. ईश्वराची भेट व्हावी अशी उत्कंठा प्रकर्षाने झाली. आयुष्याची शंभर वर्षे या उत्कंठेतच संपली. यमाचा मी पाहुणा झालों. त्याच उत्कंठेनें मला चौथा जन्म प्राप्त झाला.

साधूंच्या आश्रयानें मी राहात असे. मिळेल ते खात असे. मागील जन्माच्या पाथेयावर मी जीवनक्रम चालू केला. या जन्मांत ईश्वराशिवाय सर्व विषय माझ्यापासून दूर पळाले. एक ईश्वर याशिवाय मला काहीच सुचत नसे. मी त्याच ईश्वराचा ध्यास घेतला. चित्त त्या ईश्वरासाठी अधीर बनले होते. मी सर्व वस्तींचा त्याग केला. तीर्थक्षेत्रे देखील बाजूस ठेविली. मनुष्यमात्रांचा वारासुद्धा नको असें मला वाटूं लागले. ईश्वराशिवाय मला अन्य विषयच नव्हता. अशाच स्थितीत मी अरण्यांत गेलो. तेथेही शिकारीच्या निमित्तानें अनेक मनुष्यें येत. श्वापदांची स्वतःच्या भक्ष्यासाठीं मोठी युद्धें होत. तीही मला पाहावली नाहीत. अखेर मी एका भव्य अश्वत्थ वृक्षाच्या ढोलीत प्रवेश केला. त्या तमोमय विवरांत मी ईश्वराचें ध्यान करू लागलों. किती काळ गेला त्याचे मला भान नव्हते. पण एक दिवस त्या प्रकाशमय ईश्वराचें मला केवळ निमिष-मात्र दर्शन झाले. मी पुन्हा अनेकवार प्रयत्न केला. पण तसें दर्शन मात्र मला होईना. माझा जीव तळमळूं लागला. ईश्वरावाचून माझे प्राण कासा-विस होऊ लागले. मी पुष्कळ धीर धरला. मी या जगाचा निरोप कसा आणि कधी घेतला तें सुद्धा मला कळलें नाही. त्या वेळी मी यमाचा पाहुणा नव्हतों तर त्याच्या दरबारचा मानकरी होतो. पुढें पुष्कळ काळ पर्यंत मी कोठे होतो त्याचें मलाही भान नव्हतें. पण एक दिवस ब्रह्मदेवाच्या पवित्र मनात मी प्रकट झालों आणि त्याच्याच उच्छ्वासाबरोबर मी बाहेर आलों. तेव्हा मला प्रथमच त्या नीलवर्ण भगवंताचें दर्शन झालें. इतक्या जन्माचा माझा प्रवास संपला. त्यामुळें मला खूपच समाधान झालें. त्या समाधानात मी इतक्या सहजपणे जीवन व्यतीत करीत आहे.

नारदांचें हें चार जन्माचें चरित्र पाहिलें म्हणजे प्रभूचें वैभव कळण्यासाठी लागणाऱ्या आठवण, इच्छा, उत्कंठा आणि तळमळ या

ज्या महत्त्वाच्या चार पायऱ्या चढून जाव्या लागतात त्यांचेंच प्रतीक होय. असा फार मोठा जीवन प्रवाह संपल्यावर ज्यांना भक्तीसम्राटाचें पद प्राप्त झालें, त्यांनी भगवंत-सान्निध्यसुखाचा जो अनुभव घेतला असेल तो किती बोलका असेल हें चटकन लक्षांत येईल. भगवान विष्णूंच्या सामर्थ्याची जाणीव ज्यांना होती, ब्रह्मदेवाचें पितृत्व ज्यांना लाभले होतें आणि शिवांचे शिवत्व ज्यांच्याजवळ अगदीं सहजपणें नांदत होते त्या तीनही देवांच्या मिलाफांत काय अमोघता आहे यांचे नितांत चित्र या स्तोत्राच्या रूपानें नारदांनी प्रकाशांत आणलें आहे. हें स्तोत्र म्हणजे भगवंताला पाहिल्याबरोवर त्याच्याबद्दल जे वाटलें आणि जें त्यांनी केलें त्याचेंच हें स्वरूप आहे. सदैव शरणागत असणाऱ्या नारदांना नमस्कृती ही अगदी सहजस्थिती आहे. या स्तोत्रांत आपले सर्व नम्र आणि पुलकित भाव प्रकट करतांना एकत्रित झालेल्या तीन मूर्तींचें वैभव देखील त्यांनी शब्दांतून प्रकट केलें आहे. या स्तोत्राचा त्याच दृष्टिकोनातून आढावा घेतला पाहिजे.

स्तोत्राच्या प्रारंभात एक श्लोक आहे. पण त्याचा उल्लेख नारद-पुराणांत आढळला नाही. कारण या श्लोकानें दत्तात्रेयांच्या मूर्तीचें वर्णन केलेलें आहे.

**जटाधरं पाण्डुरागं शूलहस्तं कृपानिधिम् ।**
**सर्वरोगहरं देवं दत्तात्रेयमहं भजे ॥**

ज्याच्या मस्तकावर जटाभार आहे, ज्याची पांडुर अंगकांती असून हाती शूळ आहे, जो कृपासागर, सर्वरोग दूर करणारा प्रकाशमान असा जो दत्तात्रेय त्याला मी भजतो असा या श्लोकांचा अगदीं सरळ अर्थ आहे. अर्थात् या श्लोकाचा समावेश मूळ स्तोत्रांत नसल्याने केवळ दत्तात्रेयाचें

एक प्राकृत ध्यान म्हणून त्यांच्याकडे पाहाणें उचित ठरेल. उपासनेला प्रारंभ करण्यापूर्वी समोर काही प्रतिमा असल्यास ध्यानात येणारा उणेपणा दूर होण्यास मदतच होते. दत्तात्रेयांच्या जन्मानंतर भगवान शिव दुर्वास म्हणून दुरावले आणि ब्रह्मदेवानें शिवांना शीतलता देणाऱ्या चंद्राच्या रूपाने प्रयाण केलें. अखेर राहातां राहिले ते भगवान् विष्णु. शेवटीं तेच एकमुखी दत्त म्हणून मिरवले. परंतु अन्य दोन देवांच्या चिन्हांचा भार एका अंगी धारण करून ब्रह्मदेवांचा जटाभार आणि शिवांचा शूळ आपल्या पांडुर अंगकांतीबरोबर त्यांनी धारण केला. स्वतःचे दयाळुत्व, शिवाचें रोग निवारण आणि ब्रह्मदेवाचे प्रकाशीपण दत्तात्रेयांत समाविष्ट झाले. या सर्वांचा लाभ साधकास व्हावा, आपल्या देवतेची प्राकृतिक ओळख व्हावी म्हणूनच ध्यानाचा हा अक्षर प्रपंच आहे. ध्यान कोणत्या प्रकारच्या मूर्तीचें करावे याचा हा स्पष्ट असा आरसा आहे. या प्राकृतिक रूपाचें आध्यात्मिक ऐश्वर्य वर्णन करण्याचें कार्य आपल्या नितांत भक्तीची कृती जी नमस्कार तो प्रत्येक वेळीं वाचेनें वदून आणि देहानें कृती करून, पुढच्या श्लोकांत केलें आहेच. त्या श्लोकांचा आढावा घेणें जरूर आहेच. परंतु त्यापूर्वी या स्तोत्राच्या प्रारंभी निवेदन केलेल्या गोष्टींचाही विचार पाठापूर्वी करावयास पाहिजे.

आतांपर्यंत आपण या श्लोकाचा जो कर्ता, जी देवता, स्तोत्राचा परिसर या गोष्टी पाहिल्या. कोणतेही स्तोत्र पाठ म्हणावयाचें तें कसें, किती, कोणी, कां, केव्हां, या पांच प्रश्नार्थकांचा यथोचित आदर करूनच त्यांना डावलून पुढे आवृत्ती करण्याच्या मागें साधक लागला तर ती केवळ एक अर्थशून्य आणि फलशून्य कृती ठरेल. स्तोत्र हा मंत्रांचा विस्तृत आकार आहे. मंत्र ज्याप्रमाणे फलद्रूप होतात त्याप्रमाणें या स्तोत्रांचें देखील आहे. स्तोत्र देखील परिणामीं फलदायी आणि कृतिपूर्ण

होण्यांत त्यांचें खरें वैभव आहे. त्यामुळेच या पांच प्रश्नांचा विचार करणें जरूर आहे.

(१) यांतील पहिला प्रश्न म्हणजे हें स्तोत्र कसें म्हणावें.

अर्थात हें स्तोत्र अनुष्टुप सारख्या अत्यंत साध्या छंदांत असल्याने सर्व साधारण साधकाला देखील तें म्हणणें सोपें आहे. स्तोत्र संस्कृत असल्याने उच्चाराच्या बाबतींत काळजी घ्यावयास पाहिजे हें सांगणें नकोच. त्यासाठीं स्तोत्राची कोणा चांगल्या माणसाकडून संथा घेतल्यास स्तोत्र सुलभतेनें म्हणतां येईल. या किंवा अन्य कोणत्याही स्तोत्राचा पाठ करतांना त्या स्तोत्राचा कमीत कमी शब्दार्थ तरी ध्यानीं घेऊन पाठ करावा. भावार्थ समजावून घ्यावा आणि त्या ध्यानानें पाठ करावा. तो शब्दार्थापेक्षां फलदायी आहे. एकदां भावार्थ गोचर होवू लागला म्हणजे शब्दार्थाची अडचण आपोआप दूर होते. शब्दार्थासाठीं कोशादि साहित्याचा उपयोग करावा लागेल परंतु भावार्थ मात्र सतत लक्षपूर्वक केलेला पाठ किंवा गुरुकृपा यांच्याशिवाय गोचर होत नाहीं. कोणत्याहि स्तोत्राचा भावार्थ गोचर होऊं लागला कीं, त्याप्रमाणें स्तोत्र म्हणतांना आपले शब्द प्रखर होणार नाहींत याची दक्षता घेतली पाहिजे. मनातल्या मनांत स्तोत्रपाठ कधींहीं करूं नये. त्याने विक्षेप वाढतात, विचार प्रवाहित होतात आणि मनाचें स्वास्थ्य बिघडते. त्यामुळें आपण होऊन स्तोत्र पाठ मनांत केव्हाही करूं नये. आपला आवाज आपल्यापासून केवळ दोन हातांवर बसलेल्या मनुष्याला ऐकूं जाईल इतक्याच मोठ्याने पाठ म्हणावा. पाठ म्हणतांना आपली सर्व इंद्रियें एकमुखी असावीत. विशेषतः प्रभातकाळीं औदुंबराच्या झाडाखाली धूप अथवा मंद सुवासाची सुगंधशलाका यांच्या सान्निध्यात हें स्तोत्र म्हणावें. स्तोत्र बसून म्हणावें. पांढरी शुभ्र वस्त्रें परिधान करावीत. सकच्छ नेसलेलें असावें. स्तोत्रपाठा

पूर्वी आणि नंतर आई, वडील, आचार्य आणि उपास्य देवता यांना वन्दन करावें; त्यांचे आशीर्वाद घ्यावेत; म्हणजे पाठ निर्विघ्नपणें पार पडतो. या तिघांचे आपल्यावर असलेले जे अनेक उपकार आहेत, अवाढव्य ऋण आहे तें न फिटणारे असे आहे. तें फेडण्याचे सामर्थ्य आपल्या सारख्या सामान्य माणसाच्या अंगीं कुठें असणार ? परंतु आपल्या हातीं केवळ त्यांचें आदरानें स्मरण करण्याचें खास आहे. तें तरी आपण केलेंच पाहिजे. अन्यथा आपणांस कृतघ्नपणाचा दोष लागेल

(२) दुसरा प्रश्न म्हणजे हें स्तोत्र किती वेळां म्हणावें ?

हें स्तोत्र वरील सर्व बंध लक्षांत घेवून कमीतकमी एकदां तरी म्हणावें. ज्याला शक्य आहे त्यांनी दोन्ही संध्यासमयीं या स्तोत्राचा पाठ करावा. सूर्य मध्यान्ही येण्यापूर्वी दोन घटकांपासून तो मध्यान्हानंतर एक घटका अवधी हा त्या स्तोत्राला पोषक नव्हे. कारण या काळांत दत्तप्रभु भिक्षेसाठी बाहेर पडतात. त्या भिक्षाचारांत व्यत्यय येवूं नये असा या बंधनाचा मानस आहे. याशिवाय कोणत्याही वेळीं हें स्तोत्र पठण करण्यास मुळीच प्रत्यवाय नाहीं. परंतु त्यांतल्या त्यांत अगदीं प्रभातीं म्हणजे सूर्योदयापूर्वी पाठ संपेल अशा बेताने वाचणें अगर म्हणणे सर्वांत अधिक मोलवान आहे हें विसरून चालणार नाहीं. त्याचप्रमाणें रोज या स्तोत्राच्या सोळा आवृत्त्या केल्या की एकशें शहात्तर दिवसांत हें स्तोत्र सिद्ध होतें. अर्थात या अवधींत आपलें गांव सोडून अन्यत्र जाण्याची वेळ न यावी. कारण एकच जागा आणि एकच वेळ हें या स्तोत्राच्या बाबतीत एक मोठे बंधन आहे.

(३) हें स्तोत्र कोणी म्हणावें.

गुरुदेव दत्तात्रेयांच्या व्यावहारिक स्वरूपाची ज्याला ओळख झाली असून दत्तगुरूंचे पसायदान इच्छिणाऱ्या साधकाने या स्तोत्राचा

पाठ करावा. ज्याच्याजवळ श्रद्धा नाहीं, गुरुभक्ती नाही आणि सातत्य नाहीं अशा माणसाला हें स्तोत्र पाठ करण्याचा खरे पाहिले तर अधिकारच नाहीं. हे स्तोत्र अत्यंत सोवळें आणि त्वरित परिणाम कारक असल्याने खाणेंपिणे आणि अन्य आचार यांच्या बाबतींत ज्याला शुचिता सांभाळता येईल त्यानेंच या स्तोत्राचा पाठ करावा. सध्याच्या घरटंचाईच्या काळांत घरांत वावरणाऱ्या स्त्रियांच्या नैसर्गिक अडचणी या स्तोत्राच्या बाबतीत बाधक आहेत. त्या काळांत स्तोत्रपाठ केल्याने पुण्य लागण्याऐवजीं पापच पदरी येईल. विज्ञान-युगाचे मानकरी कधीं असें म्हणतील कीं या पाठाचा आणि स्त्रियांच्या नैसर्गिक अडचणीचा संबंध काय ? पण तूर्त त्यांना इतकेंच सांगणें शक्य आहे कीं त्यांनी एक तर या विषाचा अनुभव घेवूं नये किंवा घेण्याची ज्यांची तयारी आहे त्यांनीं त्याच्या सर्व भावी परिणामांना तोंड देण्यास सिद्ध असावें. या सर्व गोष्टीचा साकल्याने विचार करून आपल्याला योग्य वाटत असेल तरच या स्तोत्राचा पाठ करावा. अन्यथा दुसरी अनेक मन्द स्तोत्रे आहेत त्यांचा अवलंब करावा.

(४) हे स्तोत्र कां म्हणायचे ?

म्हणजेच या स्तोत्राची फलश्रुती काय आहे ? कोणतेही स्तोत्र घेतले तरी साधारणपणे या स्तोत्रात या स्तोत्राच्या पाठापासून अथवा उपासनेपासून लौकिक अथवा अलौकिक अशा कोणत्या फलाची प्राप्ती होते याचे अल्प अगर कांहीं स्थळीं विस्तृत असे वर्णन असते. त्या फलश्रुतीकडे लक्ष देऊन आपण स्तोत्र म्हणावे हा सरळ उत्तराचा भाग आहेच. परंतु त्याहीपेक्षा या स्तोत्राचे देहिक, मानसिक, आर्थिक, सामाजिक आणि आध्यात्मिक परिणाम काय होतात याचा अनुभव अन्य साधकांकडून समजावून घ्यावा आणि मगच या स्तोत्राचा पाठ करावा. प्रस्तुत स्तोत्राच्या अगदी अखेर याची अत्यल्प अशी फलश्रुती कथन केली आहे.

**शत्रुनाशकरं स्तोत्रं ज्ञानविज्ञानदायकं ।**
**सर्वपापं शमं याति दत्तात्रेय नमोऽस्तुते ॥**
**इदं स्तोत्रं महादिव्यं दत्तप्रत्यक्षकारकम् ।**

हें स्तोत्र शत्रूंचा नाश करणारे, ज्ञान आणि विज्ञान प्रदान करणारे, सर्वपाप शमविणारे असे असून या स्तोत्राच्या पठणाने साक्षात् गुरुदेव दत्तात्रेयांचे दर्शन घडते; असे हे महा दिव्य स्तोत्र आहे.

मानवी जीवनांत मानासिक समाधान हा सर्वांत श्रेष्ठ असा मित्र आहे. त्या समाधानांत विकृती निर्माण करणारे कामक्रोधादी जे सहा भयंकर शत्रू त्यांचा समूळ नाश झाला नाही तर खरे समाधान प्राप्त होत नाही. या सहा शत्रूंना जिंकणे ही साधी गोष्ट नाही. परंतु स्तोत्र-पाठाच्या प्रभावाने या शत्रूंचा नाश घडतो. पुन्हा त्यांचा उद्भव होत नाही. त्याचप्रमाणे ज्ञानविज्ञान यांचे प्रदान करण्याचे कार्य हे महान स्तोत्र करते. ज्ञान, विज्ञान आणि अज्ञान यांची स्पष्ट कल्पना आपल्याला ज्ञानेश्वर माऊली देतात.

**तैसी जाणीव जेथ न रिघे । विचार मागुतां पाऊलीं निघे ।**
**तर्कु आयणी नेघे । आंगीं जयाचां ॥**
**अर्जुना तया नांव ज्ञान । येंर प्रपंचु हें विज्ञान ।**
**तेथ सत्यबुद्धी तें अज्ञान । हेंही जाण** ॥ ज्ञानेश्वरी ७-५-६ ॥

अशा तऱ्हेची ही त्रिपुटी समजावून देण्याचे कार्य हें स्तोत्र करते. त्यामुळे या विश्वाच्या पसाऱ्यांत आपला मार्ग कोणता याचें चांगलें ज्ञान आपण होऊन आपल्यापुढे प्रकट होते. ज्ञान संपादन करण्यासाठी ज्या सामर्थ्याची आवश्यकता असते असे सामर्थ्य या स्तोत्रपाठात आहे.

अर्थात अशा अमूल्य ज्ञानमार्गाचें दर्शन झाले आणि त्याप्रमाणे चालला असतां सर्वपापं शमं याति । म्हणून महात्मे नारद ग्वाही देतात. सर्व दुःखांचा कळस म्हणजे पाप होय. मग कदाचित तें सर्व पाप असेल अगर पुण्याचा पोकळ बडिवार करणारे पाप असेल. तरीही त्याची समाप्ति होते. पाप आणि पुण्य यांची आपली कल्पना आणि सत्यस्थिती यांत फारमोठा फरक आहे. ज्या योगें क्षय पावणारे भोग प्राप्त होतात त्याला पाप असें म्हणतात. मग ते भोग पृथ्वीवर, नरकांत अगर स्वर्गांत कां असेनात. अखेर त्यांचें नांव भोग हेंच आहे. भोगातून सुटणे हें पुण्य आणि भोगात राहणे हें पाप आहे. पापाने भगवंताची प्राप्ति होत नाहीं.

**स्वर्गा पुण्यात्मकें पापें येईजे । पापात्मकें पापें नरका जाईजे ।**

**मग मातें जेणें पाविजे । तें शुद्ध पुण्य** ॥ ज्ञा. ९-३१६ ॥

ज्ञानदेवांच्या वचनाप्रमाणे शुद्ध पुण्य संपादन करण्यासाठी पापांचा क्षय झाला पाहिजे. परंतु श्लोकांत सर्वपाप असा उल्लेख आहे. सर्वपुण्य, सर्वसुख असे शब्द ज्या ज्या ठिकाणी येतील त्यांचा त्या ठिकाणीं जन्ममृत्युविरहित दशा असा अर्थ करावा आणि याच्या विरुद्ध सर्वपाप, सर्वदुःख असा शब्द ज्या ठिकाणी येईल त्याचा अर्थ संसार असा करावा. अर्थात या संसाराचें स्वरूप आपल्या गाढग्यामडक्यांच्या पसाऱ्यापेक्षां निराळें आहे. या संसाराचे स्वरूप श्रीमत् आद्य शंकराचार्य आपल्या चर्पटपंजरी नांवाच्या एका स्तोत्रांत देतात तें असे आहे.

**पुनरपि जननं पुनरपि मरणं । पुनरपि जननीजठरे शयनम् ।**

आणि याच संसाराचे स्वरूप ज्ञानेश्वर महाराज आपल्या बालबोध वाणींतून प्रकट करतात तें असें आहे.

**मातेचिया उदरकुहरीं । पचूनि विष्ठेच्या दाथरीं ।**
**उकडूनिं नवमासवरी । जन्मजन्मोनि मरतां ॥ ज्ञाने ९-३३१**

पुन्हा पुन्हा जन्म घेणे आणि पुन्हा पुन्हा मरणे याचेच नांव संसार. पुण्याच्या योगे हा संसार संपतो आणि पापाच्या योगे तो कायमचा पाठीशीं लागतो. असा संसार पाठीशीं असणे याचाच अर्थ सर्वपाप असा होतों. असे हे सर्वपाप शमं याति । म्हणजे शांत होते. पुन्हा हे पाप उसळी घेत नाही. म्हणजेच सर्वसुखाची अशी प्राप्ती या स्तोत्र-पाठाने होते; असा महात्मे नारद यांच्या सांगण्याचा आशय आहे.

त्याबरोबरच आणखीही एक बाब नारद सांगायला विसरले नाहींत. सर्वपाप शमते मग त्याची जागा कोण भरून काढते असा प्रश्न साधकांच्या मनांत येण्याची शक्यता जाणूनच त्यांनी पुढील श्लोकाच्या प्रथम पंक्तीत याचा स्पष्ट असा खुलासा केला आहे. निर्गुण निराकार असे गुरुदेव दत्त साधारणपणे आपल्या चर्मचक्षूंना दिसू शकत नाहीत. परंतु या स्तोत्रपाठामुळे, या स्तोत्राच्या दिव्य प्रभावाने आपले चर्मचक्षु सामर्थ्यवान ठरतात. आपली तपस्या उत्तम ठरते आणि गुरुदेव दत्तात्रेयांना आपली निराकाराची भूमिका सोडून आपल्या भक्तासाठी साकार बनावें लागते. इतकेंच नव्हे तर साकार बनूनच केवळ भागत नाही तर आपल्या भक्ताला ते दिव्यचक्षूचें दान करतात. त्यामुळें देव दत्तात्रेयांचा आकार त्याला आपल्या चर्मचक्षूंनीं अनुभवितां येतो. त्याच्यापासून आनंदाची प्राप्ती होते आणिं अक्षय्यत्वाकडे आपली पावलें आपोआप पडूं लागतात. नारदाचें अत्यंत त्रोटक असे जे चरित्र मागें दिले आहे त्यावरून नारदांना या परिस्थितीचा चांगला अनुभव होता हे कळून येईल. अनुभवालाच त्यांनी अक्षरांकित करून आपल्यासारख्या संसारी जीवांच्या समोर या स्तोत्राचा महत् दीप प्रज्वलित करून ठेविला

आहे. हें पुण्य अथवा फळ प्राप्त व्हावें म्हणून या स्तोत्राचा पाठ नित्य करणें आवश्यक आहे.

(५) यांतील पांचवा प्रश्न आहे तो हें स्तोत्र केंव्हां म्हणावें असा. अर्थात या प्रश्नाचें उत्तर हें स्तोत्र कसें म्हणावे यांत आलेलेंच आहे. तरीपण इतकें सांगणे आवश्यक आहे कीं प्रत्येकानें आपल्या बालवयांत या स्तोत्रपाठाला प्रारंभ करावा आणि या देहांतुं जीव आनंदाने नांदतो आहे तोपर्यंत तरी या स्तोत्राचा पाठ सदैव करावा किंवा दत्तात्रेयांचें साक्षात् दर्शन घडेपर्यंत तरी या स्तोत्राचें पठण आवश्यक आहे.

या सर्व प्रश्नांचा सविस्तर विचार करण्याचे कारण इतकेंच कीं आजच्या विज्ञान युगांत प्रत्येकाजवळ प्रश्नच अनेक आहेत. परंतु त्यांची उत्तरे शोधण्याचें सामर्थ्य असून सुद्धा प्रयत्नांचा अभाव आहे. त्यामुळें सबंध जीवन हें एक मोठे प्रश्नचिन्ह बनतें. या प्रश्नचिन्हाचें निराकरण करणें म्हणजे सन्तविचारावर अल्पसा विश्वास ठेवून त्याप्रमाणें आचरण करणें होंय. पुस्तकांचें अवजड पाथेय सांभाळणें आमच्या पिढीला अवघड वाटत नाही परंतु अनुभवांची बहुगुणी शिदोरी मात्र त्यांना नकोशी होते. या अनुभवाची शिदोरी लाभावी आणिं त्याचा विनियोग योग्य प्रकारें व्हावा हीच या आणि अशा स्तोत्रांची सांगता आहे.

या स्तोत्राचा पाठ कसा आणि केंव्हां करावा या विषयीची चर्चा मागे आलीच आहे. परंतु अनुभव मात्र असा आहे कीं पहाटेच्या प्रहरीं स्नान करून भस्म लेपन करून औदुंबराच्या छायेंत उत्तर दिशेस तोंड करून उभे राहून हे स्तोत्र रोज सोळा वेळा याप्रमाणें पठण केलें असतां दोन वर्षें नऊ महिनें आणि दहा दिवसांच्या अखेरीस दत्तात्रेयांचें साक्षात

दर्शन होते. अर्थात त्यापूर्वी दत्तात्रेयांच्या अस्तित्वाची साक्ष अनेक प्रकारें येते. विशेषतः आपल्या जवळ दत्तात्रय उभे असल्याचा भास मात्र अनेक वेळां अनुभविण्यास मिळतो. धूप आणि तुलसी यांचा सुवास सुटणे आणि कधीं काळीं तो आपल्या हाताला बराच काळपर्यंत येत राहणें असाही प्रकार घडतो. परंतु त्यामुळे भुलून जाता कामा नये. इतकेंच नव्हे तर दत्तात्रेयांच्या उपासनेत एक महत्त्वाची गोष्ट नेहमी लक्षांत ठेवावयास पाहिजे की आपणास असे जे कांहीं अनुभव येतील अथवा उपासना म्हणून आपण जो कांही आचार करू त्याची वाच्यता कोणाही जवळ करतां कामा नये. जवळचे आप्त अथवा मित्र तर सोडाच पण प्रत्यक्ष आपल्या जन्मदेला, पित्याला अथवा आपल्या परम गुरुला सुद्धां आपण सांगतां कामा नये. गुरूंना आपल्या शिष्याची प्रगती काय आहे याचे ज्ञान त्याच्या मस्तकावरून आणि नेत्रातील तेजावरून सहज कळून येते. त्यामुळे असा झालेला साक्षात्कार त्यांना सांगण्याची आवश्यकता नाही. यांतूनही आपण गुरूंना सांगितले तर त्यांत साधकाला दोन प्रकारचे पाप लागतें. एक तर आपण बोलूं नये असे असतांना बोललो आणि त्या योगे आपणच आपल्या गुरूचा अपमान केला. अर्थात या प्रगतीच्या बाबतीत आपल्या गुरूनीच जर काही पृच्छा केली तर मात्र अत्यंत थोड्या शब्दांत अर्थपूर्ण रीतीने त्यांना सांगणे शिष्याचे परम कर्तव्य आहे याचा साधकाने विसर पडूं देऊ नये. अशा स्तोत्राच्या पठणाने हा जसा पारमार्थिक लाभ होतो त्याचप्रमाणें कांही ऐहिक लाभ देखील या स्तोत्राच्या पाठाने साधतात. विशेषतः मनुष्य जर रागीट अथवा संतापी असेल तर त्याचा क्रोध प्रत्येक पाठाबरोबर कमी होत जातो. धन आणि विद्या यांची इच्छा असणाऱ्याने या स्तोत्राचा एक एक श्लोक म्हणून विष्णु अगर शिव किंवा दत्तात्रेय यांच्या पायीं पांढरी पुष्पें किंवा तुळस किंवा बिल्वदले वहावीत. बिल्वदले मिळाली नाहीत

तर निरगुडी त्रिदले वहावीत. तुळसी पत्रें मिळाली नाहीत तर औदुंबराची पाने वहावीत आणि फुले मिळाली नाहीत तर तुकडा न पडलेले तांदूळ वहावेत. याप्रमाणे रोज आचरण केल्यास दत्तात्रेयांच्या कृपेने बुद्धीला गती मिळते. ती वेगाने सर्वत्र वावरूं लागते आणि जें आत्मसात झालेले असतें त्याचा साधकाला उत्कृष्ट रीतीने विनियोग करतां येतो. एखाद्या रोगी माणसास या स्तोत्रमंत्राने मंत्रून दिलेले पाणी बरें करते. भूतें पिशाच्चें यांचा ज्यांना त्रास असेल त्यांनी या स्तोत्राचा रोज संध्याकाळी पाठ करावा. मुलांना तीव्र दृष्ट लागत असेल तर हें स्तोत्र म्हणतांना एक उदबत्तीं समोर लावून ठेवावी आणि त्याचा अंगारा स्तोत्र म्हणून झाल्यावर बालकाला लावावा. त्यायोगें बालक सुखरूप राहातें. असे अनेक लौकिक आणि अलौकिक फायदे या स्तोत्रपाठानें प्राप्त होतात.

# श्रीदत्तात्रेयस्तोत्रम्

**श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरवे नमः ॥ ध्यानम् ॥**

**जटाधरं पांडुरागं शूलहस्तं कृपानिधिम् ।**
**सर्वरोगहरं देवं दत्तात्रेयमहं भजे ॥ १ ॥**

( १ ) ज्याने मस्तकी जटा धारण केल्या आहेत, धूलीकणाच्या रंगाप्रमाणें ज्याची अंगकान्ती आहे, ज्याच्या हातांत शूळ असून जो कृपानिधी आहे, त्याप्रमाणेंच सर्व रोग नाहीसे करणारा प्रकाशमान जो देव दत्तात्रेय त्याला मी भजतो.

**अस्य श्रीदत्तात्रेयस्तोत्रमंत्रस्य ।**

**भगवान्नारद ऋषिः ।**

**अनुष्टुप् छंदः ।**

**श्रीदत्तः परमात्मा देवता ॥**

**श्रीदत्तप्रीत्यर्थे जपे विनियोगः ॥**

( त्या भक्तीसाठी जें स्तोत्र आहे ) त्या दत्तात्रेय–स्तोत्र–मंत्राच कर्ता ऐश्वर्यवान् महात्मा नारद असून यांतील श्लोक अनुष्टुप छंदांत आहेत. या स्तोत्राची देवता दत्तात्रेय असून दत्तात्रेयानें आपल्यावर संतुष्ट व्हावें हाच या स्तोत्रपाठाचा विनियोग होय.

**जगदुत्पत्तिकर्त्रे च स्थितिसंहारहेतवे ।**

**भवपाशविमुक्ताय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ १ ॥**

( १ ) जगाच्या उत्पत्तीकर्ता आणि त्याच्या अस्तित्वाला आणि नाशाला कारण होणारा, भवबंध नाहीसा करणाऱ्या दत्तात्रेयांना नमस्कार असो.

**जराजन्मविनाशाय देहशुद्धिकराय च ।**

**दिगंबर दयामूर्ते दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ २ ॥**

( २ ) म्हातारपण, जन्म याचा नाश करणाऱ्या, देह पवित्र करणाऱ्या आणि दिशा हेंच वस्त्र ज्याने धारण केलें असून दयेची मूर्ती अशा दत्तात्रेयांना मी वंदन करतो.

**कर्पूरकान्तिदेहाय ब्रह्ममूर्तिधराय च ।**

**वेदशास्त्रपरिज्ञाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ ३ ॥**

( ३ ) कापराप्रमाणें कांतिमान देह धारण करणाऱ्या, ब्रह्माचा जणू आकारच आणि वेद आणि शास्त्र यांचा ज्ञाता अशा दत्तात्रेयांना वन्दन असो.

ह्रस्वदीर्घकृशस्थूलनामगोत्रविवर्जित ।
पंचभूतैकदीप्ताय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ ४ ॥

( ४ ) लहान, मोठा, कृश, विशाल, नाम, गोत्र या पलीकडील, पंचमहाभूतांना तेजवान करणाऱ्या दत्तात्रेयांना नमस्कार असो.

यज्ञभोक्त्रे च यज्ञाय यज्ञरूपधराय च ।
यज्ञप्रियाय सिद्धाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ ५ ॥

( ५ ) यज्ञांची आवड असणाऱ्या स्वतः यज्ञच अशा, यज्ञाचे रूप धारण करणाऱ्या, यज्ञ ज्याला प्रिय आहेत अशा आणि सिद्ध अशा दत्तात्रेयांना नमस्कार असो.

आदौ ब्रह्मा मध्ये विष्णुरंते देवः सदाशिवः ।
मूर्तित्रयस्वरूपाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ ६ ॥

( ६ ) ज्यांच्या रूपांत प्रथम ब्रह्मा, मध्यें विष्णु आणि अंतीं दीप्तिमान सदाशिव आहेत अशा एकवटलेल्या त्रिमूर्तीला नमस्कार असो.

भोगालयाय भोगाय योगयोग्याय धारिणे ।
जितेंद्रियजितज्ञाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ ७ ॥

( ७ ) सर्व भोगांचें वसतिस्थान, भोग योग्य अशा लाभ ज्याच्यापासून आहे, ज्यानें इंद्रियें जिंकली असून ज्ञानाला सुद्धा ज्याने आपले केलें आहे अशा दत्तात्रेयांना वन्दन असो.

**दिगंबराय दिव्याय दिव्यरूपधराय च ।**
**सदोदितपरब्रह्म दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ ८ ॥**

(८) दिशारूपी वस्त्र ज्याने परिधान केलें आहे, दिव्यरूप धारण करणाऱ्या, नित्यब्रह्म अशा तेजस्वी दत्तात्रेयांना माझा प्रणाम असो.

**जंबुद्वीपमहाक्षेत्रमातापुरनिवासिने ॥**
**जयमान सतां देव दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ ९ ॥**

(९) जंबुद्वीपांतील महान पवित्रस्थान जें मातापूर त्या ठिकाणी राहाणाऱ्या, सज्जनांनी ज्याचें जयगान करावें अशा दत्तात्रेयांना माझा नमस्कार असो.

**भिक्षाटनं गृहे ग्रामे पात्रं हेममयं करे ।**
**नानास्वादमयी भिक्षा दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ १० ॥**

(१०) सुवर्णाचे पात्र हाती घेऊन विविध चव असलेली भिक्षा घेण्यासाठीं गांवें आणि गृहे यांकडे जाणारा असा जो दत्तात्रेय त्याला प्रणाम असो.

**ब्रह्मज्ञानमयी मुद्रा वस्त्रे चाकाशभूतले ।**
**प्रज्ञानघनबोधाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ ११ ॥**

(११) ब्रह्मज्ञानमय असे ज्यांचे मुख आहे, आकाश आणि पृथ्वी हें ज्यांचे वस्त्र आहे, बुद्धिमान जणूं कांहीं ज्ञानच अशा दत्तात्रेयांना माझा नमस्कार असो.

**अवधूत सदानंद परब्रह्मस्वरूपिणे ।**
**विदेह-देहरूपाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ १२ ॥**

(१२) ज्यांचें पाप शून्य आहे, जो सदैव आनंदांत मग्न आहे, परब्रह्म हे ज्याचें स्वरूप, निराकारपण हाच ज्याचा आकार आहे अशा दत्तात्रेयांना मी वन्दन करतो.

**सत्यरूप सदाचार सत्यधर्मपरायण ।**

**सत्याश्रय परोक्षाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ १३ ॥**

(१३) सत्याचा आकार, सदाचारी, सत्य हाच ज्यांचा धर्म आहे सत्याच्या आश्रयाने राहाणाऱ्या दत्तात्रेयांना वन्दन असो.

**शूलहस्त गदापाणे वनमालासुकंधर ।**

**यज्ञसूत्रधर ब्रह्मन्दत्तात्रेय नमोऽस्तुते ॥ १४ ॥**

(१४) ज्यांच्या हातांत, शूळ व गदा आहे, गळ्यांत वनमाला असून ज्यांचा कंठ चांगला आहे, ज्यानें यज्ञोपवित धारण केलें असून साक्षात् ब्रह्म अशा दत्तात्रेयांना माझे वन्दन असो.

**क्षराक्षरस्वरूपाय परात्परतराय च ।**

**दत्तमुक्तिपरस्तोत्र दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ १५ ॥**

(१५) असणारे आणि नसणारे अशी दोन्ही रूपे ज्याची आहेत, जो सर्वश्रेष्ठ आहे अशा दत्तात्रेयांकडून मुक्तीची अपेक्षा करणारा मी दत्तात्रेयांना वन्दन करतो.

**दत्तविद्याढ्यलक्ष्मीश दत्तस्वात्मस्वरूपिणे ।**

**गुणनिर्गुणरूपाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ १६ ॥**

(१६) विद्या आणि धन ज्याने दिले आहे, ज्यांनी स्वात्मस्वरूप लाभ करून दिला आहे, सगुण आणि निर्गुण ही दोन्ही रूपे जो धारण करतो त्या दत्तात्रेयांना माझे वन्दन असो.

**शत्रुनाशकरं स्तोत्रं ज्ञानविज्ञानदायकम् ।**

**सर्वपापं शमं याति दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥ १७ ॥**

(१७) शत्रूंचा नाश करणारे, ज्ञान आणि विज्ञान प्रदान करणारे सर्वपाप शमविणारे हे स्तोत्र (ज्याचे आहे) त्या दत्तात्रेयांना माझे प्रणाम असोत.

**इदं स्तोत्रं महादिव्यं दत्तप्रत्यक्षकारकम् ।**

**दत्तात्रेयप्रसादाच्च नारदेन प्रकीर्तितम् ॥ १८ ॥**

(१८) हे स्तोत्र अतिशय दिव्य असून दत्तात्रेयांचें साक्षात् दर्शन घडविणारे आहे. त्याच दत्तात्रेयांच्या कृपेनें नारद ऋषींनीं हे स्तोत्र कीर्तीवन्त केलें.

इति श्री नारदपुराणे नारदविरचितं दत्तात्रेयस्तोत्रं संपूर्णम् ॥

याप्रमाणे नारद पुराणांतील नारदांनी रचलेलें हें स्तोत्र संपले.



# श्री अन्नपूर्णा स्तोत्र

भगवान पूज्यपाद श्रीमत् आद्य शंकराचार्य यांनी लोकांचा उद्धार करण्यासाठी अनेक लीला केल्या आणि या लीलांचा परिणाम अक्षरांकित करून त्याला गेयता आणली. आचार्यांची अनेक स्तोत्रें आहेत. त्यांतील बहुतेक सर्वांना कांहींना कांहीं कथेची प्रभावळ लाभलेली आहे. पुरातनतेमुळे त्याला कपोलकथा म्हटले तरी वावगे वाटण्याचे कारण नाही. कारण एखादी गोष्ट तिच्या महात्म्यासहि प्रकट करतांना जसा एखादा दृष्टांत सांगितला तर ती गोष्ट चटकन् लक्षांत येते त्याप्रमाणें या कथा कपोलकल्पित मानून सुद्धां त्यांच्या तात्पर्याकडे लक्ष दिले तरी आचार्यांच्या सद्मानसाचें दर्शन सहज घडेल. ज्या तळमळीने आचार्यांनीं आपली स्तोत्रे प्रकट केली तीच तळमळ या स्तोत्र-पाठार्थी जुळली तर आचार्यांच्या वेळी जो अनुभव त्या काळच्या लोकांना मिळाला तोच अनुभव आजच्या काळांत देखील ताजा आहे याची जाणीव होईल. आचार्यांच्या प्रत्येक स्तोत्रामागें त्यांची लोकोद्धाराची तळमळ स्पष्टपणे दिसून येते. अशाच अमोल अनुभवांना जन्म देणारे हें केवळ चारच श्लोकांचे एक स्तोत्र आहे.

श्रीमत् शंकराचार्य पर्यटन करतां करतां दक्षिण भारतांतील विजया-नगर नांवाच्या गावीं आले. दुपारची वेळ असल्याने भिक्षा मागत ते एका घरीं आले. त्या घरासमोर सडा-संमार्जन करून गोपद्मांची रंगावली रेखिलेली होती. घराचा दरवाजा उघडा असून आंत माणसांची तशी फारशी चाहूल येत नव्हती. आचार्य त्या दारापाशीं आले आणि ॐभवति भिक्षान् देहि । असें म्हणून आपण आल्याची वर्दी आतल्या गृहिणीला दिली. त्या घराची स्वामिनी त्यावेळी देवघरांत बसून देवाला आळवीत होती. तिच्याकडे पाहिलें की मूर्तीमंत दारिद्र्याचे दर्शन घडत होतें. ती देवाला सांगत होती. देवा तुला माझी कींव येवूं दे. मला बाकी काही दिलें नाहीस तरी चालेल. मला स्वतःला उपाशी राहावे लागले तरी चालेल परंतु माझे पती आणि पुत्र यांना अन्न दे. ज्या गृहस्थधर्माचा आम्ही स्वीकार केला त्या धर्मोप्रमाणें वागतांना अतिथी-देवांचे पूजन करावे लागते. अतिथी- देवांचा अपमान झाला तर आमचें पूर्वपुण्याचें प्राथेय घेवून तो निघून जाईल. लौकिक दारिद्र्य आहेच. पण त्या अति-थीचा अपमान होण्यापेक्षा मला मृत्यु सुखद वाटेल. अशा तऱ्हेची प्रार्थना चालूं असतानाच आचार्यांची वाणी तिच्या कानीं आली. तिच्या पोटात धस्स झाले. काय करावे तें तिला सुचेना. घरात अन्नाचा कण नव्हता. पती उद्योगधंदा मिळतो का याचा शोध घेण्यासाठी घराबाहेर गेलेले. अशा वेळी आलेल्या अतिथीचें स्वागत करणे हें गृहिणीचें काम असतें. पण या अतिथीच्या पुढें अशा मोकळ्या हातांनी मी कशी जावू आणि त्यांना काय सांगू? माझ्याकडून भिक्षा न मिळाल्यानें अतृप्त झालेल्या त्या महात्म्याचें दर्शन मला असह्य होईल. तिनें विचार केला. अतिथीला विन्मुख पाठवावे लागत आहे याचे तिला दुःख झाले. तरीपण अतिथी देवतेला नवस्कार करायला तर काही कमी नाही ना? असा विचार करून जीर्णवसना ती सती बाहेरच्या दाराशीं आली. संन्यासवेष धारण केलेल्या

आचार्यांना तिने मनापासून नमस्कार केला आणि तेच हात आपल्या मुखावर झांकून ती रडू लागली. आचार्यांनी तें पाहिलें. तिची ती अवस्था पाहून त्यांना तिची दया आली. शब्दांनी जे सांगता येणार नव्हते ते तिच्या कृतीनी बोलके झाले होते. आपल्या अर्थपूर्ण गंभीर शब्दांनी आचार्यांनी तिला हाक मारली आणि ते म्हणाले, देवि, आपले दुःख मी जाणतो. आपण या सतीव्रताच्या नमस्कारानें माझा सन्मान केलात त्यांतच तुमचे मंगल हृदय प्रतीत होते. आपल्या घरी अन्नपूर्णा सदैव नांदेल. मी तिचें आव्हान करतो आणि आपली करुण कहाणी मी तिच्या कानावर घालतो. असें म्हणून आचार्यांनीं अन्नपूर्णेची चार श्लोकांनी प्रार्थना केली.

हे चार श्लोक म्हणून होतांच अन्नपूर्णा आपल्या सिद्धिगणांसहित आचार्यांच्या समोर प्रकट झाली. आचार्यांनीं तिला वन्दन केलें. आपला वरद् हस्त उभारून ती म्हणाली, कल्याण असो. तुझ्या स्तुतीनें मी अत्यंत संतुष्ट झाले आहे. तुला काय हवे असेल ते मी तुला देईन. काय इच्छा आहे सांग.

अन्नपूर्णेचे ते शब्द ऐकून आचार्य तिला म्हणाले, हे अन्न-देवते मी तुझे आवाहन केलें तें माझ्यासाठी नाहीं. पण माझी तुला एक प्रार्थना आहे. मी भिक्षाटणास चाललों आहे. मी परत येईपर्यंत तूं या घरांत वास करावास.

'तथास्तु' म्हणून अन्नपूर्णा बाहेरचा उंबरठा ओलांडून घरांत गेली. कृशकाय सती दारांत आपले मुख हातांनी झाकून उभी होती. अन्नपूर्णा आंत जाताच जिकडे तिकडे मधुर असा सुवास येवूं लागला. डोळे दिपतील असा प्रकाश पडला. आपल्या मुखावरील हात काढून त्या सतीने अन्नपूर्णेचे स्वागत केलें. तिला हातीं धरून अन्नपूर्णा घरांत गेली. देवाच्या समोर एक तांदुळाची रास होती. अन्नपूर्णेनें तिला दाखविली आणि

सांगितले आतां ही रास कधीही संपणार नाही. जा बाहेर आलेल्या त्या पवित्र यतीला भिक्षा घाल. त्याचे समाधानाचे आशीर्वाद-बोल ऐक. त्याला स्पर्श करूं नकोस पण नमस्कार कर. त्याचे पाय तुला दिसतील त्यांचे दर्शन घे; आणि घरांत परत ये. जा.

अन्नपूर्णेचे ते भाषण ऐकून त्या साध्वीने आपल्या ओंजळींत मावतील एवढे तांदूळ त्याच राशीतून घेतले. दाराशीं प्रसन्न वदनाने उभ्या असलेल्या यतीला तिनें भिक्षा घातली. पायांचे दर्शन घेतले. हंसत-मुख आचार्यांनीं नारायण म्हणून भगवन्नामाची गर्जना केली आणि ते पाठीमोरे होऊन चालू लागले. त्यांच्या पाठीचे दर्शन घेऊन ती घरांत वळणार इतक्यांत जमिनीवर आचार्यांची पावले उमटलेली दिसली. त्या पवित्र पदधूलीला मस्तकी स्थान देत हर्षभरा झालेली ती सती घरात वळली. अन्नपूर्णा देवी कोठेच दिसत नव्हती. पण तिचे घर मात्र सर्व प्रकारच्या धनधान्यांनी भरून गेलेले होते.

या कथेतील कपोलकल्पित भाग दूर केला तरी त्यांतील आचार्यांचे स्तोत्र मात्र कायम राहाते. या स्तोत्राचा पाठ प्रत्येक घरीं व्हावा. अन्नपूर्णा प्रत्येक घरावर आपली समृद्ध छाया करील.

पूज्यपाद आचार्यांच्या उत्कृष्ट स्तोत्रांपैकी हें एक स्तोत्र आहे. प्रत्येक जीवाला अन्न लागतें, तें मिळालें तर जीव सर्व दृष्ट्या समृद्ध होतो या अन्नालाच पूर्णब्रह्म म्हणतात. त्याचा योग्य विनियोग केला तर त्या-पासून समृद्धि प्राप्त होते; परंतु त्यांत चूक झाली तर मात्र त्यापासून विकृती निर्माण होते. जें अन्न मानवाला तारते तेंच अन्न त्याच्या अशिष्ट उपयोगानं मारतेही. ज्ञानदेव या बाबतीत एक मोठा सिद्धांत आपल्या ज्ञानदेवीत मांडतात. ती ओवी अशी —

**कारण जें जीविता । तें वानिलें जरी सेवितां**

**तरी अन्नचि पांडुसुता । होय विष ॥**

हें अन्न सतत मिळावें त्याचा योग्य विनियोग करण्याची बुद्धि व्हावी या एकाच हेतूने आचार्यांनी अन्नपूर्णाम्बेची केलेली ही प्रार्थना मननीय आहे. या अन्नाचा योग्य विनियोग केला तर काय प्राप्त होते याची स्पष्टता आचार्यांनी अखेरच्या श्लोकांत केली आहे. त्याकडे जरा बारकाईने पाहिल्यास योग्य अन्नाच्या सेवनाने मुक्ती प्राप्त होते, मानव ब्रह्मपदीं विराजमान होतो असें दिसून येईल.

रोज भोजनाच्या प्रारंभीं हे स्तोत्र पठण केल्यास आनंद जन्मभर टिकतो असा अनुभव आहे. त्याचा विधी खाली दिला आहे.

जेवणाचे सर्व पदार्थ पानांत वाढून झाले म्हणजे सर्वांनीं पानावर बसावें. प्रारंभी आचमन करावे. (स्त्रियांनी सुद्धां आचमन करावें) मुख्य अन्नाचा स्पर्श करमध्याला होईल अशा तऱ्हेने उजवा हात अन्नावर उपडा धरावा. मनात अन्नपूर्णेचे ध्यान करावे आणि या स्तोत्रांतील पहिले तीन श्लोक म्हणावेत. अखेर नमस्कार करावा आणि नंतर पुढील कार्यक्रमाला प्रारंभ करावा. जेवण झाल्यावर पानावरून उठतांना तर्जनीने (आंगठ्या-जवळील बोटाने) भूमीला स्पर्श करावा आणि उठावें.

यासाठीं भूमीवर बसूनच जेवावे लागेल. टेबलावर बसून जेवण करतांना या विधीचा उपयोग होत नाही. या कार्यक्रमांत आसनाला महत्त्व आहे. शरीराचे सर्व अवयव बद्ध असले तरच ह्या अन्नाचा विनियोग चांगला करतां येतो. अशा तऱ्हेच्या विधीने अन्न रुचकर लागते. अन्नाचा पुरवठा होतो. मनुष्य सर्व काळ आनंदी राहातो. त्याचे जीवन कांचनतेजाने तेजाळते आणि त्याला असलेल्या मंगलतेचा सुवास सर्वत्र दरवळतो.

# श्री अन्नपूर्णास्तोत्रम्

भगवति भवरोगात् पीडितं दुष्कृतोत्थात् ।
सुतदुहितृकलत्रोपद्रवेणानुयातम् ।
विलसदमृतदृष्ट्या वीक्ष विभ्रान्तचित्तम् ।
सकलभुवनमातस्त्राहि माम् ॐ नमस्ते ॥ १ ॥

ॐ (हें जिचें स्वरूप आहे अशा) हे माते, तूं तिन्ही लोकांची माता आहेस, (गत जन्मीच्या) दुष्कृतीमुळें मी भवरोगानें अत्यंत पीडित झालों आहे. कन्या, पुत्र, पत्नी यांचा मोठा त्रास मागें लागला आहे. माझे चित्त भ्रांत झालें आहे. अशा वेळीं अमृतमय दृष्टीनें माझ्याकडे कृपा-कटाक्ष टाक आणि माझे रक्षण कर.

माहेश्वरीमाश्रितकल्पवल्ली-
महंभवोच्छेदकरीं भवानीम् ।
क्षुधार्तजायातनयाद्युपेत-
स्त्वामन्नपूर्णे शरणं प्रपद्ये ॥ २ ॥

महादेवाची अर्धांगना असणाऱ्या महान् शक्तिमती, अनन्य भावानें शरणागत झालेल्याचे सर्व मनोरथ पूर्ण करणारी तूं प्रत्यक्ष कल्पलता आहेस. भुकेनें व्याकुळ झालेल्या बायकोमुलांच्या पसाऱ्यानें युक्त असा मी, हें अन्नपूर्णा माते, तुला शरण आलों आहे.

दारिद्र्यदावानलदह्यमानम् ।
पाह्यन्नपूर्णे गिरिराजकन्ये ।
कृपाम्बुधौ मज्जय मां त्वदीये ।
त्वत्पादपद्मार्पितचित्तवृत्तिम् ॥ ३ ॥

हे गिरिराजदुहिते सर्वत्र पसरलेल्या दारिद्याच्या वणव्यानें मी भाजून निघत आहे. मी माझी चित्तवृत्ति तुझ्या पदकमलीं अर्पण केली आहे. त्या मला तूं आपल्या कृपासागरांत बुडवून टाक.

**इत्यन्नपूर्णास्तुतिरत्नमेतत् ।**
**श्लोकत्रयं यः पठतीह भक्त्या ।**
**तस्मै ददात्यन्नसमृद्धिमम्बा ।**
**श्रियं च विद्यां च यशश्च मुक्तिम् ॥ ४ ॥**

हे अन्नपूर्णेचें स्तोत्र म्हणजे एक रत्न आहे. या तीन श्लोकांचें जो भक्तिपूर्णत्वाने पठन करतो त्याला ही जगन्माता, अन्न-समृद्धि, संपत्ति ज्ञान, यश आणि (अखेर) मुक्ती देते.

* * *

# श्री सूर्य कवच

**सूर्य आत्मा जगतः तस्थुषः च ॥ ऋग्वेदः**

सूर्य हा सर्व स्थावर जंगमाचा आत्मा आहे. अशा शब्दांनी सूर्याचे अस्तित्व या जगात कसें प्रत्ययास येतें याचा विचार स्पष्ट केला आहे. त्यामुळेच वेदकाळापासून किंवा त्यापूर्वी देखील सूर्याची उपासना भारतात प्रचलित होती. सूर्य हा सर्व विश्वाचा आत्मा असल्यानें त्याच्या उपासनेची सहजप्रवृत्ति असावी हें अगदी स्वाभाविक आहे. त्यामुळेंच वैदिक वाङ्मयांत अनेक ठिकाणीं सूर्यस्तव करण्याचा मोह प्राचीन ऋषीनांसुद्धा आवरतां आला नाहीं. सूर्य हाच सर्व प्राण्यांचा प्रेरक आहे. या विश्वामध्ये जीव, समजीव आणि निर्जीव अशी वस्तुमात्रांची उत्पत्ती आहे. या सर्वच वस्तु सूर्यामुळे प्रकाशित होतात. जीवी आणि समजीवी यांचे तर सूर्याशीं इतके जवळचे नाते आहे की सूर्य नसला तरी सूर्याच्या प्रकाशांत ते आपले जीवन सूर्यदर्शन होईपर्यंत कसे तरी जगू शकतात. परंतु सूर्यदर्शन जर झाले नाही तर त्या वस्तुचें जीवन संपुष्टांत आल्यावाचून राहणार नाही. सूर्याच्या या प्रभावामुळेच लोक सूर्याकडे आकर्षिले गेले.

सूर्याचा प्रभाव प्रत्येक वस्तूवर कसकसा होतो याचा ते शोध घेऊ लागलें. अखेर त्यांना असें आढळून आले कीं सूर्याच्या उपासनेनें सूर्याचें तेज मानव किंवा झाडें आकर्षित करूं शकतात. त्या तेजावर अनेक दिवस जगण्यांचें सामर्थ्य मानवाला प्राप्त होते. ज्यावेळी असे सामर्थ्य प्राप्त करून घेता येतें असे आढळून आलें तेव्हां तें तेज आकर्षित करण्याच्या क्रियांचा देखील पूर्वसूरींनीं विचार केला. अनेक ऋषींनीं अनेक प्रयोग एका पाठोपाठ केले आणि त्यांतून निश्चित झालेले विचार कोणत्यातरी माध्यमातून त्यांनी जगाच्या पुढे मांडले. विश्वातले जे पदार्थ सूर्याचे अधिकाधिक तेज आकर्षित करून घेतात त्यांचीही गणना त्यांनी केली. सूर्यकान्त मणी, पांढरी, तांबडी आणि पिवळी पुष्पें, सुवर्ण, तांबे, पाणी, पांढरी वस्त्रें, तुळस, कदंब, अशोक, कांचन, वगैरे वृक्ष यांच्यावर सूर्यकिरणांचा होणारा प्रभाव फार मोठा आहे. या सर्वांचा उपयोग करून घेवून लोकांना सूर्याचें तेज कसें प्राप्त होईल याचा प्रयत्न केला गेला. सूर्य जगांत आहे तोपर्यंत सर्व व्यवहार सुरळीत चालतात. परंतु तो कधी काळी केवळ ढगानी आच्छादला गेला तरी देखील लोकांचा उत्साह कमी होतो. उत्साही हवा निघून जाते आणि मानवाच्या नित्याच्या कार्यक्रमांत शिथिलता प्राप्त होते. पावसाळ्याच्या दिवसांत हा अनुभव प्रत्येकाला नित्य येणारा आहे. अर्थात त्या काळांत सुद्धां सूर्यतेजाचा आवश्यक तो वाटा प्राप्त व्हावा म्हणून निरनिराळ्या पदार्थांचे सांनिध्य प्राप्त करून देऊन ते तत्त्व प्रसृत केलें आहे. अर्थात त्याला धर्माचे गोमटें बंधन घातल्याने त्याचा आचार शुद्ध आणि यथासांग होईल या मनीषेनें त्यांनी त्या आचाराबरोबरच मंत्राचा देखील उपयोग प्रतिपादन केला. वाचा ही सूर्यामुळें प्रभाव पावते, विस्तारतें असा सिद्धांत आहे. उच्चारलेलें प्रत्येक अक्षर कोणत्या प्रकारचे तेज प्रसविते; त्याचा प्रभाव अधिक व्हावा असे वाटत असेल तर कोणाच्या संगतीत अगर कोणत्या

पदार्थांच्या सांनिध्यांत ही अक्षरें उच्चारली जावीत याचेही एक सूक्ष्मतम शास्त्र बनविण्यात आलें आहे. या शास्त्राचा आणि त्याच्या परिसराचा कांहीसा विचार या ठिकाणी कर्तव्य आहे,

## सूर्याची व्याप्ती

सूर्य हा एक महान ग्रह आहे. मानवी विश्वांत याच्या इतका मोठ्या विस्ताराचा आणि प्रचंड तेजाचा अन्य ग्रह नाही. तसें पाहिलें असतां मानवी विश्व हें फारच संकुचित आहे. मानवाची बुद्धी ज्या ठिकाणी स्पर्शही करूं शकणार नाही अशा अवाढव्य आकारापेक्षां देखील हे विश्व फार मोठे आहे. त्या विश्वांत असे अनेक सूर्य आणि त्याच्या आकर्षणाने त्याच्या परिसरात राहाणारे असंख्य तारे आणि असंख्य ग्रह आहेत. त्या एकेका समुदायाला सूर्यमाला असे म्हणतात. या सूर्यमाला इतक्या असंख्य आहेत की मानवाची बुद्धी त्याचा विचारही करूं शकत नाही. अशा या मालेमध्यें सूर्य हा एक प्रमुख ग्रह आहे. अर्थात आपणाला दिसणारा सूर्य जेवढा आहे म्हणून संबोधिलें जाते त्यापेक्षां असे अन्य सूर्य लहान अगर मोठेही असण्याचा संभव आहे. भगवान् गोपालकृष्णांनी अर्जुनाला आपलें विश्वरूप दाखविले. त्या विश्वरूपाचें अल्पसें वर्णन श्रीमत् भगवद्गीतेच्या अकराव्या अध्यायांत आलेलें आहे. '**तैसे ते दिव्य सूर्य सहस्त्रवरी । जरी उदयती कां एकेचि अवसरी ।**' असा ज्ञानदेवांनी उल्लेख करून आपली टीका स्पष्ट केली आहे. म्हणजेच या विश्वाच्या पसाऱ्यांत सहस्रांनी मोजता येतील असे अनेक दिव्य सूर्य आहेत. त्यांच्या तेजाच्या प्रचंडतेपेक्षांही विश्वनाथाचें तेज अधिक आहे. कारण विश्वाला व्यापून उरणाऱ्या जगन्नाथाच्या संपूर्ण तेजोवान शरीराचा एक भाग जो डोळा तो म्हणजे हा सूर्य अशी या सूर्याची ख्याती आहे. विश्वाच्या रचनेंत हा सूर्य कसा

निर्माण झाला त्याचें वर्णन पाहिले कीं आपल्या हे सहजपणें लक्षांत येईल कीं विष्णूच्या केवळ एका डोळ्याचें हें एवढे प्रचंड तेज पसरलें आहे. त्या आद्य पुरुषाचें वर्णन इतके मनोरम आहे की ते मुळांतून पाहाणेंच योग्य ठरेल.

**ॐ सहस्त्रशीर्षापुरुषः सहस्त्राक्षः सहस्त्रपात् ।**
**स भूमिं विश्वतोवृत्वात्यतिष्ठद्दशांगुलम् ॥**
**चक्षोः सूर्योऽजायत ॥ (ऋग्वेद)**

या प्रमाणानें त्या विश्वरूपाचे तेज कल्पनेच्या गणितानें देखील गोचर होणारें नाहीं. एका सूर्याच्या तेजाची कल्पना आपणास येवू शकते. विश्वरूपाच्या तेजाची कल्पना करता येणेही शक्य नाही. अशा अवाढव्य तेजाचा एक बारीकसा गोल म्हणजे हा नेत्रांना दिसणारा सूर्य आहे. त्याचे व्यक्तिगत मापन केले तेव्हां शास्त्रज्ञांना असें आढळून आले की हा तेजोवान सूर्य या पृथ्वीच्या पृष्ठभागापासून ९-२९ कोटी मैल दूर आहे. सूर्य हा आकाराने गोल असून त्याचा व्यास ८,६४,१०० मैल आहे. त्याची उष्णता इतकी तीव्र आहे की त्याच्या पृष्ठभागाचे तपमान १२००० फॅ. हीट आहे.

ज्योतिर्विदांनी जे नऊ ग्रह मानले आहेत त्यात सूर्य हाही एक ग्रह आहे. त्या ग्रहाचे परिणाम प्रत्येक वस्तुवर होत असतात. बारा राशी भ्रमण करतांना तो निरनिराळ्या प्रकारचे परिणाम घडवितो. तो एक स्वतंत्रच विषय आहे. ज्योतिर्विदाचे गणित सूर्यावर बरेचसे अवलंबून असते.

जगांत एकूण जे धर्म नांदतात त्या प्रत्येक धर्मात सूर्याला श्रद्धा-स्थान प्राप्त झालेलें आहे. देव अगर देवता म्हणून सूर्याला मान दिला

जातो. सूर्याच्या बाह्य तेजाचें आणि व्यापाचें संशोधन आधुनिक संशोधकांनी केलें आहे. परंतु त्याच्या सुप्त शक्तीचे संशोधन मात्र पूर्वीच्या ऋषीनी केलेले आहे. ज्याप्रमाणें देवता म्हणून त्याची स्तुतिस्तोत्रें त्यांनी गाईली आहेत त्याप्रमाणें प्रत्येक अक्षरावर सूर्याचा काय परिणाम होतो तेंही शोधून काढून त्या तेजाचा आविष्कार मानवी शरीरात कसा होईल किंवा मानवाला त्याच्या त्या दिव्य तेजाचा उपयोग स्वतःसाठी कसा करून घेता येईल या बाबतीतही काही सूत्रें त्यांनी तयार केलीं. त्या सूत्रांच्या उच्चारानें सूर्याचे तेज सूत्रपाठकाच्या शरिरात आवर्तित होते, आणि त्याचा परिणाम त्याच्या जवळच्या वस्तूंवर देखील होतो.

एकदा पूज्यपाद वासुदेवानन्द सरस्वती टेंबे स्वामी सावंतवाडी येथें एका ब्राह्मणाकडे गेले होते. त्या गृहस्थाकडे त्या दिवशीं श्राद्ध होते. जेवणापूर्वी गंधलेपन करावें असा आचार आहे. त्या दिवशीं गंध उगाळण्याचें कार्य स्वामी स्वतः करीत होते. मुकाट्यानें गंध उगाळण्यापेक्षा मुखानें काही म्हणावें म्हणून ते सौर म्हणत होते. सौर हें सूर्याचें वेदातील एक प्रभावी सूत्र आहे. गंध उगाळून झालें. जेवणापूर्वी ते ब्राह्मणांच्या मस्तकाला लावलें. जेवतांना ब्राह्मण बेचैन झालेलें दिसले म्हणून यजमानानी पृच्छा केली. तेव्हा सर्व ब्राह्मणांनी आपल्या मस्तकाची असह्य आग होत असल्याचें सांगितलें. असें का व्हावें म्हणून शोध घेण्याचें कार्य चालू झालें. तेव्हा त्यांना आढळून आलें कीं स्वामी गंध उगाळीत असता सौरसूक्त म्हणत होते. त्या सूक्ताचा परिणाम गंधावर झाला आणि गंधाचा परिणाम ब्राह्मणांच्या मस्तकावर झाला. आचारवान् ब्राह्मणाच्या मुखानें म्हटलेल्या वेदसूक्तांचा काय परिणाम घडतो त्याचें हें जिवंत उदाहरण आहे. या एकाच उदाहरणावरून कल्पना येईल की सूर्याचें तेज आकृष्ट करणारे अनेक मंत्र आहेत. त्या त्या मंत्राच्या जपाने मनुष्य शुद्धतम बनतो आणि आपल्या आयुष्यात कीर्तिमान आणि सर्व सुखाचा स्वामी

बनतो. या सर्व मंत्रांत गायत्री मंत्र हा अत्यंत प्रभावी आहे. त्याचा परिणामही फार मोठ्या प्रमाणात घडतो. परंतु त्या मंत्राचा जो परिसर आहे तो सर्व तऱ्हेनें अत्यंत शुद्ध असला पाहिजे. त्या मंत्राच्या उपासनेसाठी अनेकविध पथ्यांची आवश्यकता असते. त्या पथ्याकडे किंचित् दुर्लक्ष केल्यास साधकाला त्याचे विपरीत परिणाम भोगावयास लागतात. त्याचे सबंध जीवन विस्कळित होऊन जाते. परंतु सर्व पथ्यांचा अवलंब केला तर त्याला या मंत्राचें वैभव आपोआप प्राप्त होते.

पूर्वीच्या वर्णाश्रमधर्माप्रमाणे गायत्रीमंत्राचा अधिकार त्रैवर्णिकानांच आहे. त्यांत थोडाबहुत स्त्रियांचाही समावेश आहे. परंतु पूर्वीच्या ऋषीनीं आणि ज्ञात्या लोकांनी गायत्री मंत्र सर्वांना कसा म्हणता येईल किंवा त्यापासून जें फळ प्राप्त होईल तें सर्वांना कसें प्राप्त होईल याचा विचार करून सूर्य-कवच या नांवाचें एक स्तोत्र निर्माण केलें. ज्यांना गायत्रीमंत्र त्याच्या सर्व पथ्यांसहित जपतां येत नाहीं त्यांनी सूर्यकवच म्हणावें. या सूर्य कवचाची जप पद्धती आणि पथ्ये गायत्रीमंत्रापेक्षा किंचित स्थूल स्वरूपाची आहेत. अर्थात त्यामुळेच तें स्तोत्र कोणाला कोठेही पठण करतां येईल.

हें सूर्य कवच महामुनी याज्ञवल्क्य यांनी तयार केलें असून तें अन्य ऋषींनां आणि आपल्या शिष्यांना दिलें. ज्या याज्ञवल्क्यांनीं हें स्तोत्र लिहिलें त्यांचा आणि सूर्याचा अतिशय निकटचा संबंध प्रस्थापित झाला होता. किंबहुना सूर्य हाच याज्ञवल्क्यांचा गुरु होता असें म्हटलें तर तें चुकीचें होणार नाहीं. त्यामुळे सूर्यानें आपलें सर्व वैभव याज्ञवल्क्याला ज्ञात करून दिलें होतें. इतकेंच नव्हे तर आपल्या ज्या अनेकविध विभूती आहेत त्यांचाही उलगडा सूर्याने केला आहे. सूर्याच्या विभूती म्हणजे या विश्वांत सूर्याचें तेज ग्रहण करणारे जे अनेकविध पदार्थ आहेत त्यांतील

उच्चस्तरांतील पदार्थ होत. सूर्याच्या या सर्व भूमिका सूर्योपनिषद नांवाच्या एका उपनिषदांत सविस्तर सांगितल्या आहेत. त्याचा कांहीं भाग मुद्दाम खालीं दिला आहे.

आदित्याद्वायुर्जायते (सूर्यापासून वायु निर्माण झाला.)
आदित्याद्भूमिर्जायते ( ,, भूमी झाली.)
आदित्यादापोजायते ( ,, पाणी झालें.)
आदित्याज्ज्योतिर्जायते ( ,, तेज झाले.)
आदित्यात् व्योम दिशो जायन्ते ( ,, आकाश आणि दिशा निर्माण झाल्या. )
आदित्याद्देवा जायन्ते ( ,, देव जन्म घेतात.)
आदित्याद्वेदा जायन्ते ( ,, वेद-ज्ञान-जन्मतें)
आदित्योऽन्तः करणमनो बुद्धिचित्ताहंकाराः (सूर्य म्हणजेच अंतःकरण, मन, बुद्धि, चित्त अहंकार होय.)
आदित्यो वै व्यानः
समानोदानोऽपानः प्राणः। (सूर्य म्हणजेच पंचप्राण होत.)
आदित्यो वै
श्रोत्रत्वक्चक्षूरसनघ्राणाः (सूर्य म्हणजेच पंच ज्ञानेंद्रिये होत.)
आदित्यो वै
वाक्पाणिपादपायूपस्थाः (सूर्य म्हणजेच पांच कर्मेंद्रिये होत. )
आदित्यो वै शब्दस्पर्शरूपरसगंधाः (शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध म्हणजे सूर्यच होत.)

या आणि अशा अनेक विभूतींची आणि प्रभावांची माहिती सूर्यानें याज्ञवल्क्यांना स्वतः प्रतिपादन केली होती. याज्ञवल्क्य हे स्वतः द्रष्टे आणि अत्यंत स्वाभिमानी पुरुष होते. तपस्या आणि शुद्ध आचरण यांच्या योगें

त्यांनी आपल्या गुरुला देखील मागें सारले. अशा या प्रभावी विभूतीच्या स्वानुभावांतून हें कवच बाहेर पडलें आहे.

महर्षी व्यासांनी वेदाचे चार भाग केले. त्यांत यजुर्वेद असून त्याचें प्रमुखत्व वैशंपायन यांच्याकडे दिले. वैशंपायनानें याज्ञवल्क्याकडून सांग अध्ययनं करवून घेतलें. त्यामुळे त्याच्या सर्व कृतीला एक विशेष तेज प्राप्त झालें. अशी एक कथा सांगतात कीं एकदा एका राजाला संतती नव्हती. त्यासाठीं त्यानें अनेक याग वगैरे केले. अखेर त्यानें वैशंपायनाला याबाबत प्रश्न केला. तेव्हा त्याने सांगितलें की माझा शिष्य जो याज्ञवल्क्य त्याच्या मंत्राक्षता जर तुला प्राप्त झाल्या तर तुला खात्रीनें पुत्र प्राप्त होईल. पण हें व्हावें कसें. कारण याज्ञवल्क्य तसा येणार नाही आणि अक्षता देखील देणार नाही. तेव्हा वैशंपायनानें सांगितलें की माझे अनेक शिष्य आहेत. रोज एक शिष्य मी तुझ्याकडे भोजनार्थ पाठवितो. या क्रमांत याज्ञवल्क्य तुझ्याकडे येईल. त्याचा चांगला आदर करून त्याच्याकडून आशीर्वाद घे.

त्याप्रमाणें राजाकडे एक एक शिष्य भोजनास येऊ लागला. याज्ञवल्क्याची वाट पाहात राजा अतिशय दक्षतेनें राहिला होता. तरी पण एक दिवस त्याचें नशीबच त्याला आडवें आलें. तो एकदा मृगयेला गेला. त्याची पत्नी अस्पर्शा होती आणि त्याच वेळीं बरोबर याज्ञवल्क्य भोजनास आला. भोजन संपल्यावर त्यानें यजमानांची चौकशी केली. तेव्हा ते मृगयेला गेल्याचे समजले. तेव्हा त्याने विचारले की या मंत्राक्षता कोणाला देऊ. तेव्हा दाराआड उभी राहून राजाच्या पत्नीने सांगितलें की मी अस्पर्शा आहे. आपण आपल्या मंत्राक्षता त्यांच्या या समोरच्या महालांत टाकाव्यात. त्याप्रमाणे याज्ञवल्क्याने अक्षता महालात टाकल्या. त्याबरोबर तेथील स्तंभांना पल्लव फुटले. रत्नांचे तेज दुप्पट झाले, आणि

भिंतीवर काढलेल्या फुलांच्या चित्रांना सुगंध प्राप्त झाला. याज्ञवल्क्य निघून गेला आणि संध्याकाळच्या सुमारास राजा मृगयेहून आला. याज्ञवल्क्य येवून गेल्याचे त्याला समजलें. महालात पाय ठेवताच झालेला बदलही त्यानें पाहिला आणि तो हळहळला. आपल्या मृगयेची त्याला चीड आली. उद्विग्न परिस्थितीत तो वैशंपायनाकडे आला. झालेली सर्व हकिगत राजाने त्याला सांगितली, पुन्हा त्याला नम्रपणें सांगितले की आपण पुन्हा उद्या याज्ञवल्क्याला पाठवा. राजाची विनंती वैशंपायनानें मान्य केली. याज्ञवल्क्याला त्याने हांकारले आणि उद्या पुन्हा राजाकडे जेवायला जाण्याची आज्ञा केली. तेव्हा त्याने आपण पुन्हा जाणार नाही असे स्पष्टपणें सांगितले. तेव्हा वैशंपायन त्याच्यावर रागावले; आणि म्हणाले माझ्याकडून शिकलेला वेद मला परत देऊन टाक. त्याबरोबर याज्ञवल्क्यानें वेद ओकून टाकला. आपल्या स्वतःच्या सामर्थ्यावर त्यानें सूर्याची प्रचंड उपासना केली. सूर्य त्याच्यावर प्रसन्न झाला. तेव्हा याज्ञ-वल्क्यानें त्याला वेद शिकविण्याची विनंती केली. त्याच्यावर संतुष्ट झालेल्या सूर्यानें त्याची विनंती मान्य केली. आणि त्याला यजुर्वेद पुन्हा शिकविला. ह्याला शुक्ल यजुर्वेद असे म्हणतात. हा वेद अभ्यासत असतांना तो सूर्याच्या रथावर बसत असे. त्यामुळें सूर्याला त्यानें चांगल्याप्रकारें समजावून घेतला. सूर्याच्या तेजाचे स्तोत्र त्यानें अनेक ठिकाणीं गाइलें आहे. त्यानें प्रत्येक रचना वेदमय केली आहे आणि त्याचें महत्त्वही तितकेच आहे. याच त्याच्या परंपरेत त्याच्या जवळ असलेल्या ऋषीनी त्याला एकदा प्रश्न केला की याज्ञवल्क्या, तू सूर्याच्या रथात बसून वेदा-ध्ययन केलेस. सूर्याची दीप्ती तुला कशी काहीच करू शकली नाही. त्याने या प्रसंगी दिलेले उत्तर अतिशय मार्मिक आहे. जोपर्यंत सूर्यदीप्ती आपल्या अंगी प्राप्त झाली नाही तोपर्यंत सूर्यनाममंत्राचे कवच अंगावर घालावें. त्या सूर्याची दीप्ती ज्यावेळी अंगीं येईल तेव्हा अशा कवचांची आवश्यकता

नाही. कारण अग्नी ज्याप्रमाणें अग्नीला जाळत नाही, त्याप्रमाणे सूर्यदीप्ती प्राप्त झालेल्या देहाला सूर्याचें तेज जाळत नाही तर उलट तेंच सहाय्यकारी ठरतें. याप्रमाणें दीप्तिवान पुरुषाला चारही पुरुषार्थ प्राप्त होतात. या संवादातच ऋषीनी हें कवच कसे तयार करावयाचें त्याची पृच्छा केली. तेव्हा याज्ञवल्क्यांनीं त्या सर्वां ऋषीना जें मंत्रकवच कथन केलें तेच कवच पुढें दिलें आहे. त्या कवच्यानें प्रत्येक मानवाला स्वतःच्या भोंवती सूर्याचें कवच तयार करता येते. अर्थात त्याला काही प्रक्रिया मात्र सांगितल्या आहेत. या प्रक्रियांच्या साह्यानें हें कवच सिद्ध होतें. एकदा हे कवच सिद्ध झालें म्हणजे त्या साधकाला ते दुसऱ्याला सहजपणें प्रदान करता येते.

**कवच सिद्ध करण्याची पद्धती—**

महिन्यात येणाऱ्या कोणत्याही संक्रांतीच्या दिवशीं याच्या सिद्धीसाठी प्रारंभ करावा. त्यांतल्या त्यात सूर्य मेष राशीत प्रवेश करीत असता जो दिवस येतो तो सर्वात चांगला. त्या ठरलेल्या दिवशीं पहाटे स्नान करून एका आसनावर पूर्वाभिमुख बसावें. समोर पाट अगर चौरंग ठेवावा. त्यावर सूर्याची प्रतिमा तांदूळ अगर तांबडी फुले यांनी काढावी. काही ठिकाणीं अष्टगंध किंवा पिंजरेने काढलेली प्रतिमा देखील ग्राह्य धरली आहे. त्या प्रतिमेची पूजा करून तिला दुधाचा नैवेद्य दाखवावा. तुपाच्या दिव्यानें ओवाळावें. ज्या दुधाचा नैवेद्य दाखवतो त्याच दुधाची व गवल्यांची खीर करून सूर्याला अखेर भोजन द्यावें. भोजनापूर्वी मी आता कवचस्तोत्र पठण करतों तें आपण ऐकावें अशी प्रार्थना करून सूर्योदयाबरोबर हे कवच म्हणण्यास प्रारंभ करावा. रोज १२ वेळा याप्रमाणे १०८ दिवस या स्तोत्राचा पाठ करावा. जागा आणि वेळ बदलू नये. स्तोत्र म्हणून झाल्यावर खिरीचा नैवेद्य सूर्याला समर्पण करावा आणि तो प्रसाद म्हणून साधक आणि त्याच्या कुटुंबातील अन्य मंडळीनी भक्षण करावा.

पाठ चालू असता पाळावयाची पथ्यें—

( १ ) एकदां घातलेलें आसन पाठ पूर्ण होईपर्यंत हलवू नये.

( २ ) मध्ये कोणाशीही बोलू नये अगर खुणांनी देखील काही सांगण्याचा प्रयत्न करू नये.

( ३ ) हें म्हणतांना पांढरी वस्त्रे परिधान करावींत.

(४) कवच म्हणण्यापूर्वी आई, वडील आणि आपले गुरु यांन वन्दन करावें.

(५) कवच्याचा पाठ पूर्ण झाला की सूर्याचे दर्शन घ्यावे.

(६) स्त्रियांनी हें कवच म्हणतांना वरील सर्व नियम पाळावेत. त्यांनी आपल्या नैसर्गिक अडचणीचे पांच दिवस वर्ज्य करावेत. मस्तकीं कुंकवाबरोबर हळद देखील लावावी.

(७) १०८ दिवस पूर्ण होईपर्यंत परान्न घेवू नये.

(८) मांसान्न घेवू नये, अगर मद्यपान करूं नये. रात्रीं दहीं खावूं नये.

या सर्व पथ्यांचा अवलंब करून हें स्तोत्र सिद्ध झालें कीं तें प्रदान करतां येतें. हें स्तोत्र सिद्ध झाल्याची खूण म्हणजे ज्या वेगानें आपण हें स्तोत्र म्हणतो त्यापेक्षां आपण तें सूर्याच्या किरणांत उभे राहून म्हणूं लागल्यास म्हणण्याची गती वाढते आणि शब्दांची स्पष्टता प्रत्ययाला येते. त्याचप्रमाणे सबंध शरीर शांत राहते. तळपाय आणि कानाच्या पाळ्या गार होतात. एकदां हे स्तोत्र सिद्ध झाले की रोज त्याचा एक पाठ तरी केला पाहिजे.

या पद्धतीशिवाय हे कवच सिद्ध करण्याची आणखी एक पद्धत आहे. ज्यावेळी सूर्यग्रहण असेल तो दिवस घ्यावा. ग्रहण-स्पर्शवेळी नदीच्या तळ्याच्या अगर समुद्राच्या पाण्यांत पूर्वेकडे तोंड करून उभे राहावे.

पाणी आपल्या बेंबीच्या वर असावे. अर्थात त्यापूर्वी स्नानादी सर्व कर्मे उरकलेली असली पाहिजेत. ग्रहणाच्या अगोदरच्या, ग्रहणाच्या आणि ग्रहणाच्या नंतरच्या दिवशी व्रतस्थ असावें. या प्रमाणे एकूण १२० पाठ या स्तोत्राचे करावेत. ग्रहण सुटल्यानंतर पुन्हा स्नान करून सूर्याची पूजा करावी. त्याला दुधाचा नैवेद्य घरी येऊन दाखवावा. याप्रमाणेंही हें कवच सिद्ध करतां येतें. फक्त ग्रहणकाल किती आहे आणि तेवढ्या वेळांत पाठ पूर्ण होतील किंवा कसे याची दक्षता घेतली पाहिजे.

हे स्तोत्र याप्रमाणे सिद्ध झालें की त्याच्या पाठाने अंगारा अथवा एखादा दोरा तयार करतां येतो. या स्तोत्राचा प्रमुख उपयोग ज्या कारणांसाठी होतो ती कारणे खाली नमूद केली आहेत.

(१) जी लहान मुलें रोगी किंवा विशेष करून रिकेट्स वगैरे असतात अशा मुलांना घेवून सूर्य किरणांत उभे राहावें आणि या स्तोत्राचा रोज तीन वेळां याप्रमाणे बारा दिवस पाठ करावा. किंवा तांब्याच्या पात्रांत पाणी घेवून तें सूर्यकिरणांत ठेवावें आणि त्या पाण्याकडे पाहून तीन पाठ करावेत. त्यानंतर त्या पाण्याने मुलास स्नान घालावें आणि त्यांतील घोटभर पाणी पाजावें. याप्रमाणे बारा दिवस करावें.

(२) जी मुलें बुद्धीनें कमी असतील त्यांनी रोज ह्या कवच्याचे तीन पाठ करावेत. मुलांना पाठ करणें शक्य नसेल तर त्याच्या घरच्या कोणीही माणसानें ते करावेत व ते त्याला ऐकवावेत.

(३) गरोदर स्त्रियांनीं पहिल्या महिन्यापासून रोज एकवेळ सूर्याच्या उन्हांत तुळशीजवळ उभे राहून याचा पाठ करावा. होणारे मूल कान्तीमान आणि निरोगी होते.

(४) ज्यांची पचनशक्ती बिघडली आहे त्यांनी सूर्योदयाबरोबर सूर्याकडे पाहून याचे तीन पाठ करावेत. किंवा दुपारीं ताम्हनांत पाणी

घेवून त्यांत सूर्यबिंब पाहावे आणि पाठ म्हणावा. नंतर ते पाणी पिऊन टाकावे.

(५) रात्रीच्या वेळी लहान मुलें घाबरतात. त्यांच्यासाठी ह्या कवच्याचा पाठ रोज सूर्योस्ताचे वेळीं करावा. हाती भस्म घ्यावें आणि पाठ पूर्ण झाल्यावर तें त्या मुलाला लावावें.

(६) या स्तोत्राच्या नित्य पठणानें दीर्घायुष्य, आरोग्य आणि संपत्ती प्राप्त होते.

(७) मनुष्याच्या अंगावर हे कवच तयार करून घालतां येते. ज्यांना शस्त्र वगैरे लागण्याची भीती असते, अग्नीशीं संबंध असतो, रोगी लोकांशी संबंध असतो, बाहेरच्या अदृश्य शक्ती ज्याच्यावर आपला अंमल गाजवितात तो नाहीसा व्हावा म्हणून असें कवच तयार करून घ्यावें. ज्यानें हें कवच सिद्ध केलें आहे त्यानें पूर्वाभिमुख आसनावर बसावें. आपल्या उजव्या हाताला ज्याच्या शरीरावर हें कवच करावयाचे त्याला बसवावें म्हणजे त्याचे मुख उत्तरेस होईल. त्यालाही स्वतंत्र आसनावर बसवावें. ज्याच्यावर हे कवच करावयाचें आहे त्याच्या जवळचे एखादेच माणूस जवळ असले तर चालेल. दोन माणसांपेक्षा अधिक माणसे मात्र त्या खोलीत असू नयेत. अन्यथा हें कवच दोषपूर्ण होण्याचा संभव असतो. एका माणसावर एकदांच कवच करतां येते. एकदां केलेले कवच बारा वर्षेपर्यंत टिकते. त्यानंतर पुन्हा कवच करावयाचें असेल तर ज्याचे त्याने स्वतः कवच सिद्ध करावे. दुसऱ्यानें पुन्हा कवच केल्यास त्याचा उपयोग मात्र होत नाही. यासाठी कवच करणाऱ्या व्यक्तीने जरूर ती दक्षता घ्यावी. वरील प्रमाणे आसनस्थ झाल्यावर कवच करणाऱ्यानें हाती भस्म घ्यावे आणि चिमटीनें तें चूर्ण करीत या कवच्याचा एक पाठ करावा आणि नंतर पुढीलप्रमाणे प्रक्रिया करावी.

**शिरो मे भास्करः पातु** । असें म्हणून मस्तकावर भस्म लावावें.

**ललाटं मेऽमितद्युतिः** । कपाळाला भस्म लावावें.

**नेत्रे दिनमणिः पातु** । नेत्राचे दोन कोपरे आणि पापण्या यांना भस्महस्ताचा स्पर्श करावा.

**श्रवणे वासरेश्वरः** । भस्म कानांना लावावें.

**घ्राणं घर्मघृणिः पातु** । नाकाला भस्म लावावे

**वदनं वेदवाहनः** । ओठांना लावावें

**जिह्वां मे मानदः पातु** । जिभेच्या टोकाला आणि मध्यभागी.

**कण्ठं मे सुरवन्दितः** । कंठाला भस्म लावावे.

**स्कन्धौ प्रभाकरः पातु** । दोन्ही खांद्याना भस्म लावावें.

**वक्षः पातु जनप्रियः** । छातीला मध्यभार्गी, दोन्ही स्तनाग्रें, यांना भस्म लावावें.

**पातु पादौ द्वादशात्मा** । मांडीपासून तळपायापर्यंत लावावें.

**सर्वांगं सकलेश्वरः** । दोन्ही बरगड्या, पोट, पाठ, कंबर, दोन्ही हात, मान, यांना दोन्ही हातांनी लावावे आणि उरलेलें भस्म त्याच्या भोंवती प्रदक्षिणेप्रमाणे टाकावें.

नंतर पुन्हा सूर्याचें ध्यान करावें. त्याला नमस्कार करावा. म्हणजे कवचप्रक्रिया पूर्ण झाली.

ज्यावेळीं या कवच्याचे एकापेक्षा अधिक पाठ करावयाचे असतात तेव्हा पहिले पांचच श्लोक म्हणावेत; आणि शेवटच्या आवृत्तीच्या वेळीं सर्व कवच म्हणजे सातही श्लोक म्हणावेत.

हे पाठ ज्याचे त्यानेंच करावयाचे असतात. अर्थात संकल्पकरून सिद्दी प्राप्त होण्यासाठी आचारसंपन्न ब्राह्मणाकडून पाठ करण्यास हरकत नाही. पण त्यासाठीं त्या पाठकाला दुप्पट आवृत्ति करावी लागेल. पाठ

पूर्ण होतांच त्याची फलश्रुती म्हणून यजमानाला या कवचपाठाचें फळ द्यावें. त्याबद्दल यजमानानें अशा ब्राह्मणाची पूजा वगैरे करून भरपूर दक्षणा द्यावी.

याप्रमाणें या कवचपठणाचे अनेक फायदे आहेत. श्रद्धायुक्त अंतः-करणानें आणि सर्व तऱ्हेची शुचिता व पथ्ये यांचे पालन केलें तर या कवच्याचे परिणाम त्वरेने गोचर होतात. ज्यामानानें आचरण होईल त्यामानानें उत्तम अगर साधारण असे परिणाम होतात असे दिसून येईल. अर्थात आचारावरच फळ लवकर अगर उशीरा मिळणें हें अवलंबून आहे. ज्याचा ज्या मानाने प्रयत्न त्या मानानें त्याला फलप्राप्ती हे निश्चित आहे.

## श्री सूर्यकवचम् ।

(१) स्तोत्र महति–श्रुणुष्व मुनिशार्दूल सूर्यस्य कवचं शुभम् ।
शरीरारोग्यदं दिव्यं सर्वसौभाग्यदायकम् ॥१॥

(२) सूर्याचें ध्यान–देदीप्यमानमुकुटं स्फुरन्मकरकुण्डलम् ।
ध्यात्वा सहस्त्रकिरणं स्तोत्रमेतदुदीरयते ॥२॥

(३) सूर्य कवच –शिरो मे भास्करः पातु ललाटं मेऽमितद्युतिः ।
नेत्रे दिनमणिः पातु श्रवणे वासरेश्वरः ॥३॥
घ्राणं घर्मघृणिः पातु वदनं वेदवाहनः ।
जिह्वां मे मानदः पातु कण्ठं मे सुरवंदितः ॥४॥
स्कंधौ प्रभाकरः पातु वक्षः पातु जनप्रियः ।
पातु पादौ द्वादशात्मा सर्वाङ्गं सकलेश्वरः॥५॥

(४) फलश्रुति – सूर्यरक्षात्मकं स्तोत्रं लिखित्वा भूर्जपत्रके ।
दधाति यः करे तस्य वशगाः सर्वसिद्धयः॥६॥
सुस्नातो यो जपेत् सम्यग् योऽधीते स्वस्थमानसः
स रोगमुक्तो दीर्घायुः सुखं पुष्टिं च विन्दति ॥७॥

इति श्रीयाज्ञवल्क्यविरचितं सूर्यकवचम् संपूर्णम्।



# श्री आदित्य हृदय

भारतीयांच्या मुखात जीं अनेक स्तोत्रे आहेत त्यांत याही स्तोत्राचा समावेश आहेच. या स्तोत्राच्या नांवावरूनच हे स्तोत्र सूर्याची स्तुती करणारे आणि सूर्यापासून अमोघ फळ देणारें आहे हें सहज समजून येईल या स्तोत्राच्या मागे फार मोठी भूमिका आहे. त्याप्रमाणें या स्तोत्राचा प्रभाव देखील त्वरेनें गोचर होणारा आहे. संसारी माणसाला ज्या अनेक अडचणीना दररोज तोंड द्यावे लागते त्यासाठी त्याला सामर्थ्य प्राप्त व्हावें आणि दुःख सहन करता येवून संसाराचा गाडा पुढें नेता यावा यासाठीच केवळ ह्या आणि अशा अनेक स्तोत्रांना भारतीयांनीं आपल्या नित्यकर्मात महत्त्वाचें स्थान दिलें आहे. आज अनेक वर्षे या स्तोत्रांचा पाठ अनुस्यूतपणें चालू असून पुढें देखील तो तसाच राहणार आहे, यांत शंका नाही. परंतु अशीं स्तोत्रें म्हणतांना कांही नियमांची आवश्यकता असते. त्या नियमांप्रमाणे साधकाचा आचार राहिला नाही तर त्या स्तोत्रांत जी फलश्रुती सांगितलेली असते ती साधकाला गोचर होत नाही. काही साधक अशा स्तोत्रांची केवळ फळे चांगली आहेत म्हणून ती म्हणूं

लागतात. पण ज्यावेळीं त्यांना त्या प्रयत्नांतून काहीच फलद्रुपता गोचर होत नाही तेव्हा त्या स्तोत्राबद्दल असलेला त्यांचा विश्वास कमी होतो आणि त्याचें पठण तो थांबवतो. इतकेच नव्हे तर त्या स्तोत्राचा पाठ अन्य कोणी करीत असतील तर त्यांना देखील तो आपला नकारात्मक अनुभव प्रतिपादन करतो. अस्थिर अंतःकरणाची जी माणसें असतील ती त्याचा तो उपदेश ऐकून आपले प्रयत्न थांबवतील. काही धीरवान असतील तर ते त्यावर विचार करतील. विचारांती त्यांना जर कळून आलें की आपलें काही चुकतें आहे तर त्यांचें अज्ञान बोलकें होईल आणि त्यातूनच त्यांना स्वकल्याणाचा मार्ग आपोआप मिळेल. स्तोत्र, कवच किंवा मंत्र कितीही चांगला असला तरी त्याचे चांगलेंपण अनुभविण्यासाठी काही आचारांची खासच जरूरी आहे. ही गोष्ट कदापी दृष्टी आड करून चालणार नाही. या बाबतीत घडलेली एक सत्य घटना येथे नमूद केली तर ती अस्थानीं होणार नाही.

माझ्या एका मित्रांनी गायत्री जपाबद्दलचें एक पुस्तक वाचलें. गायत्री मंत्राची अन्य माहिती जशी त्यांत दिली होती तशीच त्या मंत्राच्या जपापासून प्राप्त होणारी फळेंही दिली होतीं. गायत्री मंत्रानें मिळणारी फळें मोठी लोभस आहेत. त्यांच्या पूर्तीसाठी त्यांनी पुस्तकावरून गायत्री मंत्र पाठ करून म्हणण्यास प्रारंभ केला. रोज १०८ वेळा तो जप म्हणण्याचा प्रघात चालू होता. पुढे त्यांना कांही शारीरिक त्रास होऊ लागला पण त्यांनी त्याच्याकडे फारसें लक्ष दिलें नाही. घरांत नैसर्गिक अशुचिता असतांना सुद्धां त्यांनी आपल्या कार्यक्रमांत खण्ड केला नाही. पुढें त्यांच्या धंद्यांत त्यांना मनासारखें यश मिळत नाहीसें झाले. त्यामुळें मानसिक दुर्बलता प्राप्त होऊन ते आजारी पडले. त्यांचें आजारपण ऐकून त्यांना मी एकदा भेटायला गेलों. तेव्हां त्यांनी मला जें सांगितलें त्यानें मी स्तंभितच झालो. एकदम ते मला म्हणाले, 'बापूसाहेब,

गायत्री मंत्राचें वैभव मी तुमच्या तोंडूनही ऐकलं होतं आणि एका पुस्तकांत देखील वाचलं होतं. त्याप्रमाणें मी गायत्री मंत्राचा जप करण्यास प्रारंभ केला आणि खरं सांगायचं तर तेव्हांपासून आम्हांला ही उतरती कळा लागली आणि आतां मी अंथरूणाला खिळलों आहे. काय तुमचा तो गायत्री मंत्र!' त्यावर मी त्यांच्याशीं बराच काळ बोललों. पथ्यांचा सर्व विचार मी त्यांना सांगितला. गायत्री मंत्राची दीक्षा कोणा तज्ज्ञ माणसाकडून घ्यावी असें सुचविलें. तेव्हां ते मला म्हणाले, 'तुम्ही सांगता त्याप्रमाणें आचार माझ्या हातून झाला नाही तर मला फळें कोठून दिसणार. मी मात्र त्या मंत्रालाच नावें ठेविली. रोग बरा होण्यासाठी औषध घ्यायचें तर त्याबद्दलची पथ्यें सुद्धां पाळलीच पाहिजेत, अन्यथा रोग बरा व्हायच्या ऐवजी आमच्या सारखा वाढेल.' थोडक्यांत सांगायचे तर सर्व स्तोत्रें तसें पाहिले तर म्हणायला सोपी आहेत. पण त्यांच्या पथ्यांचा विचार मात्र अगोदर केला पाहिजे. त्यांतल्या त्यांत या स्तोत्राची भूमिका काय आहे ती समजावून घेणें फारच जरूरीचे आहे. त्या बरोबरच हें स्तोत्र कोणी कथन केले त्या ऋषींची प्रतिष्ठा कशी होती याचाही विचार कर्तव्य आहे. त्यायोगें त्या संबंधी स्तोत्राची महती काय आहे तें कळतें. हें सर्व ज्ञात झाल्याशिवाय कोणत्याही मंत्राला अगर स्तोत्राला हात घालूं नये.

आदित्यहृदय हें स्तोत्र वाल्मिकी रामायणाच्या युद्धकाण्डांत १०५ व्या अध्यायांत समाविष्ट आहे. भगवान् श्रीरामांनी या स्तोत्राचा प्रयोग केला आणि त्यामुळें त्यांना रावणाचें जेतेपण प्राप्त झालें. राम-रावणाच्या युद्धांत रावणाच्या शक्तीक्षेपणामुळे मूर्च्छित झालेल्या लक्ष्मणाला मारुतीनें आणलेल्या वनस्पतीनें चेतना प्राप्त झाल्याचें ऐकून रावणाला प्रचंड क्रोध आला आणि दुसऱ्या दिवशीं मोठ्या त्वेशाने तो युद्धाला आला. त्याचा तो आवेश पाहून देवेंद्रानें आपला रथ

रामासाठी पाठवून दिला. मातली हा इंद्राचा सारथी होता. त्याने इंद्राच्या आज्ञेप्रमाणे रथ आणून रामाच्या समोर उभा केला. त्या रथाच्या साह्यानें रामाला विजयश्री निश्चित माळ घालील याचीही खात्री रावणाला पटली. त्यामुळें त्याचा चेहरा क्रोधानें अधिकच लाल झाला. त्यानेंही सारथ्याला सांगून आपला रथ रामाच्या समोर उभा केला. दोघांचे युद्ध झाले. त्यावेळी रावणानें एक महान शूल रामावर फेंकला. अतिशय वेगानें येणाऱ्या त्या शूलावर रामानें हजारों बाण टाकलें पण सर्व बाण त्या-ठिकाणीं जावून चूर्ण होत. हे पाहून रावण मोठ्याने हंसून वीरगर्जना करीत होता. अखेर रामाने आपल्या जवळची एक अमोघ शक्ति काढली आणि ती त्या शूलावर फेकली. त्याबरोबर त्या शूलाचे चूर्ण झाले. रावणाच्या वीरगर्जना थांबल्या. त्याने रामावर पुन्हा बाणांचा वर्षाव करायला प्रारंभ केला. रामानेही त्याला प्रत्युत्तर दिले. त्यांत रावणाचे सर्व शरीर बाण–घातांनी रक्ताळले. त्याची शक्ति क्षीण झाली, हें पाहून त्याच्या सारथ्याने युद्धभूमीतून त्याचा रथ मागें फिरविला. सारथ्याच्या या कृत्याचा त्याला भयंकर राग आला होता. तो त्याला खूप टाकून बोलला. पण सारथ्यानें त्याला सांगितले, रथी ज्यावेळीं घायाळ होतो तेव्हां त्याला सुरक्षित स्थळीं नेण्याचे कर्तव्य सारथ्याचे आहे. तसें मी केलें नसते तरच तें अनुचित ठरले असते. त्याच्या या बोलण्याने रावण जरी शांत झाला होता तरी युद्धांतून आपण विजय प्राप्त न करतां परत आलो याची जखम त्याच्या अंतरांत झोंबत होती. त्यामुळे त्यानें सारथ्याला पुन्हा रामासमोर चलण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें सारथ्यानें केलें.

मधल्या काळांत देवांना विजय प्राप्त व्हावा म्हणून रामाला भेटण्यासाठी अगस्ती ऋषी तेथे आले होते. रामाशीं बोलताना ते म्हणाले ‘ रामा, रावण हा डिवचलेल्या सर्पाप्रमाणे पुन्हा तुझ्यावर चालून येत

आहे. त्याला तितक्याच प्रखरपणें उत्तर दिले पाहिजे. ज्या योगें त्याचें तेज हरण होईल आणि तुझें तेज वाढेल असें आदित्याचे स्तोत्र गाऊन तूं त्याची प्रार्थना कर. आदित्य देवता तुला साहाय्य करील आणि रावणाबरोबरच्या युद्धांत विजश्री तुला खात्रीने माळ घालील.'

अगस्ती ऋषीचे हें बोलणें ऐकून रामाला समाधान वाटलें. त्याने ऋषीनां नमस्कार केला आणि तें स्तोत्र कसें म्हणावें वगैरे विधी सांगण्याची प्रार्थना केली. त्याप्रमाणें ऋषींनी त्याला तें स्तोत्र आणि त्याचा सर्व विधी समजावून सांगितला.

हें स्तोत्र सूर्योदयाबरोबर म्हणावें. त्यापूर्वी साधकाने स्नानादी सर्व विधी आणि संध्यावंदनादी कार्यक्रम उरकले पाहिजेत. हें झाल्यावर त्या साधकानें शुचिर्भूत मनानें आसनावर बसावें. आचमन प्राणायाम करावेत आणि न्यासादी करण्यास प्रारंभ करावा.

(१) **विनियोग** :- ॐ अस्य आदित्यहृदयस्तोत्रस्यागस्त्यऋषिः

अनुष्टुप् छंदः। आदित्यहृदयभूतो भगवान् ब्रह्मा देवता

निरस्ताशेषविघ्नतया

ब्रह्मविद्यासिद्धौ सर्वत्र जयसिद्धौ च विनियोगः ॥

या स्तोत्राचें नाव आदित्यहृदय असे असून त्याचा उद्गाता अगस्ती ऋषी आहे. या स्तोत्रात समाविष्ट असणारे सर्व श्लोक अनुष्टुप् नांवाच्या छंदात असून सूर्यदेवतेच्या हृदयांत असणारा ब्रह्मदेव ही या स्तोत्राची प्रमुख देवता आहे. या स्तोत्राचा उपयोग ब्रह्मविद्येची सिद्धी होण्यासाठी आणि जय प्राप्त होण्यासाठी करावा.

(२) **अंगन्यास** —

खाली लिहिल्याप्रमाणें वन्दन करून त्या त्या शरीराच्या भागाला उजव्या हातानें स्पर्श करावा.

ॐ अगस्त्यऋषये नमः शिरसि । मस्तकावर उपडा हात ठेवावा.

ॐ अनुष्टुपछन्दसे नमः मुखे । मुखाला स्पर्श करावा

ॐ आदित्यहृदयभूतब्रह्मदेवतायै नमः हृदि । हृदयाला स्पर्श करावा

ॐ बीजाय नमः गुह्ये । गुह्यस्थानीं स्पर्शावें.

ॐ रश्मिमते शक्तये नमः पादयोः । दोन्हीं हातांनी दोन्ही पायाच्या तळव्यांना स्पर्श करावा.

ॐ ॐ तत्सवितुरित्यादिगायत्रीकीलकाय नमः नाभौ । बेंबीला उजव्या अंगठ्यानें स्पर्श करावा.

( ३ ) **करन्यास—**

दोन्ही हातांच्या मनगटाच्या मागील बाजू गुडघ्यावर टेकून दोन्ही करतलांचे दर्शन होईल याप्रमाणें हात ठेवावेत. आणि बोटामध्ये देवतांची प्रस्थापना करावी. प्रत्येक बोटाला अंगठ्याचा स्पर्श करावा.

ॐ रश्मिमते अंगुष्ठाभ्यां नमः । अंगठ्याला तर्जनीचा स्पर्श करावा.

ॐ समुद्यते तर्जनीभ्यां नमः । तर्जनीला अंगठ्याचा स्पर्श करावा

ॐ देवासुरनमस्कृताय मध्यमाभ्यां नमः । मधल्या बोटाला अंगठ्याने स्पर्श करावा.

ॐ विवस्वते अनामिकाभ्यां नमः । करंगळी जवळच्या बोटाला अंगठ्याने स्पर्श करावा.

ॐ भास्कराय कनिष्ठिकाभ्यां नमः । करंगळीला अंगठ्याचा स्पर्श करावा.

ॐ भुवनेश्वराय करतलकरपृष्ठाभ्यां नमः । तळहातासहित सर्व हाताला स्पर्शावे.

( ४ ) **हृदयादि न्यास—**

मंत्र म्हणून त्या त्या अवयवाला स्पर्श करावा.

ॐ रश्मिमते हृदयाय नमः । उजव्या हातानें हृदयाला स्पर्श करावा

ॐ समुद्यते शिरासि नमः । ताळूला स्पर्श करावा.

ॐ देवासुरनमस्कृताय शिखायै वषट् । शेंडीला स्पर्श करावा.

ॐ विवस्वते कवचाय हुम् । दोन्ही हातानी हवा मुखाकडे घेण्याची क्रिया करावी.

ॐ भास्कराय नेत्रत्रयाय वौषट् ।

उजव्या हाताच्या तर्जनीचा उजव्या डोळ्याला, मधल्या बोटाचा भ्रूमध्याच्या वर आणि अनामिकेचा डाव्या डोळ्याला एकदम स्पर्श करावा.

ॐ भुवनेश्वराय अस्त्राय फट् ।

प्रदक्षिणेप्रमाणें उजव्या हातानें आपल्या मस्तकाभोंवतीं टिचक्या वाजवून डाव्या तळहातावर उजव्या तळहाताची तर्जनी व मधलें बोट आपटून आवाज करावा.

( ५ ) क्षितिजावर उगवत असलेल्या लालसर सूर्यबिंबाचें ध्यान करून खालील मंत्र म्हणावा.

**ॐ भूर्भुवः स्वः तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि**
**धियो यो नः प्रचोदयात्** ॥

या नंतर आदित्यहृदय स्तोत्राचा पाठ करावा.

( ६ ) **स्तोत्र**–हें स्तोत्र एकूण तेवीस श्लोकांचें आहे. परंतु त्यांत फलश्रुतीच म्हणून प्रारंभी दोन श्लोक आहेत. या श्लोकांचा पाठ करतांना फलश्रुतीचा श्लोकभाग सोडून करावा. पाठ एकच करावयाचा असेल तर प्रारंभापासून सर्व श्लोक म्हणावेत. परंतु एकापेक्षा अधिक पाठ ज्यावेळीं करावयाचे असतात तेव्हां अखेरच्या पाठाच्या वेळीं संपूर्ण श्लोकांचा पाठ करावा.

या श्लोकांत सूर्य देवतेची स्तुती आणि प्रार्थना आहे. त्या सूर्याचा प्रभाव कसा दिव्य आहे याची ओळख करून देतांना स्तोत्राच्या प्रत्येक श्लोकात विशिष्ठ शब्दांचा विशेषण अगर नामाभिधान म्हणून उपयोग केलेला आहे. त्या प्रत्येक शब्दांत फार मोठा अर्थ भरलेला असून त्याचा विचार प्रत्येक साधकानें स्तोत्र म्हणताना करावा. त्यायोगें साधकाचें चित्त त्वरेनें एकाग्र हाण्यास चांगलीच मदत होते. एकदां चित्त अर्थावर एकाग्र झालें की त्या शब्दातून प्रतीत होणारा भावार्थ सहजपणे मनापर्यंत जाऊन पोहोचतो. या सर्व स्तोत्राचा हा विशेष आहे की ज्यावेळीं स्तोत्राचा भावार्थ समजू लागेल तेव्हां त्यापासून प्राप्त होणाऱ्या परिणामाची अनुभव म्हणून नोंद करतांना साधकाला आनंद वाटतो. संपूर्ण स्तोत्र हें गेय असून, गातांना स्तोत्रातील शब्दांची अकारण ओढाताण केली नाहीं तर गायकाला हे स्तोत्र खचितपणें विसावा देणारे ठरतें. परंतु शब्दांची अकारण ओढाताण करून गाण्याचा प्रयत्न केल्यास मात्र या स्तोत्राचा अपेक्षित परिणाम तर गोचर होत नाहींच उलट त्यामुळें विकृतीला मात्र आव्हान केल्यासारखे होतें. संपूर्ण स्तोत्र संस्कृत असल्याने या श्लोकांच्या उच्चाराविषयी विशेष काळजी घ्यावी लागते. तितकी काळजी ज्याला घेता येणार नाहीं त्यानें काहींतरी प्रयत्न करून तें स्तोत्र पठणाचा अकारण प्रयत्न करूंच नये. त्यापेक्षा चांगल्या शिक्षित साधकाकडून या स्तोत्राची संथा घेणे सर्वांत श्रेयस्कर होय. अर्थात अलीकडे मात्र असें दिसून येते कीं अशी संथा घेणें म्हणजे कमीपणाचें आहे असें मानण्यांत येवू लागले आहे परंतु ते मात्र पुढे घातक ठरणारे आहे.

या स्तोत्राची फलश्रुती सांगतांना वाल्मिकींनीं खालील श्लोक उधृत केलेले आहेत.

स्तोत्राच्या प्रारंभीं पुढील दोन श्लोक आहेत.

आदित्यहृदयं पुण्यं सर्वशत्रुविनाशनम् ।
जयावहं जपं नित्यमक्षयं परमं शिवम् ॥
सर्वमङ्गलमाङ्गल्यं सर्वपापप्रणाशनम् ।
चिन्ताशोकप्रशमनमायुर्वर्धनमुत्तमम् ॥

हें स्तोत्र पुण्यद असून सर्व शत्रूंचा विनाश करणारें आहे. या स्तोत्राच्या जपाने जय, कधीही कमी न होणारे अत्यंत श्रेष्ठ असे कल्याण साधते. सर्व मंगल वाटणारे, सर्व पापांचा पूर्णपणें नाश करणारे, काळजी आणि शोक यांना दूर करून आयुष्य वाढाविणारे असें हें उत्तम स्तोत्र आहे. काही साधकांचा तर असा अनुभव आहे कीं वर श्लोकांत समाविष्ट असलेल्या 'कोणत्याहि गोष्टीची इच्छा करून या स्तोत्राचा पाठ केल्यास अल्पावधीत त्याचा अगदीं उघड असा प्रत्यय येतो. कामनिक अगर अकामनिक वृत्तीने कसाही या स्तोत्राचा पाठ करावा. अकामनिक पाठ अलौकिक आणि कामनिक पाठाचें फळ लौकिक स्वरुपाचे आहे. ज्यावेळी कोणत्यातरी इच्छेच्या परिपूर्तीसाठी या स्तोत्राचा पाठ करावयाचा असेल तेव्हां हा पाठ करण्यापूर्वी त्याप्रमाणें संकल्पांत उच्चार करावा. रोजचा संकल्प एका कागदावर लिहावा. रोज पाठाच्या प्रारंभी तोच वाचावा म्हणजे त्यांत फरक होणार नाहीं. ज्यावेळीं हा पाठ कामनिक नसेल तेव्हां करावयाचा संकल्प केवळ ईश्वरप्रीतीसाठी अथवा प्राप्तीसाठी मी या स्तोत्राचा पाठ करतो असा करावा. पाठ वाचून झाल्यावर ईश्वराची प्रार्थना करावी. पांढरी पुष्पे देवाला समर्पण करावी म्हणजे त्या दिवशीचे पाठाचें कार्य संपते.

आदित्यहृदय या स्तोत्राची खरी सुरवात तिसऱ्या श्लोकापासून होते. या श्लोकांतील प्रत्येक शब्दाचा अर्थ ध्यानात येण्यासाठी त्याचा खुलासा खाली केला आहे.

१ रश्मिमन्तम् – रश्मि म्हणजे किरण. सूर्य ही प्रकाशाची देवता आहे. प्रकाश किरणरूपाने एका ठिकाणाहून दुसरीकडे जातो. अशा असंख्य किरणांचा जो स्वामी आहे.

२ समुद्यन्तम् – उदय ही ज्याची महत्त्वाची स्थिती आहे असा.

३ देवासुरनमस्कृतम् – देव आणि असुर या दोघांनी ज्याचा आदर करावा असा आहे.

४ विवस्वन्तम् – विवस्वान या नावाचा एक प्रकाशाचा प्रकार आहे. या प्रकारात निर्माण होणारें तेज कोणत्याही वस्तूच्या रक्षणाला उपयोगी पडते.

५ भास्कर – भा = तेज, त्या तेजाचा विस्तार करणारा.

६ भुवनेश्वर – भुवन म्हणजे घर. घरातील किंवा संसारांतील सर्व व्यवहार सूर्याच्या किंवा त्याच्या प्रातिनिधिक तेजामुळें चालतात. सूर्य असेपर्यंत जसे सर्व संसारी व्यवहार होतात त्याप्रमाणें सूर्य अस्तास गेल्यावर दिव्याच्या प्रकाशात होतात. दिवा हा सूर्याचा प्रतिनिधी आहे. सूर्य अस्तास जातांना आपले तेज तो दिव्यामध्ये ठेवतो. कविकुलगुरू कालिदासाने आपल्या रघुवंशाच्या चवथ्या सर्गाच्या प्रारंभीं या कृतीचा उल्लेख केला आहे.

दिनान्ते निहितं तेजः सवित्रेव हुताशनः !

७ सर्वदेवात्मक – देव म्हणजे प्रकाशाचा ठेवा. प्रकाश ही सूर्याची संपत्ती आहे. अशा सर्व देवांच्या अंतःकरणांत वास्तव्य करणारा.

८ तेजस्वी – तेजाची राशी.

९ देवासुरगणाँल्लोकान् गभस्तिभिः पाति – देव आणि असुर लोकांचे आपल्या किरणांनी पालन करणारा.

१० ब्रह्मा – जगाची उत्पत्ती करणारी देवता. कोणत्याही वस्तूच्या उत्पत्तीला सूर्याची आवश्यकता आहे. म्हणून ब्रह्मा हे सूर्याचें नांव पडलें.

११ विष्णु – निर्माण केलेल्या वस्तूंचा योग्य विनियोग करणारा. प्रत्येक वस्तूमधील विषता नाहीशी केल्यावर राहिलेली वस्तू सर्व कल्याणमय मार्गाने उपयोगांत कशी आणावी याचें मार्गदर्शन करणारा.

१२ शिव – प्रत्येक वस्तूतील चांगलें तेवढेंच मिळवून देणारा.

१३ स्कन्द – सर्व कल्याणाची जबाबदारी स्वतः घेणारा.

१४ प्रजापती – सर्व वस्तूंचा पूर्व–संकल्पित आराखाड्याप्रमाणें उत्पत्ती करण्याची शक्ती असणारा.

१५ महेन्द्र – सर्व वस्तूंचा इंद्रियजन्य सुखोपभोग घेणारा किंवा देणारा.

१६ धनद – संपत्ती प्राप्त करून देणारा.

१७ काल – वेळ मोजता येईल असा मानदण्ड.

१८ यम – निर्मित वस्तूंचा नियंत्रक.

१९ सोम – प्रत्येक अन्नपदार्थांत असणारा रस निर्माण करण्याचें कार्य सूर्य करतो. परंतु त्याच सूर्याचें जे किरण शीतल आहेत ते त्या रसात अमृतत्वाची उत्पत्ती करतात. ज्या किरणसमूहाच्या योगें ही क्रिया घडते तिला सोम म्हणतात.

२० अपां पति – पाण्याचा स्वामी.

२१ पितर – पुरुषाच्या शरीरात जननजन्तु आणि स्त्रियांच्या उदरात गर्भभू निर्माण करणारा.

२२ वसव – वसु म्हणजे सामर्थ्यांचे प्रतीक असे आठ वसु आहेत.

**धरो ध्रुवश्च सोमश्च अहश्चैवानिलोऽनलः ।**
**प्रत्यूषश्च प्रभासश्च वसवोऽष्टाविति स्मृताः ॥**

२३ साध्या – पूर्णत्वाला पोहोचविणारा.

२४ अश्विनौ – निरोगिता प्राप्त करून देणारा.

२५ मरुत – अत्यंत गतिमान परंतु गती गोचर न होणारा.

२६ मनु – फार मोठा काळ पाहाणारा.

२७ वायु – एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं आपलें तेज वाहविणारा.

२८ वन्हि – पचनक्रिया करणाऱ्या सूर्यकिरणांचा समूह.

२९ प्रजा – ज्याला जन्म आहे अशी वस्तु.

३० प्राण – वस्तूच्या हालचाली करण्याचें काम सूर्याचे जे किरण करतात त्यांना प्राण म्हणतात.

३१ ऋतुकर्ता – कोणत्या कालखण्डांत कोणती कृती कोणी कशी करावी हें ठरविणारा.

३२ प्रभाकर – तेज हेच ज्याचे हात आहेत असा.

३३ आदित्य – वर्षाच्या १२ महिन्यांत सूर्य ज्या प्रकारच्या किरणांनीं प्रकाश देतो त्यांना आदित्य असें नांव आहे. असें आदित्य बारा असून प्रत्येक मराठी महिना आणि आदित्य यांची सांगड घालण्यात आली आहे.

**धाता मित्रोऽर्यमा रुद्रो वरुणः सूर्य एव च ।**
**भगो विवस्वान् पूषा च सविता दशमः स्मृतः ।**
**एकादश तथा त्वष्टा विष्णुर्द्वादश उच्यते ॥**

धाता, मित्र, अर्यमा, रुद्र, वरुण, सूर्य, भग, विवस्वान्, पूषा, सविता त्वष्टा आणि विष्णु.

३४ सविता – उत्पत्तीला कारणीभूत होणारे सूर्य किरण.

३५ सूर्य – नीतियुक्त कर्म करण्यास प्रवृत्त करणारा.

३६ खग – कोणत्याही आधाराशिवाय गमन करणारा.

३७ पूषा – चंद्राची तृतीय कला निर्माण होण्यासाठीं सूर्याचे जे जे किरण उपयोगात येतात त्यांना पूषा असें म्हणतात.

३८ गभस्तिमान् – स्वतःच्या तेजरूपी किरणांनीं विश्वाचें पालन करण्याचें सामर्थ्य असलेला.

३९ सुवर्णसदृश – तप्तसुवर्णाप्रमाणें ज्याची कान्ती आहे असा.

४० भानु – तेजानें विश्वाला अलंकृत करणारा.

४१ हिरण्यरेता – सर्व सत्कर्मांचें बीज.

४२ दिवाकर – रात्र आणि दिवस असा भेद ज्याच्यामुळें गोचर होतो असा.

४३ हरिदश्व – ज्याच्या रथाचे घोडे हिरव्या रंगाचे आहेत असा.

४४ सहस्रार्चि – सहस्र ज्वालाप्रमाणें ज्याचें तेज आहे असा.

४५ सप्तसप्ति – सात घोडे ज्याच्या रथाला आहेत असा.

४६ मरीचिमान् – तेजोवान.

४७ तिमिरोन्मथन – अंधकाराचा नाश करणारा.

४८ शंभु – कल्याणकारक स्थितीचें उगमस्थान.

४९ त्वष्टा – आयुधांची तेजोमयता.

५० मार्तण्डक – ब्रह्माण्डाला जीवन प्रदान करणारा.

५१ अंशुमान् – किरणानीं समृद्ध असलेला.

५२ हिरण्यगर्भ – ज्याच्या अंतरांत तेजोमयता आहे असा.

५३ शिशिर – शान्तिप्रदान करणारा.

५४ तपन – दुसऱ्या वस्तूमध्यें उष्णता निर्माण करणारा.

५५ अहस्कर – ज्याच्यामुळे दिवस असल्याची अनुभूती येते असा.

५६ रवि – सहस्रगुणांनीं रसाचा गुण वाढविणारा.

५७ अग्निगर्भ – उदरात अग्नी असणारा.

५८ अदितेः पुत्र – अदितीचा पुत्र.

५९ शङ्ख–धवलता प्राप्त करून देणारा. नादमय स्थिती असणारा.

६० शिशिरनाशन – शीतता नाहीशी करणारा.

६१ व्योमनाथ – व्योम म्हणजे आकाश सर्वत्र पोकळी ठेवून प्रत्येक ठिकाणीं नाद निर्माण करण्याचें कार्य करणारा.

६२ तमोभेदी – अंधःकाराचा भेद करणारा. अंधारातून मार्ग दर्शविणारा.

६३ ऋग्यजुस्सामपारग – ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद यांचे संपूर्ण ज्ञान असलेला.

६४ घनवृष्टी – मेघांना वृष्टी करावयास लावणारा. सूर्याच्या उष्णतेमुळें पाण्याची वाफ होते. त्यामुळें ढग बनतात. ते जड झाले कीं खालीं धारारूपाने कोसळतात.

६५ अपां मित्र – पाण्याचा मित्र.

६६ विन्ध्यवीथिप्लवंगम – आकाशातून तीव्र वेगानें जाणारा.

६७ आतपी – तप्तता निर्माण करणारा.

६८ मण्डली – ज्याची गती वर्तुळाकार आहे असा.

६९ मृत्यु – प्राणिमात्रातील आपले अस्तित्व काढून घेणारा.

७० पिंगला – पिंगटवर्ण असलेला.

७१ सर्वतापन – सर्वांना उष्णता देणारा म्हणजेच जीवन प्राप्त करून देणारा.

७२ कवि – विद्यावान.

७३ विश्व – सर्व व्यापक.

७४ महातेजा – महान तेज हा ज्याचा स्थायीभाव आहे.

७५ रक्त – ज्याचा रंग लाल आहे असा.

७६ सर्वभवोद्भव – सर्व वस्तूंचा उत्पत्तीकर्ता.

७७ नक्षत्रग्रहताराणामधिप – सत्तावीस नक्षत्रे, नऊ ग्रह ( चंद्र मंगळ, बुध गुरू, शुक्र, शनि, राहू, केतू, पृथ्वी आणि अन्य तारका यांचा नियंता.

७८ विश्वभावन–विश्वाला उत्पन्न करून त्याची व्यवस्था लावणारा.

७९ तेजसामपि तेजस्वी – सर्व तेजोवान वस्तुमध्यें अत्यंत तेजस्वी असणारा.

८० द्वादशात्मन् – सूर्याची प्रत्येक महिन्याची रूपे स्वतंत्र आहेत. अशी एकूण १२ रूपे आहेत. तरीपण त्या रुपाच्या मध्यें तेज हें एकच आहे. तेज हा त्या रूपांचा आत्मा आहे.

याप्रमाणें एकूण ऐंशी नांवाचें वैभव या स्तोत्रांत वर्णन करण्यांत आलेलें आहे. मानवी देहांत ज्या ज्या विकृती असतील त्या त्या दूर करण्याचें सामर्थ्य या सर्व नामांच्या उच्चारांत आहे. विशेषतः या नावांच्या उच्चारापासून जो नाद निर्माण होतो त्या नादाच्या आघातानें ह्या विकृती दुरावतात. विशेषतः ज्या विकृतींचा स्पर्श हृदयाला होतो त्या त्या विकृती नाहीशा करण्याचे कार्य या नावांचे नाद करतात. हृदयाची होणारी अनेकविध स्पंदनें आणि सूर्याच्या या नावांच्या उच्चारामुळे निर्माण होणारी नादस्पंदनें यांचा सुन्दर मिलाफ घडतो आणि त्या योगें या हृदयाचे प्राकृतिक किंवा आध्यात्मिक विकृतभाव नाहीसे होतात. पहिल्या प्रथम प्राकृतिक दोष नाहीसे होतात आणि त्यानंतर हळू हळू आध्यात्मिक प्रगती होते. सूर्याच्या अनेक स्तोत्रांत या स्तोत्राचा विशेष हा आहे की, हृदयाला आवश्यक असणारा प्रकाश ज्या मंत्राच्यामुळे किंवा स्तोत्रामुळें मिळतो त्यांत खालील प्रमुख स्तोत्रें, सूक्तें अगर मंत्र आहेत,

(१) ॐ जप

(२) गायत्री मंत्र

(३) सौरसूक्त

(४) सूर्यकवच

(५) आदित्य हृदय

यांत आदित्य हृदय स्तोत्राचा क्रमांक पांचवा आहे. या स्तोत्रापासून जे अनेक फायदे मिळतात त्यांत अगदी त्वरेने गोचर होणारा फायदा म्हणजे निर्भयता प्राप्त होते. साधकाला अनेक बाबतींत ज्या स्थळीं भीती वाटते ती साधकाची भीती नष्ट होऊन साधकाचा मार्ग खुला होतो आणि त्याच्या अडचणी नाहीशा झाल्यामुळें अध्यात्माकडे त्याची प्रगती फार चांगल्या प्रकारें होते.

या स्तोत्राच्या १३ व्या श्लोकापर्यंत सूर्याची स्तुती असून त्यापुढील सहा श्लोकात सूर्यवंदन आहे. हें सूर्यवन्दन करतांना सूर्याच्या संपूर्ण दिवसाच्या, ऋतूंच्या आणि वर्षाच्या बारा महिन्यांच्या अवस्थांचें वर्णन करून त्याला वन्दन करण्याचें कार्य कसें करावें याचा खुलासा केलेला आहे. या सर्वच श्लोकांची रचना मोठी मार्मिक असून अर्थगर्भ आहे. हे नमस्कार खालीलप्रमाणें आहेत.

१. **नमः पूर्वाय गिरये**—ज्या पूर्व दिशेला सूर्याचा उदय होतो त्या ठिकाणीं असणारा जो उंच भाग त्यावर आरूढ झालेल्या सूर्याला नमस्कार असो. सूर्योदयाच्या वेळीं नमस्कार असो असा अभिप्राय.

२. **पश्चिमायाद्रये नमः**—पश्चिमेला सूर्य मावळतो. त्या ठिकाणच्या पर्वतश्रेष्ठाला वन्दन असो. म्हणजे सूर्याला अस्तास जातांना नमस्कार असो.

३. **ज्योतिर्गणानां पतये नमः**—ज्याच्यामुळें स्वतःचें अस्तित्व जाणवते, वसतिस्थान निश्चित करतां येतें अशा ग्रहगणांच्या स्वामीला वन्दन असो. सूर्याचें अस्तित्व रात्रींही असते. असें म्हणून सूर्याचे प्रतिनिधी जो तारकागण त्यांना वन्दन केलें आहे.

४. **दिनाधिपतये नमः**—दिवसाच्या कालांत वावरणाऱ्या सूर्याला नमस्कार असो.

५. **जयाय नमः**—सूर्याच्या उपासनेनें सर्व विषयांत आणि व्यापारांत जयप्राप्ती होते. त्यांतील जयाचा भाग हा सूर्याचा आहे. जयाचा किंवा

यशाचा रंग पांढरा असल्याने धवलयश असा शब्द रूढ झाला परंतु त्या सर्वांचा गाभा सूर्य आहे. त्याला केलेल्या वंदनातून यशाचा वाटा प्राप्त होतो.

६. **जयभद्राय नमः**–दुसऱ्याचें कल्याण व्हावें म्हणून झटत असतां सूर्यवंदनाने जो जय प्राप्त होतो त्याला जयभद्र म्हणतात.

७. **हर्यश्वाय नमः**–ज्याच्या रथाचे घोडे हिरव्या रंगाचे आहेत अशा सूर्याला माझा नमस्कार असो. पृथ्वीवर सर्वत्र समृद्धता नांदणें म्हणजे पृथ्वी हिरव्या रंगाने बहरणें हरित होणें ही गती आहें. ही हरितमयता सूर्यामुळें प्राप्त होते. म्हणून सूर्याच्या गतीमानतेच्या दिशेचा रंग हिरवा आहे असे हरित् अश्व या शब्दाने सूचित केलें आहे. अशी हारितता निर्माण करणाऱ्या सूर्याला नमस्कार असो.

८. **सहस्रांशो नमः**–हजारो किरणानी विश्वाला अंतःर्बाह्य जागृती आणणाऱ्या सूर्याला नमस्कार असो.

९. **आदित्याय नमः**–अदिती पुत्राला नमस्कार असो.

१०. **उग्राय नमः**–फार प्रचंड काम सहजपणें करणाऱ्या सूर्याला नमस्कार असो.

११. **वीराय नमः**–शूर आणि शक्तिसंपन्न अशा सूर्याला नमस्कार असो.

१२. **सारंगाय नमः**–शीघ्रगामी देवता म्हणून सूर्याला नमस्कार असो. सूर्य उपासनेचे फल अन्य उपासनेपेक्षां लवकर प्राप्त होते.

१३. **पद्मप्रबोधाय नमः**–कमलांना फुलविणाऱ्या सूर्याला वदंन असो कमलप्रबोधन ही निसर्गसमृद्धता आहे.

१४. **प्रचंडाय नमः**–महान प्रतापी असा हा सूर्यदेव आहे. इतकेच नव्हे तर त्याच्या उपासनेचें फळ माणसाला प्रचंड प्रताप करण्यास उद्युक्त करतें.

१५. **ब्रह्मेशानाच्युतेशाय नमः**–ब्रह्मा, विष्णु आणि शिव या तिघांचे गुणवैभव ज्यामध्यें आहे अशा सूर्याला नमस्कार असो.

१६. **सुराय नमः**–प्रकाशमान देव म्हणून त्याला नमस्कार असो. प्रकाश आणि नाद याचा मिलाफ सूर्यामध्ये आहे.

१७. **आदित्यवर्चसे नमः**–अदितीच्या सर्व पुत्रांत अत्यंत श्रेष्ठ अशा सूर्यास वन्दन असो.

१८. **भास्वते नमः**–दुसऱ्याला प्रकाशित करणाऱ्या अशा देवाला प्रणाम असो.

१९. **सर्वभक्षाय नमः**–सूर्याच्या उष्णतेनें सर्व वस्तू कांहीं कालानें जळून नाहीशा होतात.

२०. **रौद्राय नमः**–ज्याच्या रूपाकडे पाहातां येणार नाहीं असें अत्यंत उग्र रूप धारण करणाऱ्या सूर्याला नमस्कार असो.

२१. **वपुषे नमः**–निर्व्यंग शरीर करणाऱ्या आणि उपासकाला त्याच निर्व्यंगत्वाचे दान देणाऱ्या सूर्याला नमस्कार असो.

२२. **तमोघ्नाय नमः**–अंधःकाराचा नाश करणारा किंवा पाप-क्षालन करणारा जो सूर्य त्याला वन्दन असो.

२३. **हिमघ्नाय नमः**-शीततेचा नाश करणाऱ्या सूर्याला प्रणाम असो.

२४. **शत्रुघ्नाय नमः** शत्रूचा नाश करणाऱ्या सूर्याला नमस्कार असो.

२५. **अमितात्मने नमः**–न मोजता येणारे ज्याचे अंतरवैभव आहे अशा सूर्याला वन्दन असो.

२६. **कृतघ्नघ्नाय देवाय नमः**–केलेल्या उपकार कृत्याची आठवण न ठेवणाऱ्यांची कृतघ्नवृत्ती नाश करणाऱ्या सूर्याला वन्दन असो.

२७. **ज्योतिषां पतये नमः**–कालयंत्रण करण्याचें सामर्थ्य ज्याच्या मध्ये आहे त्याला वन्दन असो. सूर्योपासनेनें जीवन संयमित आणि नियमित बनते.

२८. **तप्तचामीकराभाय नमः**–तप्तसुवर्णाप्रमाणें ज्याची प्रभा आहे. तप्तसुवर्णाप्रमाणें कांती असणे हे आरोग्याचे लक्षण आहे. असें आरोग्य प्रदान करणाऱ्या सूर्याला वन्दन असो.

२९. **हरये नमः**–वासनेचा नाश करणारा किंवा संसारांतील लक्ष हरण करून प्रभुचरणीं लावण्याचें सामर्थ्य देणाऱ्या सूर्यास नमस्कार असो.

३०. **विश्वकर्मणे नमः**–संसारांतील समृद्धी प्राप्त करून देणारा असा जो सूर्य त्याला वन्दन असो.

३१. **तमोऽभिनिघ्नाय नमः**–उपासनेंत येणारे अडथळे दूर करणऱ्या सूर्याला वन्दन असो.

३२. **रुचये नमः**–प्रत्येक पदार्थातील रसामध्ये आरोग्याला उपयुक्त अशी रुची निर्माण करणाऱ्या सूर्याला नमस्कार असो.

३३. **लोकसाक्षिणे नमः**–सर्व विश्व एकदम पाहणाऱ्या सूर्यास नमस्कार असो.

याप्रमाणें सूर्यास वन्दन कां करावें, असे त्याचें कोणते सामर्थ्य आहे कीं त्यामुळे त्याची उपासना मर्यादापुरुषोत्तमानें देखील करावी या सगळ्या शंकाचें निरसन करण्याचा आणि सूर्याचा जगाशीं असलेला संबंध यांचा खुलासा यापुढील श्लोकांत आहे.

**नाशयत्येष वै भूतं तमेव सृजति प्रभुः ।**
**पायत्येष तपत्येष वर्षत्येष गभस्तिभिः ॥**

हा सूर्य केवळ आपल्या किरणांनी या प्राणिमात्रांची उत्पत्ती करतो, पालन, पोषण करतो. आपल्या किरणांच्या योगे प्राण्यांच्या जीविताला आवश्यक असणारा शरीरांतील अग्नी निर्माण करतो. ज्या पृथ्वीवर हें भूतमात्र वावरतात ती सस्यपूर्णा असण्यासाठीं पाऊस पाडण्याचे कार्य देखील तोच करतो.

**एष सुप्तेषु जागर्ति भूतेषु परिनिष्ठितः ।**

**एष चैवाग्निहोत्रं च फलं चैवाग्निहोत्रिणाम् ॥**

सर्व भूतांच्या अंतर्यामी याची वस्ती असल्यानें आंत जागृती ठेवण्याचें कार्य हा सूर्य करतो. हाच स्वतः अग्नियजन आणि अग्निहोत्राचें आचरण करणाऱ्यांना मिळणारें फळ देणारा आहे.

**देवाश्च क्रतवश्चैव क्रतूनां फलमेव च ।**

**यानि कृत्यानि लोकेषु सर्वेषु परमप्रभुः ॥**

सूर्य हा स्वतः देव असून यज्ञही तोच आहे. इतकेंच काय यज्ञातून जी फलप्राप्ती होते ती देखील हा सूर्यच आहे. इतकेंच काय परंतु सर्व प्राणीमात्रांच्या ज्या क्रिया आहे त्यांचे फल सूर्यच आहे.

**एनमापत्सु कृच्छ्रेषु कान्तारेषु भयेषु च ।**

**कीर्तयन् पुरुषः कश्चिन्नावसीदति राघव ॥**

एखाद्या संकटात, कष्टांत, जंगलात आणि भीति निर्माण झाली असतां जो पुरुष या सूर्यनामाचें गान करतो त्याला कधीही दुःख भोगावें लागत नाही.

**पूजयस्वैनमेकाग्रो देवदेवं जगत्पतिम् ।**

**एतत् त्रिगुणितं जप्त्वा युद्धेषु विजयिष्यति ॥**

हे रामचंद्रा, तूं एकाग्र मनानें या सूर्याचीं पूजा करून या स्तोत्राचा तीन वेळा पाठ कर म्हणजे तुला युद्धांत विजयश्री प्राप्त होईल.

या स्तोत्राचा पाठ रोज तीन वेळा करावयाचा आहे. जोपर्यंत सूर्य आकाशांत आहे तोपर्यंतच या स्तोत्राचा पाठ करावा. सर्वांत उत्तम काल म्हणजे उगवत्या सूर्याची पूजा करून त्या सूर्योचे कोमल किरण अंगावर घेवून पाठ करणे. सूर्याची पूजा करतांना पाणी, पांढरे गंध, पुष्प आणि

अक्षता एकत्र घेवून गोचर होणाऱ्या प्रभावी सूर्याला वाहाणें. त्याच्या दिशेनें या सर्व वस्तू त्याचे ध्यान करून टाकल्या म्हणजे त्याला त्या पोहोचतात. कटिसीमेपर्यंत पाण्यात उभे राहून पाठ करणे सर्वात चांगले. परंतु तसें जमले नाही तर मात्र तो उगवत्या सूर्याचे ध्यान करून कोठेही शुचिर्भूतपणे करावा.

या पाठाच्या योगें व्यावहारिक अडचणी आणि शारीरिक दुःख ही केवळ तेहतीस दिवसात नाहीशी होतात. विशेषेकरून हृदयाच्या विकारावर याचा परिणाम चांगला होतो असा अनुभव आहे. त्याचप्रमाणे संसारात होणारे अनेकविध कलह या पाठानें नाहीसें होतात. ज्याप्रमाणें व्यावहारिक किंवा लौकिक फायदे या स्तोत्राच्या पालनानें प्राप्त होतात त्याप्रमाणें अलौकिक फायदे देखील मिळतात. कोणाची कोणतीहि उपासना असो, त्या उपासनेत चांगली प्रगती व्हावी म्हणून या स्तोत्राचा पाठ केला जातो. अर्थात त्यामुळे लांब असलेले यश जवळ जवळ येते आणि मनुष्य इहपरत्र सुखावतो.

# आदित्यहृदय

आदित्यहृदयं पुण्यं सर्वशत्रुविनाशनम् ।
जयावहं जपं नित्यमक्षयं परमं शिवम् ॥ १ ॥

सर्वमङ्गलमाङ्गल्यं सर्वपापप्रणाशनम् ।
चिन्ताशोकप्रशमनमायुर्वर्धनमुत्तमम् ॥ २ ॥

रश्मिमन्तं समुद्यन्तं देवासुरनमस्कृतम् ।
पूजयस्व विवस्वन्तं भास्करं भुवनेश्वरम् ॥ ३ ॥

सर्वदेवात्मको ह्येषः तेजस्वी रश्मिभावनः ।
एष देवासुरगणाँल्लोकान् पाति गभस्तिभिः ॥ ४ ॥

एष ब्रह्मा च विष्णुश्च शिवः स्कन्दः प्रजापतिः ।
महेन्द्रो धनदः कालो यमः सोमो ह्यपां पतिः ॥ ५ ॥

पितरो वसवः साध्या अश्विनौ मरुतो मनुः ।
वायुर्वह्निः प्रजाः प्राणः ऋतुकर्ता प्रभाकरः ॥ ६ ॥

आदित्यः सविता सूर्यः खगः पूषा गभस्तिमान् ।
सुवर्णसदृशो भानुर्हिरण्यरेता दिवाकरः ॥ ७ ॥

हरिदश्वः सहस्रार्चिः सप्तसप्तिर्मरीचिमान् ।
तिमिरोन्मथनः शम्भुस्त्वष्टा मार्तण्डकोऽशुमान् ॥ ८ ॥

हिरण्यगर्भः शिशिरस्तपनोऽहस्करो रविः ।
अग्निगर्भोऽदितेः पुत्रः शङ्खः शिशिरनाशनः ॥ ९ ॥

व्योमनाथस्तमोभेदी ऋग्यजुः सामपारगः ।
धनवृष्टिरपां मित्रो विन्ध्यवीथीप्लवंगमः ॥ १० ॥

आतपी मण्डली मृत्युः पिङ्गलः सर्वतापनः ।
कविर्विश्वो महातेजा रक्तः सर्वभवोद्भवः ॥ ११ ॥

नक्षत्रग्रहताराणामधिपो विश्वभावनः ।
तेजसामपि तेजस्वी द्वादशात्मन् नमोऽस्तु ते ॥ १२ ॥

नमः पूर्वाय गिरये पश्चिमायाद्रये नमः ।
ज्योतिर्गणानां पतये दिनाधिपतये नमः ॥ १३ ॥

जयाय जयभद्राय हर्यश्वाय नमो नमः ।
नमो नमः सहस्रांशो आदित्याय नमो नमः ॥ १४ ॥
नम उग्राय धीराय सारंगाय नमो नमः ।
नमः पद्मप्रबोधाय प्रचण्डाय नमोऽस्तु ते ॥ १५ ॥

ब्रह्मेशानाच्युतेशाय सूरायादित्यवर्चसे ।
भास्वते सर्वभक्षाय रौद्राय वपुषे नमः ॥ १६ ॥
तमोघ्नाय हिमघ्नाय शत्रुघ्नायामितात्मने ।
कृतघ्नघ्नाय देवाय ज्योतिषां पतये नमः ॥ १७ ॥

तप्तचामीकराभाय हरये विश्वकर्मणे ।
नमस्तमोऽभिनिघ्नाय रुचये लोकसाक्षिणे ॥ १८ ॥
नाशयत्येष वै भूतं तमेव सृजति प्रभुः ।
पायत्येष तपत्येष वर्षत्येष गभस्तिभिः ॥ १९ ॥
एष सुप्तेषु जागर्ति भूतेषु परिनिष्ठितः ।
एष चैवाग्निहोत्रं च फलं चैवाग्निहोत्रिणाम् ॥ २० ॥
देवाश्च क्रतवश्चैव क्रतूनां फलमेव च ।
यानि कृत्यानि लोकेषु सर्वेषु परमप्रभुः ॥ २१ ॥
एनमापत्सु कृच्छ्रेषु कान्तारेषु भयेषु च ।
कीर्तयन् पुरुषः कश्चिन्नावसीदति राघव ॥ २२ ॥
पूजयस्वैनमेकाग्रो देवदेवं जगत्पतिम् ।
एतद् त्रिगुणितं जप्त्वा युद्धेषु विजयिष्यति ॥ २३ ॥

* * *

# श्री नवग्रह स्तोत्र

ईश्वरानें निर्माण केलेल्या या अगाध विश्वांत त्यानें दिसणाऱ्या अगर न दिसणाऱ्या अशा अनेक वस्तू निर्माण केल्या. प्रत्येक वस्तू या जगाच्या पसाऱ्यात कोठे आणि कशी शोभून दिसेल याची त्याची योजना खरोखरीच अतर्क्य आहे. जो जो विचार करावा तों तों त्याची ही क्रिया अधिक अगाध असल्याचेंच प्रत्ययास येतें. प्रत्येक वस्तू जन्माला येते, काही दिवस ती या ठिकाणीं स्थिरावते आणि नाहीशी होते.

**उपजे तें नाशे । नाशिलें पुनरपि दिसें ।**
**हें घटिकामंत्र जैसें । परिभ्रमे गा ॥ २–१५९**

या ज्ञानेश्वराच्या वचनाप्रमाणें हा विश्वाचा व्यवहार अगणित कालपर्यंत असाच चालत आला असून पुढेही तो तसाच चालत राहाणार आहे. म्हणूनच या सर्व व्यवहाराला जग अशी संज्ञा देण्यात आली. जग म्हणजे काय याचा सोपा अर्थ लावायचा तर असे सांगता येईल. जग या शब्दांत ‘ज’ आणि ‘ग’ अशी दोन कृदन्तें एकत्र आणण्यांत आली

आहेत. व्याकरणांत–उपपद तत्पुरुष समासाचें दुसरें पद कृदन्त असतें. त्या कृदन्त प्रकारांतील ही दोन कृदन्तें आहेत. ह्या समासात वापरण्यात येणारी ही कृदन्ते तसें पाहिलें असता लंगडी आहेत. कारण भाषेत त्यांचा स्वतंत्रपणें उपयोग करतां येत नाही परंतु दुसऱ्या एखाद्या पदार्शी त्याचा संयोग झाल्यास त्यांतून फार मोठा अर्थ ती निर्माण करू शकतात. पण त्यांचें ‘ जग ’ या शब्दांतील स्थान मात्र त्या दृष्टीने फारच मोठे मानावे लागेल. कारण जग शब्द उच्चारताच केवढी भव्य वस्तू आपल्यापुढें साकारते ? या विश्वाच्या पसाऱ्यांत अशा अनेक जगांचा समावेश आहे. पण आपण ज्या जगात राहातो त्याच जगाचा विचार आपणास कर्तव्य आहे. जग ही देखील एक वस्तुच आहे अर्थात् त्या वस्तुचे अस्तित्व देखील जग याच शब्दांत समाविष्ट केलें आहे. जग या शब्दांत असलेली ही दोन कृदन्ते जगाची स्थिती, व्याप्ती, आणि परिणती प्रकट करतात. ‘ ज ’ या कृदन्ताचा अर्थ जन्माला येणें असा असून ‘ ग ’ या कृदन्ताचा अर्थ गमन करणें असा आहे. जन्माला येणें आणि गमन करणे किंवा नाहीसें होणें ह्या वस्तुच्या दोन तडा आहेत. या दोन तडांच्या मध्यें जे दिसतें अगर असतें त्याला जग असें म्हणतात. या अल्पकाळ असणाऱ्या स्थितीला अनेक लोक अनेक नावानी संबोधतात. जग, संसार ही या स्थितीचीच नावे आहेत. जाणत्या लोकांनी ही स्थिती क्षणभंगूर, आणि रोज बदलणारी म्हणजेच अशाश्वत असल्याचा निर्वाळा कंठारवाने दिला आहे. अशा अशाश्वत असलेल्या जगांत सर्वच वस्तु अशाश्वत आहेत यात आश्चर्य नाही.

हें अशाश्वतपण जरी खरें असले तरीपण या जगात असलेल्या वस्तुंचा एक विशेष आहे की प्रत्येक वस्तुला आपले स्वतंत्र अस्तित्व असल्यासारखे भासते. पण खरें पाहिलें तर प्रत्येक वस्तु दुसऱ्या वस्तुच्या सानिध्यामुळेंच राहूं शकते. एक वस्तु अनेक वस्तूंच्या आकर्षणामुळें स्थिर असल्याचें दिसते. कोणत्या वस्तुला कोणत्या वस्तुंचें आकर्षण आहे हा

भाग अधिक विचाराचा आहे. परंतु एका वस्तूच्या सांनिध्यांतच दुसरी वस्तू असते हें विसरून चालणार नाही. एखाद्या संकटाच्या वेळीं अनेक लोक एकमेकांच्या आश्रयानें त्या संकटाची तीव्रता सहन करू शकतात अगर कित्येक वेळीं अशा संकटांचा त्यांना विसर देखील पडतो. त्या-प्रमाणे या नाशिवंत जगांत विनाशाचें महान संकट समोर दिसते म्हणूनच प्रत्येक वस्तू एकमेका वस्तूचा आश्रय शोधून राहाते. दुसऱ्या वस्तूचें असलेलें अधिक सामर्थ्य दुर्बल वस्तू काढून घेण्याचा प्रयत्न जरी करीत नसली तरी तिचें दीर्घ सांनिध्य मिळविण्याचा प्रयत्न मात्र जरूर करते. याच तत्त्वानें हें सबंध जग आपणास स्थिर असल्याप्रमाणें भासते. वस्तुतः तें स्थिर नाही. अशा या जगाच्या एकंदर पसाऱ्यांत मनुष्य ही देखील एक महान वस्तू आहे. इतर वस्तुपेक्षा ही वस्तु निराळी आहे. इतर वस्तूंना आपले आयुष्य घडविण्याचा अधिकार नाही. परंतु मानवाला मात्र तो अधिकार प्राप्त झाला. तो देखील अनेक वस्तुंचा संग्रह करतो आणि त्यांच्या सांनिध्यात आपलें आयुष्य सुखानें घालविण्याचा प्रयत्न करतो. आपण सुखी असल्याचे भासवितो पण तो सुखी मात्र असत नाही. अनेक दुःखांचे ओझे तो आपल्याबरोबर वागवीत असतो. या पसाऱ्यात राहून कधीही नाहीसें न होणारे सुख मिळाले पाहिजें ही त्याची सार्थ भूमिका असते. त्यासाठीं मानवाला अनेक उपाय उपलब्ध करून दिले आहेत. ईशभक्ती करून ईश्वराचें सांनिध्य प्राप्त झालें तर शाश्वतता प्राप्त होईल ही गोष्ट अगदी निर्विवाद आहे. अर्थात त्यांत अनेक पर्याय सांगण्यांत आले आहेत. ईशभक्तीने मानवाचें आंतरिक सामर्थ्य वाढतें. त्यामुळें या जगातील अनेक वस्तु त्याच्याकडे आकर्षित होतात आणि त्यामुळें तो सुखी होतो.

या सुखांत देखील दोन प्रकार आहेत. एकाला अलौकिक सुख म्हणतात तर दुसऱ्याला लौकिक किंवा ऐहिक सुख असे म्हणतात. अलौकिक अगर शाश्वत सुखासाठी ईशभक्तीसारखा असामान्य उपाय

नाही. परंतु लौकिक सुखासाठी देखील अनेक उपाय सांगण्यांत आले आहेत. त्यातील एक उपाय म्हणजे नवग्रहाचे आकर्षण साधणें होय. हें आकर्षण साधण्यासाठी पूर्वींच्या वेदविदांनी अक्षरांच्या साहाय्यानी कांहीं उत्तम असे मंत्र बनविले आहेत. या मंत्राच्या जपघोषानी त्या त्या ग्रहाचें तेज मानवाला आकर्षून घेतां येतें. मात्र त्याला कांहीं विशिष्ट प्रक्रियेची जरूरी आहे. त्याशिवाय त्यांची फलद्रूपता दिसत नाहीं. अर्थात यांत हा एक महत्त्वाचा मुद्दा लक्षांत ठेवणें आवश्यक आहे कीं प्रत्येक मंत्र वेदोक्त असल्याने त्या मंत्राचा उच्चार करण्याचा अधिकार असावा लागतो. जसा तो अधिकार नसेल तर त्या लोकांनी काय करावें असाही प्रश्न उपस्थित होईल. पण पूर्वसूरींनी तो प्रश्न देखील अत्यंत समंजसपणें सोडविला आहे. त्यासाठी स्वतंत्र श्लोकबद्ध मंत्र तयार करून त्यांनी ते आपल्या हातीं दिले आहेत. वैदिक मंत्रापेक्षा या मंत्राचे पथ्य जरा कमी दर्जाचे असले तरी त्यांच्या उपासनेपासून प्राप्त होणारी फळें मात्र तीच आहेत. त्यांत कमी जास्त असा दर्जा नाही. अशा मंत्रांची उपासना करण्यापूर्वी त्या प्रत्येक ग्रहाचे वैभव समजावून घेणे आवश्यक ठरेल.

एकूण ग्रह नऊ आहेत. त्यांची नांवे अशी–रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, केतू व राहू. पृथ्वी हा देखील एक ग्रह आहे. त्या ग्रहाचे सर्व परिणाम आपण त्या ग्रहावरच असल्यानें आपणास नेहमी येत असतात. त्यामुळे त्या ग्रहाची नोंद वरील नवग्रहांत केलेली नाही. परंतु मंगळावरचा एकादा मनुष्य जर ग्रहांची मोजदाद करूं लागला तर तो आपल्या नांवाचा उच्चार न करतां पृथ्वी हा ग्रह आहे असें म्हणून त्याचा उच्चार करील. या पृथ्वीचे या मंगळावर आणि मंगळावर असणाऱ्या मानवावर काय परिणाम होतात याचे परीक्षण तो करील. त्यांच्या नवग्रहस्तोत्रांत पृथ्वीचा शांतीमंत्रदेखील असूं शकेल आणि त्या मंत्राच्या योगानें तो या पृथ्वीची उपासना करील. त्याचे

परिणामाची नोंद करील आणि बऱ्या अगर वाईट गोष्टीचें महत्त्व तो विशद करून सांगेल. अर्थात आपणही पृथ्वीची उपासना करतो. ती ग्रह म्हणून नव्हे तर जन्मदा म्हणून. हा फरक नमूद करण्याइतका जाणवतो.

या सर्व ग्रहाचे एकमेकांना विलक्षण आकर्षण आहे. या आकर्षणांच्या संयोगामुळे कमी-अधिक परिणाम घडत असतात. दोघे ग्रह एकमेकाला आकर्षण करीत असतां प्रत्येक ग्रहाची जी कमी अधिक शक्ति असेल त्याप्रमाणे त्यांचे आकर्षण केंद्रबिंदु मागें पुढें होऊं शकतात. या तत्त्वावरच ज्योतिष शास्त्रानें या ग्रहांची गणती करतांना कोणता ग्रह कोणत्या ठिकाणी असला म्हणजे तो अधिक सामर्थ्यवान अगर निर्बली असतो याचाही आढावा घेतला आहे. तो जेव्हां बलवान असतो तेव्हां तो आपल्याकडे अन्य ग्रहांचे परिणाम खेचून घेतो किंवा त्या आकर्षण परिसीमेत अन्य ग्रह असल्यास त्याचा प्रभाव कमी करतो आणि आपले वर्चस्व कायम ठेवतो. याप्रमाणे पाहता या ग्रहांची उच्चनीच अवस्था स्थूलमानाने खालीलप्रमाणें आहे.

| क्र. | ग्रहाचें नांव | उच्चस्थान | | नीचस्थान | |
|---|---|---|---|---|---|
| | | रास | अंश | रास | अंश |
| १ | रवि | मेष | १० | तूळ | १० |
| २ | चंद्र | वृषभ | ३ | वृश्चिक | ३ |
| ३ | मंगळ | मकर | २८ | कर्क | २८ |
| ४ | बुध | कन्या | १५ | मीन | १५ |
| ५ | गुरु | कर्क | ५ | मकर | ५ |
| ६ | शुक्र | मीन | २७ | कन्या | २७ |
| ७ | शनि | तूळ | २० | मेष | २० |
| ८ | राहू | — | | — | |
| ९ | केतू | — | | — | |

ज्यावेळी दोन ग्रहांचें स्वाभाविक आकर्षण सम प्रमाणांत असते त्यावेळीं त्याला ग्रहांचें मित्रत्व असें मानतात आणि त्यांत विषमता असली तर शत्रुत्व मानले जातें. अर्थात ग्रहांच्या या नात्याचा उपयोग आकर्षणाच्या तीव्रतेंत होतो. प्रत्येक वस्तूच्या बाबतीत ग्रहांचें हें आकर्षण न बदलणारें असें असतें परंतु मानवावरील या ग्रहांचे आकर्षण कमीजास्त करण्याचें सामर्थ्य मानवाच्या अंगीं आहे. अर्थात मानवाला त्यासाठी काही खास प्रक्रिया करण्याची किंवा जरा सोप्या भाषेत सांगायचें म्हणजे उपासना करण्याची आवश्यकता असते. ज्या गोष्टी प्रक्रियेने होतात त्याच गोष्टी मंत्रांनी देखील प्राप्त होतात. त्यामुळें प्रत्येक ग्रहाच्या प्राक्रिया निराळ्या असून मंत्रोक्त उपासना ही निराळी आहे. या योगें मानवाला हवे असणारे ग्रहाचे आकर्षण स्वतःच्या अंगी प्रकर्षित करतां येईल.

प्रक्रिया ह्या निरनिराळ्या वस्तूंच्या माध्यमाने करावयाच्या असतात. या जगांत जे एकूण पदार्थ आहेत त्या सर्व पदार्थावर सर्व ग्रहांची जरी दृष्टी असली, आणि सर्व वस्तूंवर जरी त्या ग्रहांचे परिणाम होत असले तरी कांहीं वस्तु अशा आहेत कीं ह्या वस्तूवर त्या त्या ग्रहांच्या आकर्षणाचे परिणाम किंचित तीव्र असतात. उदाहरणार्थ सुवर्ण ही वस्तू घेतली तर त्या वस्तूंचें आकर्षण केवळ मानवालाच आहे असें नाही तर या सर्वच्या सर्व ग्रहांचा चांगला परिणाम या सुवर्णावर होतो. त्यामुळेच सुवर्णाचे अलंकार करून ते वापरावेत आणि सर्व ग्रहांचे भलेपण आपण घेवून भलें व्हावें हा या अलंकाराच्या मागचा महत्वाचा उद्देश असतो. केवळ सुवर्णाचेच नव्हे तर निरनिराळ्या धातूंचे अलंकार तयार करून वापरण्याची पद्धती आपल्याकडे फार पूर्वीं पासून आहे. हे अलंकार ज्या स्थळीं घालावयाचे ती शरीरावरील स्थळें जर बारकाईनें अभ्यासली तर असें आढळून येईल की शरीरांत शुद्ध रक्ताचा पुरवठा करणाऱ्या ज्या अनेकविध वाहिन्या आहेत त्यांचा

जास्तीत जास्त जवळचा स्पर्श या दागिन्यांना होईल. त्या दागिन्यांत जे ग्रहांचे आकर्षित तेज सांठविलें आहे त्याचा परिणाम त्या वाहिन्यांवर म्हणजेच पर्यायानें रक्तावर होईल. त्यामुळेच शरीरातले सर्व दोष नाहीसे होऊन शरीर तेजवान होण्याच्या मार्गाला लागेल.

ज्याप्रमाणें धातूंचे आहे त्याप्रमाणे इतर पदार्थांचें देखील आहे. त्या त्या पदार्थांचे सहज सांनिध्य प्राप्त करून घेणें हें या प्रक्रिया विधींत मोडतें. प्रत्येक ग्रहाच्या या पदार्थांचें समीक्षण अतिशय सावधपणें करण्यांत आलेले आहे. त्याची सर्व सविस्तर माहिती पुढे एक तक्ता तयार करून दिली आहे. त्यावरून कोणत्या ग्रहाचें सांनिध्य कोणत्या पदार्थांच्या सांनिध्यानें प्राप्त होईल तें त्वरित कळून येईल. अर्थात त्याचे सांनिध्य लाभण्यासाठीं या पदार्थांचा विनियोग कसा करावा हेंही एक शास्त्र आहे. अर्थात या विनियोगाची जी दिशा तीच प्रक्रिया होय हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाही.

( १ ) **धातू अगर पर्याय धातू**—या धातूंचे अलंकार करून शरीरावर धारण करावेत अगर त्या धातूंच्या पात्रातून जेवण करावे अगर पाणी प्यावे.

( २ ) **रत्नें**—रत्नांचा उपयोग दागिन्यांत करावा. विशेषतः आंगठीत ही रत्नें घालून आंगठी हातामध्यें सदैव ठेवावी किंवा ती पाण्यांत ठेवून तें पाणी काही वेळाने प्यावें.

( ३ ) **धान्य**—हें धान्य स्वतः खाणें अगर दुसऱ्याला दान करणें

( ४ ) **पशु**—या पशूची सेवा करणें व त्याचा उपयोग करणें.

( ५ ) **खाद्य रस**—स्वतः भक्षण करणें अगर दान करणें.

( ६ ) **वस्त्र**—स्वतः वापरणें आणि दान करणें.

( ७ ) **पुष्पें**—स्वतः वापरणें, त्या त्या ग्रहाच्या प्रतिमेची पूजा करणे

## नवग्रहांच्या आकर्षण कक्षेतील प्रधान वस्तु

| ग्रह | रवि | चंद्र | मंगळ | बुध | गुरु | शुक्र | शनि | राहू | केतू |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| धातु | सुवर्ण | सुवर्ण | सुवर्ण | सुवर्ण | सुवर्ण | सुवर्ण | सुवर्ण | सुवर्ण | सुवर्ण |
| पर्याय धातु | ताम्र | चांदी | तांबे | कांसे | कांसे | चांदी | लोखण्ड | शिसे | पोलाद |
| रत्नें | मणि | मोती | प्रवाळ | पाचू | पुष्कराज | हिरा | नीळ | गोमेद | लसण्या |
| धान्य | गोधूम | तांदुळ | मसुरा | मूग | हरभरा डाळ | तांदूळ | उडीद | तीळ | तीळ |
| पशु | तांबडी गाय | पांढरा बैल | तांबडा बैल | हत्ती | घोडा | पांढरा घोडा | म्हैस | घोडा | बोकड |
| खाद्य रस | गूळ | तूप | गूळ | तूप | साखर | तूप | तेल | तेल | तेल |
| वस्त्र-वर्ण | कुसुंब | पांढरे | तांबडे | निळें | पिवळें वस्त्र | चित्रविचित्र वस्त्रें | कृष्ण अगर नील | निळें | कृष्णवस्त्र |
| फूल | तांबडे कमळ | पांढरे पुष्प | तांबडे कमळ | सर्व रंगाची पुष्पें | पिवळें पुष्प | पांढरें पुष्प | नील-कमळ | काळें पुष्प | धुम्र पुष्प |

त्यातही एकापेक्षा अधिक वस्तूंचा संयोग हा फलदायी ठरतो. उदाहरणार्थ आपणास गुरु या ग्रहाचे सामर्थ्य कमी पडते तें मिळविणें असेल तर सुवर्णाचें कोंदण करून त्यांत पुष्कराज नावाचें रत्न बसवून तें वापरावें, पिवळें वस्त्र परिधान करावें. गुरूची प्रतिमा करून तिची पिवळया पुष्पांनी पूजा करावी. काशाचें भांडे जेवणास वापरावें. साखरमिश्रित अन्नें खावीत आणि दान करावीत. गोठ्यांत गायी वासरांच्याबरोबर घोडाही असावा. त्याला चारा घालणें. खरारा करणें इत्यादी कामें करून त्याची सेवा करणें आणि त्याबरोबरच त्याचा बसण्यासाठीं उपयोग करणें ही गुरुच्या सामर्थ्याची कामें आहेत. या योगें गुरुपासून प्राप्त व्हावयाचीं फळें मिळतात. याप्रमाणें प्रत्येक ग्रहाचें आहे. ज्या ग्रहाचें बळ कमी पडत असेल तें प्राप्त करून घेण्यासाठीं त्या त्या ग्रहाचें सांनिध्य ज्या ज्या वस्तूंना लाभले आहे त्या त्या वस्तूंच्या सांनिध्यांत राहावें म्हणजे आपणांस हवें असलेलें सामर्थ्य संपादन करतां येतें.

या प्रक्रिया किंवा तंत्र कोणी करावें अगर करू नये यावर तसें फारसें बंधन नाही. या क्रिया करावयास अति सोप्या आणि प्रत्येकाच्या आर्थिक परिस्थितीला परवडतील अशाच आहेत. एक पर्याय साधला नाहीं तर दुसरा, दुसरा साधला नाही तर तिसरा याप्रमाणें एकाखाली एक या दर्जाचे हे पर्याय सुचविण्यांत आले आहेत. कोणताही एक पर्यायसुद्धा याबाबतींत उपयुक्त ठरतो. मात्र या प्रक्रियांची मर्यादा अनेक दिवसाची किंबहुना सबंध जन्माची आहे असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ती नाही.

या प्रक्रियांपेक्षा ग्रहांच्या उपासनेचें सामर्थ्य मोठें आहे. या ग्रहांची उपासना म्हणजे त्यांच्या प्रतिमेची पूजा आणि त्यांच्यासाठी जो जप असेल त्याचा विविक्षित संख्येपर्यंत जप होय. अर्थात जप म्हटला की त्यांत बंधनें आलींच. या बंधनाबरोबर ज्या ग्रहाचा जप करावयाचा

त्याची ओळख करून घेणे आपोआपच आले. जपासाठीं दोन प्रकारचे मंत्र आहेत. वैदिक मंत्रांची जीं बंधनें आहेत त्यापेक्षा पौराणिक मंत्राची बंधने जरा सैल आहेत. दोघांची जपसंस्था सारखी असली तरी बंधनाचे विचार करून त्यांचे परिणाम मात्र किंचित भिन्न असल्याचे आढळून आले आहे.

प्रस्तुत ठिकाणीं पौराणिक मंत्राचाच विचार कर्तव्य आहे. हे पौराणिक मंत्र महर्षी व्यासांच्या अप्रतिहत प्रज्ञेचा सानुभव साक्षात्कार आहे. विश्वाच्या प्रचंड व्यवहारांत या नवग्रहांची साथ कितपत मोलाची आहे याचें ज्ञान त्यांना पूर्णपणें होतें. त्यामुळें त्यांनी प्रत्येक ग्रहाचें स्तोत्र म्हणून अनुष्टुप् काव्य रचना केली आहे. या रचनेंत एकूण १२ श्लोकांचा समावेश असून त्यांतील प्रत्येक श्लोक हा एक एक स्वतंत्र मंत्र आहे तर संपूर्ण श्लोक मिळून एक उत्कृष्ट स्तोत्र आहे. अशी दुहेरी रचना या काव्यांत एकत्रित केली आहे. त्यामुळें प्रत्येकाला एखादा आवश्यक श्लोक मंत्र म्हणून किंवा संपूर्ण श्लोक स्तोत्र म्हणून फायदा करून घेतां येतो. अर्थात प्रत्येक ग्रहाचा ज्यावेळीं स्वतंत्रपणें जप करावयाचा असतो तेव्हां त्याच्या बंधनांचा किंवा पथ्याचा विचार प्रथम करावा लागतो. पथ्यावर ज्याप्रमाणें औषधाचा निम्मा गुण अवलंबून असतो त्याप्रमाणें या क्रियेंत देखील पथ्यावर निम्मे फळ अवलंबून आहे. म्हणून प्रत्येक ग्रहाच्या मंत्रापूर्वी त्या ग्रहाची अल्पशी माहिती देऊन परिणाम आणि उपासना कशी करावी यांचा थोडक्यात मागोवा घेण्यांत आला आहे. साधकांनी साधना करतांना या सर्वांचा विचार प्रथम करावा आणि नंतर आपल्या साधनेस प्रारंभ करावा.

## सूर्य

संपूर्ण ग्रहमालेत सूर्याला पहिला क्रमांक प्राप्त झाला आहे. सूर्य हा या जगाचा आत्मा असून संपूर्ण जगाचे जीवन सूर्याच्या अस्तित्वावरच

अवलंबून आहे. हा ग्रह महान तेजाचा स्वामी आहे. पूर्वींचे लोक त्याची देव म्हणून उपासना करीत होते. त्याचीं स्तोत्रें गात होते. वेदांतसुद्धा सूर्यस्तवन भरपूर आहे. सौरसूक्त नावाचे एक महान सूक्त सूर्याच्या सर्व वैभवाची आणि सामर्थ्याची अंतरबाह्य ओळख करून देते. कारण सर्वांना हवासा वाटणारा परंतु न दिसणाऱ्या देवापेक्षां सूर्य हा चर्मचक्षूला दिसणारा आणि त्याचा प्रभाव मानवाला आपल्या इंद्रियांनी अनुभविता येणारा असा जर कुठला देव असेल तर तो सूर्य आहे. या भावनेनें पूर्वीच्या लोकांनी त्याला आपले भक्तीपूर्ण अर्घ्य प्रदान केलें. त्या आपल्या पूर्वजांची परंपरा आपण अजूनही चालवीत आहोत.

सूर्याचा जन्म कसा झाला याचा खुलासा पुरुषसूक्त नांवाच्या वैदिक सूक्तांता केवळ एकाच वाक्यांत केला आहे. पुरुषसूक्त म्हणजे एका विराट पुरुषाचें शब्दांकित वर्णन आहे. सर्व विश्वाच्या उत्पत्तीचा आढावा घेतांना त्यात सूर्यालाही समाविष्ट केलें आहे. **चक्षोः सूर्योऽजायत** । या त्या सूक्तातील वचनावरून सूर्याची उत्पत्ती त्या विराट पुरुषाच्या नेत्रांपासून झाली आहे. नेत्र ज्याप्रमाणें सर्व कांहीं पाहूं शकतात त्याप्रमाणें सूर्य देखील सर्व कांही पाहू शकतो. त्याच्या दृष्टीस न पडणारी अशी एकही वस्तू या विश्वांत नाहीं. अर्थात सूर्याच्या प्रकाशामुळेंच विश्वांतील सर्व वस्तु प्रकाशांत येतात असे म्हटलें तरी चालेल. त्यावरून सूर्याला सर्व वस्तूंचा नियामक अशी मानाची बिरुदावली पूर्वसूरींनीं बहाल केली आहे. त्याच्या प्रकाशप्रभावानें विश्वांतील सर्व वस्तू प्रगट होतात, जगतात किंवा विलीन होतात. या सर्व वस्तूंत मानव ही सर्व श्रेष्ठ वस्तू आहे, तिच्यावर या सूर्याचा प्रभाव सर्वांत अधिक आहे.

सूर्याचा लौकिक आणि अलौकिक विस्तार देखील खूप मोठा आहे. गणिताच्या भाषेंत बोलायचें तर पृथ्वीपासून हा ९२.९० लक्ष मैल किंवा

१४८-६४ लक्ष किलोमीटर दूर आहे. आकारानें हा गोल असून त्याचा व्यास ८,६४,१०० मैलांचा आहे. त्याच्या उष्णतेचा प्रभाव इतका मोठा आहे कीं दक्षिणायनांत केवळ एक तास सूर्य कमी प्रकाश देतो तर लोक थंडीनें गारठतात आणि त्याच्या विरुद्ध उत्तरायणांत एक तास तो अधिक तळपतो तर लोकांची हायहाय होते. शास्त्रीय शब्दांत सांगायचें तर ही सूर्याची उष्णता साधारण १२००० फॅरनहीटच्या पेक्षां किंचित अधिकच येईल. इतक्या लांबून आपणांस त्याचा जो वाटा मिळतो तो किती अत्यल्प आहे हें सहज समजून येईल.

पूर्वसूरींना सूर्याच्या शक्तीचे जे प्रत्यय आले त्यांतून सूर्याची ओळख करून देतांना त्याचे पितृत्व स्पष्ट केले आहे. पैकीं यमधर्म हा सूर्याचा एक पुत्र आणि शनि हा दुसरा पुत्र होय. यमी नांवाची सूर्याला एक कन्यका पण होती. शनि जन्माला येताच त्याची नजर सूर्याचा सारथी जो अरुण त्याच्यावर पडली आणि त्याचे हातपाय गळून पडले. त्या त्याच्या वाईट दृष्टीचा प्रत्यय आपल्यासारख्या सामान्यांना सुद्धा येतो. ज्योतिष शास्त्रांत देखील शनि ज्या स्थानांत पाहातो त्याचे परिणाम अधिक असतात असें म्हणतात. यावरून एक निष्कर्ष काढतां येईल की सूर्याजवळ देखील एक विकृत शक्ती आहे. अर्थात तिचें नियमन कसें करावें हा भाग स्वतंत्र आहे. त्याचा विचार शनि या ग्रहाच्या मंत्राचा ज्या वेळीं विचार करण्यांत येईल तेव्हा केला जाईल. या शक्तीच्या विरुद्ध अतिशय नियमबद्ध आणि नियामक शक्तीचें स्वरूप हा सूर्यशक्तीचा आणखी एक महत्त्वाचा भाग आहे. त्याठिकाणीं यमाची योजना केली आहे. यम हा सर्व प्राणिमात्रांचा नियामक आहे. स्वतः तो अत्यंत ज्ञानी असून सर्व प्राण्यांना जगण्यासाठीं ज्या अग्नीचें सामर्थ्य लागतें त्या अग्नीचें यथार्थ ज्ञान असलेला पुरुष म्हणजे यम होय. त्यानेंच नचिकेताला या अग्नीचें स्वरूप स्पष्ट करून सांगितलें असल्याची कथा कठोपनिषदांत आहे. यमी ही सूर्यातील एक

सुप्त शक्ती आहे. सूर्याने या शक्तीचें दान चंद्राला करून चंद्राला तेजोवान करण्याचें महत्त्वाचें कार्य केलें. ज्या क्रियेला चंद्राची सतरावी कला असे संबोधतात ती कला म्हणजे यमीचें स्वरुप आहे. ज्या ठिकाणीं तेज आहे त्या ठिकाणीं दाहकता आहे. सूर्य अथवा अग्नी याच्या जवळ असणारे तेज दाहक आहे. परंतु ज्या तेजातून दाहकता पूर्ण निघून गेली आहे, परावर्तन थांबले आहे असे जें तेज असेल तें तेज फक्त चंद्राजवळ आहे. चंद्राच्या तेजानें प्रेमविरही जीवां व्यतिरिक्त अन्य जीवांना कधींही दाहकता पोंहोचत नाही. म्हणून चन्द्राच्या तेजांत अमृतकण असल्याची ज्ञानेश्वर महांराज ग्वाही देतात.

**शारदियेचिये चंद्रकळे । माजी अमृतकण कोंवळे ॥**
**ते वेचिती मनें मवाळें । चकोरतलगें ॥**

अशी ही सूर्याची पौराणिक प्रभावळ आहे. यावर खूपच लिहिण्या-सारखें आहे. परंतु प्रस्तुत लेखाचा तो विषय नाही. सूर्याजवळ ज्या अनेक-विध शक्ति आहेत त्या प्रत्येक शक्तिच्या प्रभावाला एक एक नांव पूर्व-सूरींनी दिलें आहे. परंतु त्यांतल्या त्यांत शरीरबळ उपासनेसाठीं म्हणून ज्या शक्तीचें आवाहन करण्यास सांगितलें आहे त्यांची नावें अशी आहेत.

**मित्ररविसूर्यभानुखगपूषहिरण्यगर्भमरीच्यादित्य-**
**सवित्रार्कभास्करा: ।**

मित्र, रवि, सूर्य, भानु, खग, पूषन्, हिरण्यगर्भ, मरीचि, आदित्य, सवितृ, अर्क, भास्कर.

शरीर सामर्थ्यासाठीं या आवाहनांचा खूप उपयोग होतो. त्याप्रमाणेंच—भास्वान्, विवस्वान्, अर्यमा, मार्तण्ड वगैरे नावांचा उपयोग अलौकिक सामर्थ्यासाठीं होतो. परंतु महर्षी व्यासांनीं या सर्व शक्तींचा

समावेश होईल अशा तऱ्हेची अक्षरें जमवून त्यांतून सूर्याच्या वर्णनाचा; एक श्लोक निर्माण केला.

**जपाकुसुमसंकाशं काश्यपेयं महाद्युतिम् ।**
**तमोरिं सर्वपापघ्नं प्रणतोऽस्मि दिवाकरम् ॥**

या श्लोकाच्या जपानें साधकाला सूर्यमध्यें असणारी शक्ती आकर्षित करून घेतां येते. मात्र प्रत्येक साधकाला हा जप सिद्ध करावा लागतो. जप सिद्ध करणें याचा अर्थ त्याचें साधकाला फळ प्राप्त होईल असें करणें असा तूर्त करावा. या जपाची संख्या ७००० असून तो रोज एक हजार याप्रमाणें सात दिवसांत पूर्ण करावयाचा असतो. याप्रमाणें ७००० जप झाला कीं एक मंडळ पूर्ण होतें. अशी सात मण्डलें पूर्ण केली की तो जप सिद्ध झाला असें समजावे. अर्थात एक मंडळ पूर्ण होतांच साधकाला त्याचा परिणाम जाणवूं लागतो. पण साधकानें त्यावरच समाधान मानून स्वस्थ बसतां कामा नये. त्यानें आपली सातही मंडळें पूर्ण करावीत.

**जपाची पूर्ण तयारी –**

सूर्याचा जप सूर्य उगवण्यापूर्वी एक घटका म्हणजे २४ मिनिटां-पासून तो सूर्यास्तानंतर चोवीस मिनिटापर्यंतच करावा. या काला–व्यतिरिक्त हा जप करूं नये. सूर्य आकाशीं नसतांना हा जप करूं नये.

सूर्योदयापूर्वी स्नान करून संध्यावन्दनादि आन्हिक पार पाडावें. त्यानंतर सूर्याची पूजा करावी. पूजेसाठीं तांबड्या गंधानें पाटावर एक बिंबाकृति काढावी. गोलाच्या आंत ॐ लिहावा आणि त्याची पूजा करावी. सूर्याच्या पूजेसाठीं अक्षता जास्वंदीचीं पुष्पें वापरावीत. सूर्याला दुधाचा नैवेद्य समर्पण करावा. सूर्याला आपला जप ऐकण्याची प्रार्थना

करावी आणि मगच जप करण्यास प्रारंभ करावा. जप पूर्ण होईपर्यंत मांडी हलवूं नये. कोणाशीं बोलू नये अथवा दुसऱ्या कोणाशीं खुणांनी संकेत करूं नयेत. एकाग्र मनानें जप पूर्ण करावा. जप पूर्ण होतांच सूर्याला पुन्हा नमस्कार करावा आणि उद्यां पुन्हा या ठिकाणी येण्याची विनंती करावी. याप्रमाणें करावयाचा जप शक्य तो चैत्र महिन्यांत, कर्क अथवा मकर संक्रातीच्या दिवशींच प्रारंभ करावा.

### जपाची फलसिद्धी

हा जप अनेक कारणासाठीं करण्यांत येतो. शरीरांत निर्माण होंणाऱ्या अनेक प्रकारच्या विकृती या जपानें नाहीशा होतात. शरीर कान्तीमान होते. विशेषतः खालील कारणासाठीं हा जप किती करावा तें खाली दिले आहे.

१ ) दृष्टी सुधारण्यासाठीं – दुपारीं तांब्याच्या अगर चान्दीच्या ताम्हनांत पाणी घेवून तें उन्हांत ठेवावें आणि त्याच्या शेजारी उभे राहून त्या पाण्यांत पडणारे सूर्यबिंब पाहावें. पाहात असतांना मुखानें या श्लोकाचा १०८ वेळां जप करावा. बिंबावरील दृष्टी ढळूं देऊं नये. याप्रमाणें ४०० दिवसात डोळे पूर्णपणें सुधारतात.

२ ) मुलांना होणारा मुडदूस–सूर्याच्या उन्हांत तांब्याच्या पातेल्यांत पाणी ठेवावें. त्याकडे पाहून १०८ वेळां हा जप म्हणावा. त्यानंतर तें पाणी तसेंच तापत ठेवावें आणि सायंकाळी सूर्यास्ताला दीड तास कमी असतांना मुलाला स्नान घालावें. याप्रमाणे ९० दिवस करावें. याचप्रमाणें क्षय झालेल्या माणसाला उपचार केल्यास त्याचा फारच चांगला उपयोग होतो.

३ ) बलहीन मनुष्यानें किंवा ज्याची पचनशक्ती विकृत झाली आहे अशा माणसानें हा जप करावा. त्यावेळीं समोर तांब्याच्या भांड्यात

पाणी ठेवावें. जप पूर्ण होताच तें पाणी प्यावें. त्याचप्रमाणें सूर्याचा या लेखांत नमूद केलेल्या नावांचा उच्चार करून बारा नमस्कार घालावेत.

४) मंद बुद्धीच्या मुलांनीं या श्लोकाचा रोज ५१ वेळां जप करावा. मात्र प्रत्येक श्लोकाच्या प्रारंभी ॐ म्हणावा. हा जप नित्य करावा.

ज्याला या जपाचा उपयोग व्हावा असें वाटत असेल त्यानें हा जप स्वतः करावा. दुसऱ्याकडून हा जप करून घ्यावयाचा असेल तर तो मनुष्य शुद्ध आचरणाचा असला पाहिजे. मात्र दुसऱ्यासाठीं करावयाचा जप मूळ संख्येच्या दुप्पट करावा लागतो. अशा ब्राह्मणाला त्याच्या इच्छेप्रमाणें दान द्यावें म्हणजे त्याचें फळ मिळतें. तान्ह्या मुलाच्या बाबतीत त्याची आई अथवा वडील यांनी जप केला तरी चालेल. त्या मुलासाठीं करावयाचा जप दुप्पट करण्याची आवश्यकता नाही. मात्र ज्यावेळीं मूल एक वर्षापेक्षां मोठें होते त्यावेळीं मात्र हा जप दुप्पट करावा लागतो. कारण ज्याची भूक व तहान केवळ पेय पदार्थांच्या सेवनानें भागते त्यालाच तान्हा असें संबोधन आहे. ज्यावेळीं साधक प्रवासांत असेल तेव्हां त्यानें आकृती वगैरे न काढतां कोठेंही, उभ्यानें जरी जप केला तरी चालेल. सातत्य हें या जपाचें वैशिष्ट्य आहे हें नित्य लक्षांत ठेवावें.

**सोम किंवा चंद्र—**

पृथ्वीच्या जवळ असणारा आणि सर्व ग्रहांत सर्वांना अत्यंत प्रिय असणारा असा हा दुसरा ग्रह आहे. या ग्रहाची उत्पत्ती विराट पुरुषाच्या मनापासून झालेली आहे. चंद्रमा मनसो जातः। असा उल्लेख पुरुषसूक्तांत केला आहे. परंतु खरें पाहिलें तर देव-दानवांनी अमृतासाठीं जें क्षीरसागराचें मंथन केलें त्या सागरांतून एकूण चौदा अलौकिक रत्नें बाहेर पडली.

अमृताचे सहोदरत्व प्राप्त झाल्यानें अमृताचा गुण चंद्राच्या प्रकाशाला लाभला आहे. सागराचें पितृत्त्व चंद्राला लाभलें. ज्यावेळीं चंद्र आपल्या पूर्णकलांनी जगाला दर्शन देतो त्यावेळीं सागराला उधाण येते. सागर आपल्या पुत्रास भेटण्यास अधीर असतो याची साक्ष पटते. चंद्र हा सूर्याकडून प्रकाशित होत असल्यानें चंद्राला कला प्राप्त होतात. या प्रत्येक कलेला वेगवेगळा अर्थ आहे आणि त्या कलांचे प्राणिसृष्टीवर होणारे परिणामही विविध प्रकारचे आहेत. चंद्र हा पृथ्वीच्या बराच जवळ असल्यानें उपासनेच्या दृष्टीनें त्याचा फार मोठा विचार करावा लागतो.

सूर्य हा वनस्पतींमध्यें रस निर्माण करतो परंतु ते रस पूर्णपणें त्या वनस्पतीत मुरविण्याचें कार्य मात्र चन्द्र करतो. त्याचप्रमाणें शरीरांत अन्नाच्या द्वारें निर्माण होणारे सर्व रस शरीरांत मुरविण्याचें कार्य चंद्राकडून होत असतें. ज्याच्या जवळ चंद्रबळ कमी त्याचें कार्य शुभ होणार नाहीं. त्यांत अनेक विघ्ने येतील. ती येवू नयेत म्हणून चंद्राच्या सामर्थ्याची आवश्यकता आहे. चंद्राला रसपोषक, रसशोषक असें म्हटल्यास त्यांत मुळींच वावगे होणार नाही. आपण रोज जेवण करतो. तें पचून आपल्या अंगीं लागावें अशी आपली अपेक्षा असते. त्यासाठीं चंद्राची मदत घेणें जरूर आहे. ज्या वेळीं आपले पोट अन्नानें भरेल तेव्हां त्याच्या पचनास प्रारंभ होतो. या पचनास चंद्राची जरूरी आहे. या दूर-विचारानें आमच्या पूर्वीच्या ज्ञात्यांनीं जेवण केव्हां करावें याचें बंधन घालून दिलें आहे. आपल्या नाकास दोन छिद्रें आहेत. या छिद्रांतूनच आपली श्वसनक्रिया चालते. आपण बारकाईनें पाहिल्यास आपणांस असें आढळून येईल कीं या दोन नाकपुड्यांपैकीं एकाच नाकपुडीनें आपण श्वसनाचें कार्य करतो. एक नाकपुडी बंद असते. कांहीं वेळाने त्यांत बदल घडतो. या नाकपुड्यांपैकीं उजव्या नाकपुडीला सूर्य नाडी असें म्हणतात. ज्यावेळीं

आपली सूर्यनाडी चालू असेल तेव्हांच आपण भोजन करावें.त्यानंतर कांहीं काळानें चन्द्र नाडी चालू होईल आणि पचनास सुरवात होईल. खाल्लेल्या अन्नांतील रस हळू हळू शोषण करून घेतले जावून ते रस शरीराच्या ज्या भागांत नेऊन पोहोचवावयाचें असतात त्या ठिकाणीं नेऊन पोहोचविण्याचें कार्य चालू होतें. त्याचा उपयोग शरीरांत असणाऱ्या अनेक अवयवांना करून घेतां येतो; त्यामुळें तीं सर्व अंतरबाह्य समर्थ बनतात. ज्यावेळीं चंद्रनाडी चालू असेल तेव्हां भोजन करूं नये. कोणती नाडी केव्हां चालू आहे तें ओळखणें अर्थातच अगत्याचें ठरतें. ती ओळखण्यासाठीं आपण आपल्या हाताच्या मधल्या तीन बोटांचा उपयोग करावा. मधलें बोट नाकाच्या शेंड्यावर ठेवावें म्हणजे त्याच्या शेजारची दोन्ही बोटें आपोआपच डाव्या व उजव्या बाजूस येतील. अशी बोटें धरल्यावर जोरानें श्वास सोडावा. उजव्या किंवा डाव्या बोटाला तो श्वास स्पर्श करील. त्याप्रमाणें उजवी सूर्य व डावी चन्द्र नाडी चालू आहे हें लगेच लक्षांत येईल. क्वचित दोन्ही बोटांना एकदम श्वास लागल्यास दोन मिनिटें थांबून पुन्हा प्रयोग करावा म्हणजे योग्य तो निर्णय मिळेल. या सर्व विस्तारावरून इतकें ध्यानांत येईल की मनुष्याच्या सुदृढतेला सूर्याबरोबर चंद्राची देखील जोड लागते. चंद्रबळ नसेल तर तें प्राप्त करून घेण्यासाठीं चंद्राची उपासना करावयाची असते. शरीरांतील एखाद्या अवयवांत न्यूनता असणें हें चंद्राचें बळ कमी पडल्याचें उदाहरण आहे असें मानावें. जन्माच्या वेळीं चन्द्र ज्या राशीला असेल ती त्या मानवाची रास असें आपले ज्योतिषशास्त्र सांगते. अर्थात राशीवरून आपल्या गत चालू आणि भावी आयुष्याची रेखा काढतां येते इतकें या चंद्राला महत्त्वाचें स्थान प्राणिमात्रांच्या आयुष्यांत प्राप्त झालेलें आहे. सूर्य उष्णगर्भ आहे तर चन्द्र शीतगर्भ आहे. याच सूत्राचा उपयोग आपल्या वैद्यकीय शास्त्रांत देखील करून घेण्यांत आला आहे. अर्थात शीतगर्भ,

चंद्राचा प्रभाव आपणास जपानें साधतां येतो. महर्षी व्यासांनी चंद्राचा जो जपश्लोक दिला आहे तो खालील प्रमाणें आहे.

**दधिशंखतुषाराभं क्षीरार्णवसमुद्भवम् ।**

**नमामि शशिनं सोमं शंभोर्मुकुटभूषणम् ॥**

या मंत्राचा एकूण जप ११००० करावयाचा असतो. हा जप रोज एक हजार प्रमाणें अकरा दिवसांत किंवा ५०० प्रमाणें बावीस दिवसांत पूर्ण करावा. किंवा रोज १०८ प्रमाणें ११० दिवसांत देखील करतां येतो. यांत पहिला प्रकार उत्तम, दुसरा मध्यम व तिसरा निकृष्ट समजला आहे. अर्थात जपांच्या फलामध्यें त्यामुळें फारसा फरक पडतो असें मात्र नाहीं. या जपाची सुरवात चैत्र किंवा आश्विन या महिन्याच्या शुद्ध प्रतिपदेला करावी. ते न जमले तर कोणतीही शुद्ध प्रतिपदा घेऊन त्या दिवसापासून या जपास प्रारंभ करावा. परंतु या दोन तिथी विशेष म्हणून गणल्या आहेत. अत्यंत शुचिर्भूत मनानें हा जप केव्हांही करण्यास हरकत नाही. तरी देखील ज्यावेळीं आकाशांत चंद्र असतो तेव्हां या जपाचा फायदा अधिक मिळतो. अर्थात चंद्र रोज निरनिराळ्या वेळीं उगवतो. त्यामुळें जपाची वेळ बदलत राहील. कारण चन्द्र रोज साधारणपणें पाऊण तास उशीरा उगवतो. याचा विचार केल्यास सध्याच्या काळीं तरी यांत कठीणता वाटणें स्वाभाविक आहे. परंतु चंद्राच्या जपाची फलश्रुती चंद्राकडूनच व्हावयाची असल्यानें त्याचें अस्तित्व असणें अधिक चांगलें. ज्यावेळीं आकाशांत चंद्र असणार नाहीं तेव्हां चंद्रनाडी चालू आहे असें पाहून या जपाला प्रारंभ करावा. मात्र त्यावेळीं पोट मोकळें ठेवावें आणि जप झाल्याबरोबर दूध घ्यावें. जप पूर्ण होईपर्यंत दुधाचा पेला भरून जवळच किंवा आपल्या समोर ठेवावा. या जपाच्या वेळीं रात्रीचे जेवण घेवूं नये. त्याऐवजीं दुग्धाहार करावा.

या जपामुळें जन्म कुंडलींत चंद्र नीच स्थानीं असेल तर तो त्रासदायक ठरत नाहीं. चंद्राच्या अनिष्ट फळांची तीव्रता कमी होते. चंद्राचें प्रमुख बळ अध्यात्म कार्यासाठीं लागतें. मनांत असणारे सर्व संशय त्वरेनें दूर होतात. मन स्थिर होते. विशेषतः विद्यार्थी अवस्थेंत स्थिर मनाची आवश्यकता अधिक असते. मनाची शक्ती वाढविणें हें या जपाचें एक महत्वाचें कार्य आहे.

काहीं कारणामुळें अंगांत उष्णता निर्माण होते. ती जाण्यासाठीं चंद्राच्या प्रकाशांत, चांदीच्या भांड्यांत दूध ठेवून ह्या मंत्राचा १०८ प्रमाणें १५ दिवस जप करावा. रोज जप झाला कीं तें दूध प्राशन करावें. त्याचा उपयोग फारच चांगला होतो. विशेषतः देवी, गोंवर, कांजिण्या, आगपेण, या सारख्या रोगोपशमानंतर या प्रयोगाची साक्ष पटते.

स्त्रियांच्या बाबतींत हा जप अतिशय फलदायी आहे. त्यांच्या अंगांत निर्माण होणाऱ्या सर्व नैसर्गिक विकृती, मासिक धर्माच्या बाबतींत होणारा अनियमितपणा, आणि स्वतःची कान्ती सतेज करण्यासाठीं याच जपाचा उत्तम उपयोग होतो. त्यासाठीं प्रतिपदा ते पौर्णिमा या पंधरा दिवसांतच हा जप करावयाचा आहे. त्यावेळीं ज्या ठिकाणीं चंद्रप्रकाश पडेल अशी जागा निवडावी. खाली जमीन असेल तर ती गाईच्या शेणानें सारवून घ्यावी. फरशी असेल तर पाण्यानें पुसून घ्यावी. त्यावर पांढरें शुभ्र वस्त्र अंथरावें त्याची लांबी रुंदी १×१ हात अशी असावी. या वस्त्राच्या मध्यभागी चांदीच्या पेल्यांत गाईचें सायंकाळचें निरसें दूध ठेवावें. गाईचें न मिळाल्यास म्हशीचें घ्यावें. शक्य तो दूध निरसें असावें. अन्यथा फल प्राप्त होण्यास अवधी लागेल. त्या दुधात चार खरे मोती टाकावेत. साधकानें स्वतः पांढरी वस्त्रें परिधान करावींत. त्या वस्त्राच्या जवळ बसून, दुधाकडे पाहात या मंत्राचा ७०० पर्यंत जप करावा. नंतर तें दूध अगदीं सावकाशपणें प्राशन करावें.

हा जप रोज केल्यास स्त्रियांना सौंदर्य प्राप्त होतें. रोहिणी नक्षत्रावर चंद्र आल्यावर रोज १०८ प्रमाणें जप करण्यास प्रारंभ करावा आणि तो पुन्हा रोहिणी नक्षत्रावर येईल तेंव्हां समाप्त करावा. या या जपाचे वेळीं समोर दूध ठेवावें. जप पूर्ण होतांच त्यांतले अर्धे दूध आपल्या पतीला द्यावें आणि अर्धे आपण प्यावें. त्यामुळें दोहांतील प्रीती अतूट राहाते. वैमनस्य अथवा मतभेद देखील पूर्णपणें संपतात.

या जपानें चंद्रनाडी शुद्ध होते आणि या नाडीवर प्रारंभ केलेली सर्व कामें त्वरेनें सिद्धीस जातात.

**भौम**

भौम हें मंगळाचें खरें नांव. कारण मंगळाचा जन्म या पृथ्वीपासून झालेला आहे. त्याच्या जन्माची साद्यंत हकिगत मुद्‌गल पुराणांत आलेली आहे. भूमीचा पुत्र म्हणून भौम हें त्याचें अगदी यथार्थ असें कुलनाम आहे. त्याच्या जन्मकथेत त्याचा पिता जो भारद्वाज ऋषी यानेंच त्याला मंगळ ही पदवी मिळवून दिली. भौमानें आपल्या पित्यानें सांगितल्याप्रमाणें अगाध तपस्या केली. ॐ गँ गणपतये नमः या मंत्राची पुरश्चरणें केली. त्यावेळीं गणतीचें मंगलत्व त्याला प्राप्त झालें. तेंव्हापासून मंगळाला भौम या नांवाऐवजी मंगळ म्हणण्याची प्रथा पडली. त्याला अंगारक असेंही म्हणतात. मंगळाचा जन्म पृथ्वीपासून झाला. पृथ्वीचें अंतरंग अग्नीच्या तेजानें तप्त झालेलें आहे. त्यामुळें त्याचा वर्ण देखील जन्मतःच अंगार म्हणजे विस्तवाप्रमाणें लाल झाला आहे. प्रत्येक ऋतुमानाप्रमाणें पृथ्वीचा वर्णही ज्याप्रमाणें बदलतो त्याचप्रमाणें मंगळाच्या लाल छटेंत देखील पृथ्वीवरील ऋतुमानाप्रमाणेंच बदल घडतो. हा बदल आपल्या डोळ्यांना सहजपणे ओळखता येतो. पृथ्वीमुळें ज्याप्रमाणें मंगळांत बदल घडतो त्या प्रमाणें मंगळाचेही परिणाम पृथ्वीवरील सर्व वस्तूंवर कमी अधिक प्रमाणांत होत असतात. त्यांतल्या त्यांत मंगळाचा प्रभाव मानवाच्या संपूर्ण जीवना-वर होतो. त्यामुळेंच इतर ग्रहांच्या बरोबर या ग्रहाला देखील ज्योतिर्वि-

द्यांनी महत्त्व दिलें आहे. त्यांच्या दृष्टीनें मंगळ हा सामर्थ्यसंपन्न, उत्साह धैर्य, चापल्य आणि पराक्रम यांचा कारक ग्रह आहे, पृथ्वीच्या अंतरांत असलेली दग्धता, भारद्वाज ऋषींच्या अंगची सामर्थ्यसंपन्नता हे दोन गुण मंगळाच्या अंगीं पूर्णपणें उतरले आहेत. परंतु पृथ्वीची क्षमा आणि ऋषींची सज्जनता मात्र या ग्रहांत फारशी नाही. त्यामुळें जन्म कुण्डलींत अनिष्ट मंगळ इष्ट करू शकत नाही. त्याची फळें त्याच्या सांनिध्यात जे अन्य ग्रह असतील त्यांच्या परिणामानें प्रभावित झालेली असतात. परंतु मंगळ जर उच्च ठिकाणचा असेल तर तो आपले उच्चपण अबाधित राखल्याशिवाय राहात नाही. मंगळाचा विचार विशेषत्वानें करण्याची जरूर भासते ती ज्यावेळी या गृहस्थाश्रमाचें ओझें मस्तकीं धारण करावयाची वेळ येते तेव्हा. विवाहात मंगळ हा एक अडथळा आहे असेंही काही लोक स्पष्ट अनुमान करतात. अर्थात त्यांच्या म्हणण्यात असत्य असें काहीच नाही. अनेक कुण्डल्यांचा अभ्यासपूर्ण विचार केल्यावर असें आढळून आले आहे की स्त्रियांच्या कुण्डलीत मंगळ जर शनी या ग्रहाच्या मागे पुढे असेल तर तो वैधव्य देतो. अर्थात जन्मलग्न कुण्डलीत देखील तो विशिष्ट स्थानी असेल तरच हा दुर्योग संभवतो अन्य ठिकाणीं तशी स्थिती असतां हा योग अन्य पापग्रहांच्या सांनिध्यावर अगर दृष्टीवर अवलंबून असतो.



वर निर्देश केलेल्या ठिकाणींच जर हे ग्रह येतील तरच हा दुर्योग असतो. अर्थात या योगांतून निर्माण होणारी अनिष्टता मंगळाच्या उपासनेंतून कमी होते. मंगळाचें तेज आकर्षण करून घेण्यासाठी मानवानें काही वस्तूंचे सांनिध्य साधून मंत्राचा जप करावा. महर्षि व्यासांनी या जपाचा जो श्लोक लिहिला आहे तो खालीलप्रमाणें आहे.

**धरणीगर्भसंभूतं विद्युत्कान्तिसमप्रभम् ।**

**कुमारं शक्तिहस्तं च मंगलं प्रणमाम्यहम् ॥**

या श्लोकाचा एकूण १७,००० जप करावा लागतो. रोज पांचशें प्रमाणें ३४ दिवसांत या जपाचें एक मंडळ पूर्ण होतें. एकदा १७००० जप पूर्ण झाला म्हणजे त्याचे मंडळ होते. अर्थात हा जप आणखी काही प्रकारांनी करता येतो.

(१) रोज १००० प्रमाणें १७ दिवसांत.

(२) रोज १०८ प्रमाणें ५ महिने २० दिवसांत

मंगळाच्या जपाला साधारणपणें मंगळवारीं प्रारंभ करावा. हा जप करण्यापूर्वीं स्नानादि कर्मांनीं मनुष्यानें शुद्ध झालें पाहिजे. आसनासाठीं लोंकरीचें अगर धूतवस्त्राचें आसन वापरावे. एकदां जप प्रारंभ केला कीं आसन बदलू नये. पहिल्या दिवशीं जें आसन असेल तेंच आसन १७००० जप पूंर्ण करीपर्यंत ठेवावें. त्यानंतर पुन्हा जप करणें असेल तर आसन तेच ठेवावें किंवा बदलावें. रोजचा जप सूर्योदयाबरोबर संपूर्ण झाला पाहिजे. रोज पांचशें याप्रमाणें जप करावयाचा तर कमीत कमी एक तास तरी लागेल. त्यामानानें वेळापत्रक साधावें. यापेक्षां जरा कमी दर्जाची वेळ म्हणजे सूर्योदयापासून पांच घटिका म्हणजेच दोन तास. या काळांत असें पाहावें कीं मंगळ आणि सूर्य एकाच राशींत नाहीत ना ? तसे ते असतील तर मंत्राचा प्रभाव किंचित दुरावतो. मंगळाचा जप करण्यापूर्वीं मंगळाची

पूजा करावी. त्यासाठी सुवर्ण अथवा तांबे यांच्या प्रतिमा करवून घेतल्यास चांगल्या. त्यानंतर मंगळाची प्रार्थना करावी आणि मग जपाला प्रारंभ करावा.

**जपाचा विनियोग–**

(१) ज्या स्त्रियांच्या कुण्डलींत वैधव्यासारखा दुर्योगकारक मंगळ आहे त्यांनी या योगाचें अनिष्ट फळ मिळू नये म्हणून या मंत्राचा जप करावा. १७००० चें एक याप्रमाणें पांच मंडळें पूर्ण केली असतां हा दुर्योग नाहीसा होतो किंवा त्याची तीव्रता कमी होते.

(२) मंगळामुळें घडून येणाऱ्या अपघातांची तींव्रता कमी करण्यासाठीं या जपाचा उपयोग चांगला होतो.

(३) ज्यांना नेहमी उद्विग्नता वाटते; कोणतेंही काम करण्यासाठीं लागणारा उत्साह प्राप्त होत नाहीं अशा माणसांना या जपाचा उपयोग निश्चितपणें होतो.

(४) भित्रेपणा, रक्तांतील दोषामुळे निर्माण होणारे रोग, संकट-काळीं आवश्यक असणारें धैर्य आणि चपलता यांच्या प्राप्तीसाठीं या जपाचा अवलंब करणें जरूर आहे.

(५) स्त्रियांच्या नैसर्गिक अडचणीच्या बाबतीत अगर गर्भाशयाच्या बाबतीत निर्माण होणारी विकृती या जपानें दूर होते. रोज १०८ प्रमाणें हा जप ६८७ दिवस पर्यंत करावा म्हणजेच २ वर्षे एक महिना व २९ दिवस होतात. या काळांत नैसर्गिक धर्माचे चार दिवस वर्ज्य केले म्हणजे इष्ट दिवस जप होतो.

**बुध**

सूर्यमालेंतील हा एक महत्वाचा ग्रह आहे. पृथ्वीपासून हा चार कोटी मैलांपेक्षां अधिक लांब आहे. याचा रंग किंचित पिवळसर आहे.

हा नेहमीं सूर्याच्या सांनिध्यांत असल्यानें नेहमीच आकाशांत दिसेल असें नाही. ज्यावेळीं तो सूर्यापासून लांब जातो तेव्हां त्याचें दर्शन होते. दिसण्यांत हा अत्यंत सौम्य असल्याने त्याच नांवानें त्याला आवाहन करण्यांत येते. पुराणांत या ग्रहाच्या जन्माच्या अनेक कथा उपलब्ध आहेत. परंतु या सर्व कथांवरून एकच निष्कर्ष निघतो कीं चंद्राने बृहस्पतीची पत्नी तारा हिचे अपहरण केले. बृहस्पतीला हे समजतांच त्याचें आणि सोमाचे युद्ध झाले. या युद्धाचा निर्णय लागला तेव्हां तारा गर्भवती होती. त्यामुळे सोमाने तिला पुत्रवती होईपर्यंत आपल्याकडेच राहूं द्यावी असे विनविले. त्याप्रमाणे पुढे तारा प्रसूत झाली. तिला बुध हा पुत्र झाला. या पुत्रांत बृहस्पतीची बुद्धी आणि चंद्राचे सौम्य तेज यांचा उत्कृष्ट मिलाफ झालेला आढळतो. याचे परिणाम पृथ्वीवर उशीरा होतात. अर्थात तो सूर्याच्या सांनिध्यांत असल्याने सूर्याचा प्रभाव याच्या प्रभावाच्या आड येतो. त्यामुळें या ग्रहाचा जप करतांना तो ज्यावेळीं सूर्यापासून दूर असेल तेव्हांच करावा लागतो.

ज्योतिर्विदांच्या मताप्रमाणे हा ग्रह बुद्धिदाता म्हणून समजण्यांत येतो. गुरु आणि बुध या दोन्ही ग्रहांचा परिणाम बाह्यता जरी एक असला तरी त्यामध्ये मात्र अंतरंगीं फार मोठा फरक आहे. बुध हा प्रवेश करून देणारा ग्रह आहे तर गुरु हा बुद्धीच्या साम्राज्यांत स्वच्छंदपणें वावरणारा ग्रह आहे. ज्याठिकाणी मानवाची बुद्धी रुद्ध होते त्याठिकाणीं बुधाचे मंत्रसांनिध्य अत्यंत मोलाचे ठरते. अप्रतिहत बुद्धीच्या मार्गात सहाय्यक म्हणूनच याची गणना आहे. लौकिक ऐश्वर्य मिळविण्यासाठीं लागणारी बुद्धिमत्ता याच्या उपासनेनें प्राप्त होते. परंतु या ग्रहाची मौज अशी कीं त्याला एकट्याला फारशी गती नाहीं. प्रेरक म्हणून अन्य कोणत्या तरी ग्रहाची साथ त्याला असावी लागते. ज्या ग्रहाची त्याला साथ मिळेल त्याप्रमाणें तो फळ देणारा ठरतो. सूर्य, चंद्र, गुरु हे

याचे खरें पाहिलें तर उत्तम साथी आहेत. यासाठीं जपाचा काळ ठरवितांना बुधाची साथ कोणती आहे याचा विचार अवश्य करावा. दुर्योगी ठरणारी साथ असेल तर या ग्रहाचा जप करण्यापूर्वी १०८ वेळां प्रणवाचा उच्चार करावा आणि मगच या ग्रहाचा जप करावा. प्रणवाच्या जपानें बुद्धीला अधिक चैतन्य प्राप्त होतें आणि दुर्योगी साथ असतांना सुद्धां तो अधिक बलवान ठरून चांगले फल देण्यास समर्थ ठरतो. अर्थात या जपाच्या वेळीं शक्यतो योग पाहावा.

महर्षि व्यासांनी बुधाच्या जपासाठीं जो श्लोक ग्रथित केला आहे तो खालीलप्रमाणें आहे.

**प्रियंगुकलिकाश्यामं रूपेणाप्रतिमं बुधम् ।**
**सौम्यं सौम्यगुणोपेतं तं बुधं प्रणमाम्यहम् ॥**

या श्लोकावरून बुधाचें चारित्र्य आपोआप ज्ञात होईल. त्याप्रमाणेंच त्याचें फल देखील काय स्वरूपाचें आहे याचेंही ज्ञान होईल. या ग्रहाचा जप केवळ चार हजारच करावयाचा असतो. तेवढ्या जपाने तो ग्रह अनिष्ट असेल तर त्याची तीव्रता कमी होते आणि इष्ट कार्यांत येणारे अडथळे कमी होतात. या ग्रहाचा जप करण्याच्या पद्धती खालील प्रमाणें आहेत.

१ रोज पांचशें प्रमाणें आठ दिवसांत.

२ रोज एकशें आठ प्रमाणें चाळीस दिवसांत.

पैकीं पहिला प्रकार अत्यंत श्रेष्ठ मानण्यांत आला आहे. बुध हा अत्यंत सोंवळा ग्रह असल्यानें या ग्रहाच्या जपाच्या वेळीं खूप शुद्धता पाळावी लागते. या जपाचें फळ लवकर प्राप्त व्हावें असें वाटत असेल तर अशोक वृक्षाच्या छायेत बसून याचा जप करावा. साधकांचे मुख पूर्वेस असावे. पीतांबर धारण करून सूर्योदयाच्या पूर्वी २४ मिनिटे हा जप संपवावा किंवा सूर्यास्तानंतर २४ मिनिटांनी या जपाला प्रारंभ करून

यथाशक्ति संकल्पित जप पूर्ण करावा. सूर्य असतांना मात्र या ग्रहाचा जप करूं नये. जपाच्या वेळीं आसन म्हणून लोकरीच्या आसनाचा उपयोग करावा. अशोक वृक्षाचे सांनिध्य मिळाले नाही तर मस्तकीं आकाश येईल अशा तऱ्हेने उघड्यावर बसून हा जप करावा.

## जपाचा विनियोग

बुद्धिनिष्ठ कार्यांत ज्यावेळीं कोणताही मार्ग उपलब्ध होत नाही तेव्हां या ग्रहाच्या जपाचा विनियोग करावा. मार्ग निश्चितपणे सांपडतो. ज्या वेळीं लहान मुलामध्ये बुद्धीची प्रमाणशीर वाढ होत नाही असे दिसून येते तेव्हां या जपाचे पाणी त्याला द्यावे. जप करतांना आपल्या मुखापुढे तांब्यांच्या भांड्यांत पाणी ठेवावे. रोज १०८ प्रमाणे जप करावा आणि त्यावेळीं आपली नजर त्या भांड्यांतील पाण्याकडे ठेवावी.४०० दिवसांत या मंत्राचा चांगला गुण आल्याचे समजून येते. कांहीं ठिकाणीं सौंदर्य किंवा शरीरसौष्ठव प्राप्त व्हावे म्हणून देखील हा जप करावा असे सांगण्यांत आलें आहे.

## गुरु

सूर्यमालेत नांवाप्रमाणेंच हा सर्वांत मोठा ग्रह आहे. साधारणपणें पृथ्वीच्या १३००पट हा मोठा आहे. त्याप्रमाणेच हा स्वयंप्रकाशित असावा असें वाटावें इतका त्याचा प्रकाश मोठा आहे. देवांचे गुरुत्व किंवा धुरिणत्व गुरुकडे असल्याने त्याच नांवाने त्याचा सदैव गौरव सर्व पुराणा-तून केला आहे. गुरु हा ग्रह अत्यंत शुभ करणारा अशी त्याची ख्याती आहे. असें म्हणतात एखादे वेळीं गुरु चांगले करणार नाही परंतु वाईट मात्र खात्रीने करीत नाहीं. गुरूची सर्व फळे इष्ट असल्याने अगदी लहानशा उपासनेनें देखील तो फलदायक ठरतो. पृथ्वीवर जे अत्यंत तेजोमय पदार्थ आहेत त्यांचा तो स्वामी आहे असे मानण्यात येते.

पृथ्वीवरील औषधी वनस्पतीमध्यें असणारे गुण गुरु आणि चंद्र यांच्या सांनिध्याने अधिक तीव्रतर होतात असा सिद्धांत आहे. चंद्रामुळें वनस्पती पुष्ट बनतात तर गुरुमुळें त्या वनस्पतीतील औषधी गुणांचा उत्कर्ष होतो. विशेषतः चंद्र, सूर्य आणि गुरु हे पुष्य नक्षत्रीं एकत्र आल्यास महान संपत्तीचा लाभ गुरुमुळें होऊं शकतो. त्याचप्रमाणे हाच योग अश्विनी नक्षत्रावर आल्यास सर्वत्र निरोगिता नांदविण्यासाठीं या ग्रहाच्या मंत्राचा विनियोग करण्यांत येतो. गुरु हा मूळचाच शुभ ग्रह असल्याने इतर अनिष्ट ग्रहांबरोबर त्याचा संयोग आल्यास अनिष्टतेची तीव्रता कमी करण्यास त्याचा विनियोग करतात. गुरुच्या फळाबाबत पूर्वीच्या लोकांनी फारच चांगले अनुभव ग्रथित केलेले आहेत. त्यावरून कोणत्याही शुभ कार्याला गुरुबलाची आवश्यकता असते. तसें तें नसेल तर तें निर्माण करण्यासाठीं गुरुची उपासना स्वतंत्रपणे करावी असें सांगण्यात आले आहे. विशेषतः लग्न आणि उपनयन यांसारखे महत्त्वाचे विधी गुरुबला-शिवाय पार पडू शकत नाहींत. त्या एका कारणासाठी कार्ये वर्षा वर्षाच्या अंतराने सुद्धां पुढें ढकलावीं लागतात. यावरून ही कल्पना येईल कीं गुरुचे मानवी व्यवहांत फार मोठे स्थान आहे. चंद्र आणि सूर्य यांच्या खालोखाल ग्रहमालेंत गुरुलाच मान देण्यात येतो याचे कारण देखील असेंच असावें. मानवी शरीराचा विचार करतां चिंतन नांवाच्या प्रक्रियेवर गुरुचे नियंत्रण आहे. चिंतनामुळेंच आयुष्यांतील फार मोठे प्रश्न निर्णायक स्थितीला आणतां येतात. अर्थात गुरुचे पृथ्वीवरील प्राण्यांवर असणारे आकर्षण या सर्वांचा पाया आहे हें विसरून चालणार नाहीं. ज्या मानाने तें आकर्षण कमी जास्त प्रमाणांत असेल त्या मानाने त्या वस्तूचे आयुर्मान आणि सौंदर्य वाढत जाते. आध्यात्मिक उन्नत्तीसाठी अन्य कोणत्याही ग्रहांपेक्षा गुरुचे सामर्थ्य अधिक असावे लागते. तरच त्याची त्या मार्गात चांगली उन्नत्ती होते. अन्यथा त्या मार्गात विविध अडथळे निर्माण होतात.

पुरुषांनी अंगावर घालावयाचे दागिने करण्यासाठीं खरेदी करावयाचे सोने गुरूच्या शुभ योगाखेरीज केले जात नसे. इतकी गुरुबद्दल मानवाची भक्ती डोळस होती. ज्यावेळी अशा प्रकारचे गुरुचे सामर्थ्य नसेल तेव्हां मंत्राने तें प्राप्त व्हावे या महत्तम हेतूनी व्यासांनी आपल्या नवग्रह स्तोत्रांत गुरुचा मंत्र म्हणून एक श्लोक समाविष्ट केला आहे. तो श्लोक असा—

**देवानां च ऋषीणां च गुरुं काञ्चनसन्निभम् ।**
**बुद्धिभूतं त्रिलोकेशं तं नमामि बृहस्पतिम् ॥**

गुरुच्या आकाराप्रमाणें किंवा कीर्तिप्रभावाप्रमाणे त्याची जपसंख्या देखील अशीच मोठी आहे. एकूण जपसंख्या १९,००० आहे. ही संख्या पूर्ण होईपर्यंत नित्य जप करण्याच्या ज्या पद्धती आहेत त्या खाली दिल्या

१) रोज १,००० प्रमाणें १९ दिवसांत एक मण्डल पूर्ण करणें.
२) रोज ५०० ,, ३८ दिवसांत ,,
३) रोज १०८ ,, ६ महिने दहा दिवस ,,

यांत पहिला प्रकार सर्वोत श्रेष्ठ मानण्यांत येतो. या ग्रहाचा जप करतांना इतर कोणत्याही ग्रहापेक्षां शुचितेचा विचार अधिक करावा लागतो. विशेषतः जन्म-मरण-अशौच, स्त्रियांची नैसर्गिक अडचण, अशिष्ट आहार-पान केले असल्यास तो दिवस, हे सर्व काळ वर्ज्य म्हणून समजावेत.

या मंत्राची साधना करतांना प्रारंभ गुरुवारीं आणि ज्यावेळीं अश्विनी, मृग, श्रवण, पुनर्वसु, पुष्य, स्वाती या सहा नक्षत्रीं चंद्र असतानाच करावी. त्याचप्रमाणे मासांमध्ये सुद्धां चैत्र, आश्विन, मार्गशीर्ष, हे मास अधिक चांगले याप्रमाणे गुरु आकाशांत असतांना जप करणे श्रेयस्कर; परंतु कांहीं वेळां तसा तो काळ साधला नाहीं तर सूर्योदयापूर्वी या मंत्राचा जप करावा. जपाचे वेळीं अंगावर पांढरे कपडे, मस्तकी गंध अथवा भस्म, आणि समोर नीरांजन लावून ठेवलेले असावे. या नीरांजना-

कडे पाहून जप करावा. जप संपेपर्यंत नीरांजन विझणार नाही याची दक्षता घ्यावी. नीरांजन नसेल तर उदबत्ती चालेल. परंतु ती फार उग्र वासाची नको. त्या उदबत्तीच्या तेजपूर्ण भागाकडे पाहून मंत्र जपावा. हा जप म्हणण्यापूर्वी १५ वेळां ॐकाराचा जप कंठाने करावा; आणि त्यानंतर या जपास प्रारंभ करावा. हा जप जितका एकाग्र चित्ताने म्हणतां येईल तितका त्याचा फायदा अधिक होईल. जप पूर्ण होईपर्यंत मध्ये कोणतेही विघ्न आले तरी त्याचा विचार करूं नये. ही सूचना साधकांनीं मुद्दाम लक्षांत ठेवावी.

या जपाचा विनियोग अनेक कारणांसाठीं होतो. विशेषतः मंद बुद्धीच्या मुलांनीं याचा जप अवश्य करावा. त्याचप्रमाणे ज्यांना बुद्धीचे काम अधिक आहे त्यांनीं या जपाचा अवलंब केल्यास त्यांच्या बुद्धीला येणारा ताण कमी होईल. बुद्धी अखेरपर्यंत तीव्र राहील.

अध्यात्माचा मार्गात ज्यावेळीं कांहीं प्रगती होत नाही असे वाटते किंवा अनेक अडथळे येण्यास प्रारंभ होतो तेव्हां गुरुच्या जपाने असे अडथळे हळूंहळूं कमी होतात. संसारीं अथवा परमार्थीं घ्यावे लागणारे निर्णय हे नेहमी अचूक असावे लागतात. त्याबरोबर ते निर्णय मिळण्यासाठीं दीर्घ काळही लागतां कामा नये. या दोन्ही गोष्टी त्वरेने आणि अचूकपणे साधकाच्या हातीं देण्यांत गुरूच्या जपाचा फार मोठा वाटा आहे.

सूर्य अश्विनी नक्षत्रावर असतांना केलेला जप आरोग्य देतो, श्रवण नक्षत्रावर विद्या, पुष्य आणि पुनर्वसु नक्षत्रावर धन आणि मृग नक्षत्रावर कोणत्याही कार्याची सांगतां शुचिपूर्ण आणि निर्विघ्नपणे होते.

## शुक्र

शुक्र हा सूर्यमालेतील महत्वाचा ग्रह आहे. सूर्योदयाच्या पूर्वी साधारणपणे एक प्रहर ( तीन तास ) याचा उदय होतो. शुक्राचा उदय

झाला म्हणजे रात्रीं पृथ्वीवर वावरणारे राक्षस दडून बसतात. कारण शुक्र दानवाचे गुरु आहेत असे सांगण्यांत येते. शुक्राचा उदय ही साधकांची प्रभात होय. योगी आणि अन्य उपासक शुक्रोदयाबरोबर जागे होऊन आपल्या साधनेला प्रारंभ करतात. या वेळीं केलेल्या साधनेत येणारे अडथळे शुक्राच्या अस्तित्वामुळे पूर्ण नाहीसे होतात. अर्थात या सर्वाला कारण म्हणजे शुक्राजवळ असलेली संजीवन विद्या. त्या विद्येच्या योगाने प्रत्येकाला जीवित प्राप्त करून देणे हा त्यांचा प्रमुख हेतु होता. त्या विद्येची साधना उत्तम प्रकारे शुक्राने केली परंतु त्याचा उत्तम प्रकारचा विनियोग मात्र त्याला करतां आला नाही. दानवांच्या जीवितासाठी त्याने या विद्येचा उपयोग केला. आजच्या भाषेत बोलायचें तर आसुरी संपत्तीच्या प्रस्थापनेसाठीं त्यानें उपयोग केला. धन–दौलत, स्थावर, शरीर आणि पशुसंग्रह यांचा समावेश आसुरी संपत्तींत होतो. केवळ अविचारपूर्वक दूरदृष्टीच्या पूर्ण अभावानें ऐहिक सुखराशीचा स्वामी बनणें हे आसुरी संपत्तीचे दृश्य फळ आहे. देवगुरु म्हणून आपल्या अप्रतिहत संजीवनी विद्येचा उपयोग करून त्यांनीं या आसुरी संपत्तीचा पगडा या जगांत बसविला. दैवी संपत्तीवर कांहीं काळ आवरण देखील पडले. परंतु ते आवरण दूर सारण्याचें कार्य हे दैवी संपत्तीच्या चाहत्याचे म्हणजे देवाचे असते. देवेंद्राने तिच्या रक्षणासाठीं शुक्राजवळ असलेली संजीवनी हरण करण्याचा कचाच्या मार्फत प्रयत्न केला परंतु त्यामुळे त्याची सर्व इच्छा पूर्ण मात्र झालेली नाहीं. शुक्राचार्यांच्या जवळच्या आसुरी संपत्तीच्या वैभवाचे पवाडे कमी व्हावेत म्हणून त्या कचाने केलेले प्रयत्न वाया गेले असे नव्हे परंतु त्या विद्येची शकले झाली आणि त्या विद्येचा उपयोग पुढे देव अथवा दानव यांपैकीं कोणालाच होत नाहीसा झाला. परंतु आसुरी संपत्तीचा लौकिक स्वामी जो बळी त्याला पूर्णपणें नाहीसे करून भगवान् विष्णूने ज्यावेळीं दैवी

संपत्तीची पुन्हा प्रतिष्ठापना केली तेव्हांच आसुरी संपत्तीचा पगडा अनेक वर्षे कमी झाला. शुक्राचार्य आपल्या असामान्य तेजानें तळपूं लागले. सूर्याशीं स्पर्धा करण्याचा त्यांनी अयशस्वी प्रयत्न केला तरी पण सूर्याच्या पूर्वी आपलें दर्शन या जगाला घडावे म्हणून शुक्र प्रथम उगवतो आणि सूर्य नंतर. देव आणि दानवाचे वैर शुक्र विसरलेला नाही. त्यामुळेच जन्म लग्न कुण्डलीत उच्चस्थानी असलेला शुक्र ऐहिक वैभवाची खैरात करतो. कारण ऐहिक वैभव देवत्वाची प्राप्ती करून देंत नाही तर उलट तेच देव मार्गातील एक अडथळा म्हणून ठरते. अर्थात शुक्राचे आधिपत्य नसेल तर मनुष्य देवमार्गाला त्वरेने जाण्याची शक्यता प्राप्त होते. गुरु दैवी वैभव प्राप्त करून देतो. दोन्ही ग्रह जर बऱ्या ठिकाणी एकत्र असतील तर दोन्ही वैभवाची प्राप्ती होते. परंतु अखेर विजय मात्र गुरूचाच होतो. अशी अनेक उदाहरणें आहेत. यावरून हे स्पष्ट होईल कीं प्रस्तुतच्या कनककामिनीला अग्रिमत्व देणाऱ्या जगाला शुक्राची उपासना खात्रीने फलद्रूप ठरेल. मात्र या उपासनेबरोबर चंद्राची उपासना केली तर अवाढव्य वैभव प्राप्त झाल्यावर सुद्धां मन चंचल न बनतां स्वस्थ राहूं शकते. याचा विचार करूनच शुक्राची उपासना एकाकी न करतां दुसऱ्या ग्रहाच्या बरोबर करण्याचा एक प्रकार रूढ आहे. शुक्राचा पौराणिक मंत्र खालील प्रमाणे आहे.

**हिमकुन्दमृणालाभं दैत्यानां परमं गुरुम् ।**
**सर्व शास्त्रप्रवक्तारं भार्गवं प्रणमाम्यहम् ॥**

या श्लोकांत महर्षी व्यासांनीं शुक्राचे श्रेष्ठत्व प्रतिपादन केले आहे. यावरून सहज कल्पना येवूं शकेल कीं शुक्र हा कशाचा किंवा कोणत्या वैभवाचा स्वामी आहे. त्याच्याजवळ जें आहे तो ते साधकाला, त्याच्या आवडत्या उपासकाला अगदी सहजपणें आणि उदार बुद्धीने देतो. अर्थात घेतांना साधकाला मात्र सावध असावें लागतें. कारण

मिळालेल्या वैभवानें साधक मत्त होण्याची साधार भीती नेहमीच त्याला असते. मत्त झाल्यास त्या साधकाला शुक्र व्यसनांचा अधिपती करण्यास मागेंपुढें पाहात नाहीं. त्यामुळें चांगल्या उपासकाचें सुद्धां फार मोठे लौकिक नुकसान होण्याची शक्यता असते.

या जपाची संख्या एकूण १६००० असून तो जप पूर्ण करण्याच्या पद्धती खालीलप्रमाणे अस्तित्वात आहेत. या मंत्राचा एकूण जप सोळा हजार केला म्हणजे एक मंडळ पूर्ण होतें. या प्रमाणें १६ मंडळे केली असतां कितीही अवघड कला किंवा लौकिक वैभव सुलभ होतें. या जपाच्या प्रमुख अशा दोनच पद्धती आहेत.

१) रोज १००० प्रमाणे १६ दिवसांत एक मंडळ किंवा.

३) रोज १०८ प्रमाणे १६० दिवसांत एक मंडळ.

स्त्रियांचा बाबतींत दुसरा पर्याय प्रमुख आहे तर पुरुषांच्या बाबतींत पहिला प्रमुख आहे.

हा जप करण्याची सर्वांत चांगली वेळ म्हणजे शुक्रोदयाची. शुक्र पहाटे पहिल्या प्रहरीं म्हणजे ३–३० च्या सुमारास उगवतो. त्यावेळीं परंतु अरुणोदय होण्याच्यापूर्वी हा काळ या जपाला अतिशय चांगला काळ म्हणून गणला आहे. सूर्योदयानंतर जप करावयाचा असेल तर सूर्याचा मंत्र १२ वेळां, किंवा गायत्री मंत्र १० वेळां म्हणवा म्हणजे शुक्राचे फळ देण्यास सूर्याचा अडथळा होणार नाही. अर्थात शुक्रोदयाचा काळ नेहमी बदलत असतो. त्याची दखल घेणे हे आवश्यक आहे. शुक्र अस्तं-गत नाहीं असे पाहूनच हा जप करावा; किंवा त्याप्रमाणे जपाची मर्यादा ठरवून घ्यावी.

साधकाने या जपाच्या वेळी पांढरी शुभ्र वस्त्रे, मौल्यवान वस्त्रे अथवा दागिने अंगावर घालावेत. विशेषतः हिरा जर दागिन्यांत असेल

तर अधिक उत्तम. अत्यंत मऊ अशा आसनावर बसून हा जप करावा. जप पूर्ण होताच तो शुक्राला अर्पण करावा आणि त्याच्या फळासाठीं मनापासून प्रार्थना करावी. तुपांत तयार केलेल्या पांढऱ्या पदार्थांचा नैवेद्य शुक्राला प्रिय आहे. तो समर्पण करावा आणि प्रसाद म्हणून साधकाने तो भक्षण करावा.

या जपांचा उपयोग विशेषे करून कलावंताना विशेष होतो. गायन नाट्य वगैरे सारख्या कला शुक्राच्या प्रसादाने साध्य होतात. पण त्या-बरोबरच ऐषारामाकडे आणि व्यसनाकडे वृत्तीची धांव जाण्याची शक्यता असते. शुक्राच्या प्रसादाने मिळालेली कला नेहमी चिरंजीव होते. परंतु तिला व्यसनाचा वारा लागताच त्या साधककलाकाराची दुर्दशा होते. त्याचे आयुष्यही संपुष्टांत येते.

ज्यांना पुत्र संतती होत नसेल किंवा मुलींच संतती होत नसेल त्यासाठी शुक्राची उपासना निश्चितच परिणामकारक ठरते. मात्र ती कशी करावी ते ज्ञात्या माणसाकडून समजावून घ्यावे.

स्त्रियांच्या मासिकधर्मात निर्माण होणारे अडथळे या ग्रहाच्या जपाने कमी होतात.

सौंदर्यलाभ, चपलता आणि कृश प्रकृती होण्यासाठीं याचा जप महत्वाचा मानला जातो.

अध्यात्ममार्गात शुक्राच्या विशेष अवस्थेमध्ये अडथळे निर्माण होतात. अर्थात त्याच्याच उपासनेने ते नाहीसे होतात. याहीपेक्षां म्हणजे हिरा आणि पुष्कराज यांची संयुक्त अंगठी या मंत्राने मंत्रून घेऊन हाती धारण करावी. त्यामुळे अध्यात्मांत चांगली प्रगती होते.

**शनि**

शनि हा सूर्यपुत्र असून मागे सांगितल्याप्रमाणें सूर्याच्या अन्यतर गुणांचा तो एक आविष्कार आहे. सूर्याचे कोणतेही गुण शनिमध्यें नाहींत..

पिता आणि पुत्र यांचे सख्य देखील नाहीं. त्यामुळे शनीची उपासना ही एक वेगळया प्रकारची उपासना आहे. ज्योतिष शास्त्राच्या दृष्टीतून विचार करतां अत्यंत मन्द गतीने चालणारा, निळया वर्णाचा आणि अत्यंत उशीरा फळ देणारा असा हा ग्रह आहे. एका राशींत तो अडीच वर्षे असतो. ज्या राशींत तो असेल त्या मागच्या एक आणि पुढच्या एका राशीला त्याचा त्रास नेहमी संभवत असतो. हा एकूण काळ साडेसात वर्षांचा असतो. त्यावरूनच साडेसाती हा शब्द रूढ झाला आहे. साधारण माणसाचा असाच समज आहे कीं, साडेसाती म्हणजे नुकसान त्रास, संकटे वगैरे. परंतु शनीची ही एक बाजू झाली. त्याची वाईटा-बरोबर एक चांगली बाजू आहे आणि ती म्हणजे तो एखादे वेळीं कृपाळू झालाच तर लौकिक ऐश्वर्याची खैरात करतो. नको इतकें ऐश्वर्य तो देतो. अर्थात ते सर्व वैभव देण्याचा त्याचा मार्ग चांगलाच असेल असे मात्र नाहीं. कारण अनेकविध कृतींचा तो स्वामी आहे. त्यामुळे त्याची कृती कधी चांगली तर कधी वाईट ठरत असते. कुंडलीचा विचार करतां तो ज्या स्थानीं असतो त्या स्थानी तो त्रास देतो. पण ज्या स्थानीं पाहातो त्या ठिकाणचें भले करतो. त्यामुळें शनीचे अस्तित्व जरी नकोसे असले तरी त्याच्या दृष्टीचे सानिध्य मात्र असावे असे ज्ञानी माणसाला सुद्धां वाटते. त्यामुळेच कित्येक प्रसंगीं त्याची साडेसाती लाभदायक ठरते अर्थात शनीच्या साडेसातीचा त्रास होऊं नये म्हणून दोन महत्त्वाचे उपाय आहेत. एक शनीला ज्याचा धाक आहे अशा हनुमंताची उपासना करून शनीला नेहमी धाकांत ठेवणे किंवा त्याची कृपा संपादन करणे. त्याला धाकांत ठेवण्यासाठीं श्रीसमर्थ रामदासस्वामींनी लिहिलेले भीमरूपी स्तोत्र किंवा मारुती स्तोत्र याचा प्रयोग अभिप्रेत आहे. पण त्याला कृपाळू बनविण्यासाठीं मात्र मंत्राचा उपयोग करावा लागतो. तो मंत्र महर्षि व्यासांनीं आपल्या स्तोत्रांत खालील प्रमाणे ग्रथित केला आहे.

नीलांजनसमाभासं रविपुत्रं यमाग्रजम् ।
छायामार्तण्डसम्भूतं तं नमामि शनैश्वरम् ॥

या श्लोकांत याचे वर्णन आहे. तरीपण या श्लोकांतील अक्षरे मात्र मंत्राप्रमाणे प्रभावी आहेत. ज्यांना साडेसाती आहे त्यांनी शनीची कृपा संपादन करण्यासाठीं या मंत्राचा प्रयोग करावा. अंगाला आंवळा व तीळ यांचे मिश्रण लावून स्नान करावें. शनीच्या प्रतिमेची पूजा करावी. ही प्रतिमा घोड्याच्या सांपडलेल्या नालाची करावी. विशेषतः शनिवार, अमावस्या आणि श्रवण, मृग, अश्विनीं किंवा हस्त ह्या नक्षत्रावर तो आपोआप मिळाला तर फारच उत्तम. त्या नालाची शनीची प्रतिमा करावी. कुंभ घेवून त्यावर त्याची स्थापना करावी. यथासांग पूजा करून गोड्यातेलाचा अभिषेक करावा. त्यानंतर या जपाचा तेवीस हजार जप करावा. हा जप तीन प्रकारें करतां येतो. सर्वोत्तम प्रकार म्हणजे १०८ ची एक याप्रमाणे ३२ आवृत्त्या करून सात दिवसांत जप पूर्ण करणे. दुसरा प्रकार रोज एक हजार प्रमाणे तेवीस दिवसांत पूर्णविणे किंवा रोज १०८ प्रमाणे सात महिने वीस दिवसांत संपविणे. मात्र या जपासाठीं जागा एकच असावी. या जपाची सुरवात नेहमी शनिवारी करावीं. इतर जपांना जीं पथ्यें सांभाळावीं लागतात तीं सर्वच या जपाच्या बाबतीत सुद्धां सांभाळावी लागतात. मात्र जोपर्यंत शनीचा जप चालू आहे तोपर्यंत काळे वस्त्र नेसूं नये आणि तेलांत तळलेले पदार्थ भक्षण करूं नयेत.

**राहू**

राहू हा एक महत्वाचा ग्रह आहे. त्याच्याबरोबर केतू या ग्रहाचा देखील विचार करावा लागतो. पूर्वी अमृतासाठी देवांनीं क्षीरसागराचं मंथन केलं. त्यातून निर्माण झालेल्या अमृताची वाटणी भगवान् विष्णूनीं मोहिनीचे मोहक रुप धारण करून केली. अमृत आपणांस मिळावें म्हणून एक दैत्य देवाचें रुप घेवून देवांच्या पंक्तींत येवून बसला. ही गोष्ट चंद्र-

सूर्यांच्या लक्षांत आली तेव्हां मोहिनी स्वरूपांतील भगवान् विष्णूंना ते कळविले. पण त्यापूर्वी त्याच्या द्रोणांत अमृत पडले होते. अमृत पिण्यास प्रारंभ करतांच विष्णूनें आपल्या सुदर्शन चक्राने त्या दानवाचा कंठभेद केला. त्यावेळी अमृत कंठात उतरत होते तेंही निम्मानिम झाले. दैत्याचे मस्तक धडावेगळे झाले. पण धड आणि मस्तक दोन्ही सजीव राहिली. पैकी धडाला राहू आणि मस्तकाला केतू अशी संज्ञा प्राप्त झाली. तेव्हांपासून चंद्रसूर्य यांचे हे दोघेही वैरी बनले. त्यांना ग्रासून पृथ्वीवर अमंगलत्व निर्माण करण्याचे कार्य हे दोघेही करतात. या अवस्थेला ग्रहण असे म्हणतात. अर्थात त्यांच्या स्वभावाप्रमाणे त्यांची फळे क्रूर आहेत. मात्र कित्येक वेळीं अन्य शुभग्रहांच्या मदतीनें ते शुभफळ देखील देतात. परंतु असे प्रसंग फारच थोडे. हे दोन्ही ग्रह जपाने शांत होऊन निदान स्वस्थ होतात. साधकाला त्यांनी चांगले फळ जरी दिले नाही तरी वाईट फळ ते देत नाहीत. इतकाच यांच्या जपाचा मुख्यत्वेकरून उपयोग होतो. त्यांचे मंत्र आणि जपसंख्या खालीं दिली आहे. त्याप्रमाणेच जप करावा.

**अर्धकायं महावीर्यं चंद्रादित्यविमर्दनम् ।**
**सिंहिकागर्भसंभूतं तं राहुं प्रणमाम्यहम् ॥**

याचा जप एकूण १८००० करावयाचा असतो. हा जप एकूण एकतीस दिवसांत रोज नियमित करून पूर्ण करावा.

**केतु**

**पलाशपुष्पसंकाशं तारकाग्रहमस्तकम् ।**
**रौद्रं रौद्रात्मकं घोरं तं केतुं प्रणमाम्यहम् ॥**

या श्लोकाचा जप १७००० आहे हा जप देखील अठ्ठावीस दिवसात पूर्ण करावा.

या जपाची सुरवात कोणत्याही दिवशीं केली तरी चालेल. मात्र रात्रीं हा जप करूं नये. सूर्य अथवा चंद्र ग्रहणाच्या काळांत या दोघांच्या

जपाचा प्रयोग अतिशय चांगले फळ देणारा ठरतो. ग्रहणांत प्रारंभी स्नान करून न मोजतां हा जप करावा. ग्रहणकाल संपेपर्यंत पाण्यांत उभे राहून किंवा घरात गवताच्या आसनावर बसून याचा जप करावा. संभाव्य शारीरिक विकृती या जपाने नाहीशी होते किंवा तिची तीव्रता तरी कमी होते.

या ग्रहांचा ज्याप्रमाणें आपण विचार केला त्याप्रमाणें ज्या पृथ्वीवर आपण यावरतो त्या पृथ्वीचा पण विचार केला पाहिजे. कारण पृथ्वी हा देखील एक असाच महत्वाचा ग्रह आहे. त्या ग्रहाचे परिणाम देखील मानवी जीवनावर नेहमीच होत असतात. आपले नित्याचे राहाण्याचे ठिकाण सोडून आपण अन्य देशांस गेलों तर तेथील जमीन, तिचा वर्ण, गंध, तिच्या भोवताली असलेली आर्द्रता, पाणी आणि वनस्पती वगैरे अनेक गोष्टींचा मानवावर होणारा परिणाम आपणां सर्वांना माहीत आहे. परंतु त्या पृथ्वीचे अस्तित्व पूर्णपणे विसरले जाते. त्यामुळे पृथ्वीचे जे परिणाम आहेत त्या परिणामांची नोंद आपण लक्षांत घेत नाही. त्यामुळे त्या परिणामाबरोबर अन्य ग्रहांचे परिणाम देखील आपणांस पूर्णपणे टिपतां येत नाहींत. त्यामुळे साधक या ग्रहांच्या परिणामाबद्दल कित्येक वेळीं साशंक होतो, आणि त्याच्या उपासनेत खण्ड पडतो. असा खण्ड पडूं नये म्हणून विशेष काळजी घ्यावी लागते. यासाठी या ग्रहांच्या जपाच्या वेळीं पृथ्वीची प्रार्थना करणें अगत्याचें आहे. ज्या पृथ्वीवर बसावयाचे तें तर आसन आहे. त्यामुळे त्याची शुद्धता करणे या उपासनेच्या बाबतीत महत्त्वाचे समजले जाते. त्यासाठीं या मंत्रजपाला प्रारंभ करण्यापूर्वी जमिनीवर पाणी शिंपडावें आणि त्यावेळीं खालील मंत्र म्हणावा.

**पृथ्वि त्वया धृता लोकाः देवि त्वं विष्णुना धृता ।**
**त्वं च धारय मां देवि पवित्रं कुरु चासनम् ॥**

पृथ्वीला वन्दन करावे आणि मग त्यावर आसन घालावे. या आसनांत मृगाजिन, दर्भासन, धूतवस्त्र, कांबळे याचा समावेश असावा. पाट मात्र घेवू नये. याप्रमाणे बैठकीवर बसल्यावर आपले आई वडील, गुरु आणि अन्य ज्येष्ठ यांना वंदन करून मग जपास सुरवात करावी.

या सर्व ग्रहांच्या एकूण जपाची संख्या फार मोठी आहे. परंतु संपूर्ण नवग्रहस्तोत्राचे १५००० पाठ केले कीं संपूर्ण स्तोत्राचे पुरश्चरण घडते. हे पुरश्चरण पाठ करण्याचे अनेक प्रकार आहेत. परंतु त्यातला अत्यंत सोपा असा प्रकार म्हणजे रोज एकशे सदुसष्ट आवृत्त्या याप्रमाणें ९० दिवसांत तें म्हणणें. निदान रोज एकवेळ तरी या स्तोत्राचा पाठ आवश्यक आहे. तो न चुकतां केला तरी देखील सर्व समृद्धीचा लाभ होतो.

## जपपद्धतीची संकलित माहिती

| ग्रहाचे नांव | एकूण जपसंख्या | जपाच्या रोजच्या पद्धती | | |
|---|---|---|---|---|
| | | उत्तम | मध्यम | कनिष्ट |
| रवि | ७००० | १००० | ५०० | १०८ |
| चंद्र | ११००० | १००० | ५०० | १०८ |
| मंगळ | १७००० | १००० | ५०० | १०८ |
| बुध | ४००० | ५०० | १०८ | -- |
| गुरु | १९००० | १००० | ५०० | १०८ |
| शुक्र | १६००० | १००० | -- | १०८ |
| शनि | २३००० | ३४५६ | १००० | १०८ |
| राहू | १८००० | -- | ६०० | — |
| केतू | १७००० | -- | ६०८ | — |

# नवग्रहस्तोत्र

सूर्य— जपाकुसुमसंकाशं काश्यपेयं महाद्युतिम् ।
तमोऽरिं सर्वपापघ्नं प्रणतोऽस्मि दिवाकरम् ॥१॥

चंद्र— दधिशङ्खतुषाराभं क्षीरोदार्णवसम्भवम् ।
नमामि शशिनं सोमं शंभोर्मुकुटभूषणम् ॥२॥

मंगळ— धरणीगर्भसम्भूतं विद्युत्कान्तिसमप्रभम् ।
कुमारं शक्तिहस्तं तं मङ्गलं प्रणमाम्यहम् ॥३॥

बुध— प्रियङ्गुकलिकाश्यामं रूपेणाप्रतिमं बुधम् ।
सौम्यं सौम्यगुणोपेतं तं बुधं प्रणामाम्यहम् ॥४॥

गुरु— देवानां च ऋषीणां च गुरुं काञ्चनसंनिभम् ।
बुद्धिमन्तं त्रिलोकेशं तं नमामि बृहस्पतिम् ॥५॥

शुक्र— हिमकुन्दमृणालाभं दैत्यानां परमं गुरुम् ।
सर्वशास्त्रप्रवक्तारं भार्गवं प्रणमाम्यहम् ॥६॥

शनि— नीलाञ्जनसमाभासं रविपुत्रं यमाग्रजम् ।
छायामार्तण्डसंभूतं तं नमाभि शनैश्वरम् ॥७॥

राहु— अर्धकायं महावीर्यं चन्द्रादित्यविमर्दनम् ।
सिंहिकागर्भसंभूतं तं राहुं प्रणमाम्यहम् ॥८॥

केतु— पलाशपुष्पसंकाशं तारकाग्रहमस्तकम् ।
रौद्रं रौद्रात्मकं घोरं तं केतुं प्रणमाम्यहम् ॥९॥

पाठ मर्यादा—इति व्यासमुखोद्गीतं यः पठेत्सुसमाहितः ।
दिवा वा यदि वा रात्रौ विघ्नशान्तिर्भविष्यति ॥१०॥

फलश्रुती—नरनारीनृपाणां च भवेत् दुःस्वप्ननाशनम् ।
ऐश्वर्यमतुलं तेषामारोग्यं पुष्टिवर्धनम् ॥११॥

ग्रहनक्षत्रजापीडास्तस्काराग्निसमुद्भवाः ।
ताः सर्वाः प्रशमं यान्ति व्यासो ब्रूते न संशयः ॥१२॥

इति श्रीव्यास विरचितं नवग्रहस्तोत्रं संपूर्णम् ॥

– समाप्त –

# परिमल प्रभाव :—

भारतीय मंत्रशास्त्र हा एक स्वतंत्र अभ्यासाचा विषय आहे. भारतीयांचे वेद आणि उपनिषदें म्हणजे मंत्रसागर आहे. त्यांतले सर्वच मंत्र अतिशय प्रभावी आहेत. अर्थात पूर्वीच्या काळीं चातुवर्ण्य–व्यवस्था अंमलात होती आणि त्याप्रमाणें वेद कोणी म्हणावेत, कोणी शिकवावेत, अगर कोणी केवळ ऐकावेत यांची बंधने काटेकोरेपणें पाळली जात होती. परंतु मानव म्हणून इथून तिथून सर्व सारखा. मग वेदाच्या बाबतीत असा पक्तिप्रपंच कां असा मुद्दा सहजच उपस्थित होतो. अर्थात त्याला उत्तर नाही असें नाहीं. परंतु सामान्य जनांच्या बुद्धीला पटेल असें याचें उत्तर देणें मात्र कठीण आहे. मंत्रांत जें सामर्थ्य आहे तें त्यांतून निर्माण होणाऱ्या ध्वनीला आहे. हा ध्वनी ज्या ठिकाणा-हून निर्माण होतो किंवा ज्या ठिकाणीं ऐकला जातो त्या त्या ठिकाणी त्याचे परिणाम घडतात. कित्येक वेळीं असा परिणाम ज्या वस्तूवर केला गेला आहे अशा वस्तूच्या सानिध्यानें सुद्धां मूळ मंत्राचे फरक जाणवतात असा अनुभव आहे. एखादा मनुष्य अंगारा, तांदूळ मंत्रून देतो. आणि त्याचा विनियोग कसा करावयाचा तें समजावून सांगतो. त्याप्रमाणें केलें असतां त्या मंत्राचा परिणाम दिसू लागतो. एक–दोन नव्हे तर असे अनेक अनुभव अनेकांना आले आहेत. याच प्रकारची आणखी एक सत्य स्थिति मी खालीं देत आहे.

एका गावांत एका लहान ७–८ वर्षाच्या मुलीला एकदां विंचू चावला. मंत्रानें विंचू उतरतो. परंतु या दिवशीं हा मांत्रिक त्या गांवांत

आलेला नव्हता. मुलगी तर सारखी टाहो फोडीत होती. एक क्षणभर देखील तिला स्वस्थता नव्हती. गांवच्या लोकांनी अखेर या मांत्रिकाकडे जाण्याचें ठरविलें. त्या गावच्या लोकांनी मांत्रिक त्याच्या गांवीं आहे किंवा नाही याची चौकशी करण्यासाठीं त्याच्या गावी फोन केला. त्यांच्या सुदैवाने तो गांवीं होता. तेव्हां गांवकऱ्यांनीं त्याला घडलेली हकीकत सांगितली आणि आम्ही मुलीला घेऊन तिकडे येतो आपण गावी असावें अशी विनंती केली. तेव्हां त्या मांत्रिकानें त्यांना सांगितलें कीं तुम्ही इकडे येऊं नका. ज्या मुलीला विंचू चावला आहे त्या मुलीच्या कानाला फोन लावा. मी काय म्हणतो तें तिला ऐकूं दे. मांत्रिकाच्या सांगण्याप्रमाणें त्या लोकांनी त्या मुलीच्या कानाला फोन लावला. मांत्रिकाने योग्य ते मंत्र म्हटले आणि आश्चर्य म्हणजे ते मंत्र त्या मुलीनें फोनवरून ऐकतांच तिची पीडा दूर झाली.

यावरून मंत्राचा प्रभाव कसा आणि किती लांबपर्यंत होतो याची कल्पना येईल. मंत्राच्या नादाचे हे परिणाम फारच आश्चर्य कारक आहेत. अशा तऱ्हेचे अनेक मंत्र अनेक प्रकारचा परिणाम करतात. विज्ञानशास्त्रानें देखील मंत्र ही एक उत्तम प्रक्रिया असून ती अत्यंत प्रभावी असल्याचें मान्य केलें आहे. विज्ञानशास्त्राचा परिणाम ज्या ठिकाणी जाऊन पोहोचत नाहीं अशा ठिकाणीं मंत्राचे प्रभाव चांगल्या प्रकारें जाणवतात.

मंत्र अनेक प्रकारचे आहेत आणि त्यांचे परिणामही त्यांच्या प्रमाणेंच अनेकविध आहेत. पण मंत्र म्हणजे काय? एक अगर अनेक अक्षरांचा समुदाय म्हणजे मंत्र ही मंत्राची व्याख्या चुकीची आहे. कारण ज्ञानेश्वरांनी सुद्धां ज्ञानेश्वरींत असेंच विचारलें आहे.

**अगा बावन्ना वर्णांपरता । कोण मंत्रु आहे पांडुसुता ॥**

बावन्न वर्णापेक्षां काहीं मंत्र निराळा नाहीं. म्हणून एकापाठोपाठ बावन्न वर्ण उच्चारले म्हणजे काहीं मंत्र उच्चारला असे होत नाहीं. तर त्यापेक्षां अधिक काहीं तरी मंत्रात खास आहे यांत शंका नाहीं. व्याकरणांत शब्द म्हणजे काय याची व्याख्या आपण अभ्यासली तर मंत्र म्हणजे काय हें कळणें सोपे ठरेल.

एक अगर एकापेक्षां अधिक अक्षरें एकत्र येऊन ज्या वेळीं त्याला काहीं विशिष्ट अर्थ प्राप्त होतो तेव्हा त्याला शब्द असे म्हणतात. केवळ एकापुढे एक वर्ण ठेवून काही शब्द होत नाहीं. तर त्याला विशिष्ट अर्थ आणि तो देखील शिष्टसम्मत असा अर्थ प्राप्त व्हावा लागतो. तरच त्याला शब्द ही संज्ञा प्राप्त होते. त्याचप्रमाणें मंत्र याची व्याख्या सुद्धा अशाच प्रकारें केली आहे. एक अक्षर अगर अक्षरांचा समुदाय, एक शब्द अगर शब्दांचा समुदाय यांना विशिष्ट तऱ्हेचा ध्वनी आणि अर्थ प्राप्त होतो तेव्हां त्याला मंत्र म्हणतात. मंत्र ध्वनी अनेक सिद्धपुरुषांच्या अनुभवाचा विषय असावा लागतो किंवा त्यांच्या अनुभवाचें शिक्कामोर्तब त्यावर झालें असलें पाहिजे. एक वेळ एखाद्या मंत्राच्या-शब्दाला-अर्थ असणार नाहीं पण भावार्थ अथवा परिणाम मात्र निश्चितपणें आहे. मंत्राचा ध्वनी हा महत्वाचा आहे. तो ध्वनी मूळचा जसा अभिप्रेत आहे तसाच तो मुखांतून आला पाहिजे. यावर अतीव कटाक्ष आहे आणि म्हणूनच मंत्र हे गुरुमुखांतूनच शिकावें लागतात. वेदांची पुस्तकें छापलेली आहेत. सर्व मंत्र देखील छापलेलें आहेत. परंतु ते आहेत तसे वाचून या मंत्रांचा प्रभाव गोचर होत नाहीं. मंत्र म्हणणें हें शास्त्र आहे. म्हणण्याची हातोटी माहीत नसेल तर ते उच्चारण फोल आहे.

**परी मंत्राची कडसणी । जंव नेणिजे कोदंडपाणी ।**
**तंव उच्चारफळ वाणी । न पवे जेवीं ॥ ज्ञाने १८-३७४॥**

या मंत्राचा यथार्थ ध्वनी निर्माण झाला नाहीं तर त्याचे परिणाम मात्र शून्य आहेत.

मंत्र सर्व भाषेत आणि सर्व धर्मांत आहेत. या मंत्रांच्या बाबतीत आचाराचें पथ्य फार पाळावे लागतें. ज्यांना ते पाळतां येत नाहीं त्यांनीं मंत्राच्या वाटेस जाऊं नये. त्यांतूनही दुराग्रहाने तो मंत्र उच्चारलाच तर त्याचे विपरीत परिणाम झाल्याविना राहात नाहींत. त्यामुळेच मंत्र कोणी म्हणावेत यावर बंधने घालण्यांत आली आणि ती योग्यही होती. या सर्व बंधनांचा विचार करूनही अनाधिकारानें जर कोणी ते मंत्र उच्चारलेच तर त्याला हरकत नव्हती. अन्यथा राक्षस-कुळांत जन्म पावलेल्या प्रल्हादाला किंवा बळीला वेदमंत्र म्हणणे योग्य ठरले नसतें. मंत्राचा प्रभाव एखाद्या वस्तूच्या मार्फत जें लोक पथ्य पाळत नाहींत त्यांच्यासाठीं निर्माण करण्यांत आला आहे. म्हणूनच मंत्राचे सामर्थ्य अशा लोकांना देखील ज्ञात झालेलें आहे. त्याचा ते उपयोगही करून घेतात आणि मंत्र म्हणणाऱ्याला जो परिणाम जाणवतो तो प्रभाव त्यांना देखील गोचर होतो.

कोणत्याही वस्तूवर या मंत्राच्या ध्वनीचा प्रभाव पाडतां येतो. त्याच प्रमाणें मानवी देहावर देखील अशा मंत्राचा प्रभाव पाडतां येतो. परंतु ज्या वेळीं अन्य वस्तूंखेरीज मानवीदेहावर त्याचा प्रभाव निर्माण होतो तेव्हां त्याला मंत्रकवच असें संबोधितात. अनेकविध मंत्रांच्या साह्यानें अशा तऱ्हेची कवचें मानवी देहावर निर्माण करता येतात. ही कवचें देखील अनेक प्रकारची असतात. कांही कवचे स्वसंरक्षक असतात तर कांही परिसर–संरक्षक अगर परिणाम–संरक्षक असतात. काहीं कवचें दुसऱ्याचे मंत्रप्रभाव उलट वहाविण्यास लावणारी असतात.

कवचांच्या नंतर स्तोत्रांचा क्रमांक लागतो. स्तोत्रें देखील अनेक देवतांची आणि अनेक प्रकारची आहेत. स्तोत्र म्हणजे केवळ त्या देवतेची स्तुती नव्हे. तर स्तुतीबरोबरच कवचाप्रमाणें तें स्तोत्र पठण करणाऱ्याच्या भोंवती संरक्षक आवरण निर्माण करण्याची त्यांत महान शक्ति असते. कांहीं स्तोत्रें अतिशय प्रभावी आहेत. त्यांचा परिणाम फारच लवकर होतो तर कांहीं स्तोत्रांचा परिणाम मंदगतीने होतो. यासाठी ही स्तोत्रें सिद्ध करावी लागतात. तरच त्यांचे परिणाम चांगल्या प्रकारें दृष्टीला येतात. प्रत्येक मंत्रांची सिद्धपद्धती निराळी आहे. त्याप्रमाणेंच स्तोत्रांची अथवा कवचांची देखील आहे. परंतु प्रत्येकांत फरक आहे. मंत्राची सिद्ध करण्याची पद्धत म्हणजे मंत्रात जितकी अक्षरें असतात तितकें लक्ष त्या मंत्राचा जप झाला म्हणजे तो मंत्र सिद्ध होतो. याच पद्धतीनें स्तोत्र देखील करावें लागते. अर्थात प्रत्येक स्तोत्राच्या सिद्धतेची पद्धती निराळी आहे. जी पद्धती स्तोत्रांची आहे तीच पद्धती कवचांच्या बाबतींत आहे. एकदां एखादा मंत्र अथवा स्तोत्र सिद्ध झालें म्हणजे केवळ एक वेळ उच्चारल्यानें त्याचे परिणाम दुसऱ्या व्यक्तीवर त्वरेनें होतात. इतकेंच नव्हे तर स्वतःच्या देहावर देखील त्याचे परिणाम उत्तम प्रकारे होतात. देहानंतर देहाचा परिसर त्यावरही त्याचा परिणाम घडतो आणि तो तो भाग शुद्ध होत जातो.

ज्योतिष शास्त्राच्या दृष्टीने विचार केला तर प्रत्येक मनुष्य जन्मास आल्याबरोबर त्यावेळीं आकाशांत असणाऱ्या ग्रहांचा एक आराखडा किंवा नकाशा तयार करण्यांत येतो, त्यालाच जन्म-कुंडली असें म्हणतात. कुण्डली म्हणजे स्वतः आणि स्वतःचा अन्य परिसर कसा असेल याचें एक गुह्यतम चित्र आहे. या कुण्डलीत एकूण बारा स्थानें आहेत. त्या बारा स्थानांची ओळख खाली दिली आहे.




यात्रमाणें स्वतःच्या भोंवतीचा हा पसारा कसा असतो तें सहजपणें लक्षांत येईल. प्रत्येक स्थान मंत्रानें, कवचानें अथवा स्तोत्रानें शुद्ध करतां येते. प्रत्येक मंत्राचें एक लाखाचें उच्चारण झालें कीं एक एक स्थान शुद्ध होतें. परंतु खरे पाहिलें असतां ही उक्ती केवळ गायत्री जपाच्या बाबतीतच सत्य आहे. अन्य जपांच्या बाबतीत एक कोटी जप केला म्हणजे एक एक स्थान शुद्ध होते. म्हणजेच त्या त्या स्थानाची बाह्य आणि अंतरिक शुद्धि त्वरेनें होते.

( १ ) **तनुस्थान**—एक कोटी जप झाला म्हणजे सर्व शरीर रोग-मुक्त होतें. बालपणाची कोंवळीक त्याला लाभते आणि तें मोहक बनतें. शारीरिक कोणताही भार सहन करण्याची शक्ति त्या देहाला प्राप्त होते. प्राणावर ताबा मिळवितां येतो इतकेच नव्हे तर देहांत निर्माण होणाऱ्या सर्व इच्छा वासना स्वतःच्या मनाप्रमाने वाकवितां येतात. वाणी शुद्ध होते. वाचासिद्धि देखील त्या साधकाला प्राप्त होते. मग ज्योतिषशास्त्र दृष्ट्या हें स्थान कितीही वाईट असो; अशा तऱ्हेच्या मंत्र जपाने तें संपूर्ण शुद्ध

बनवितां येते. देहाच्या जन्मानंतर मनुष्यगंध नांवाचा एक गंध माणसाच्या शरिरांत निर्माण होतो. या मनुष्यगंधाची शुद्धता तनुस्थानीं लाभते. वाघ, बोकड वगैरेंच्या शरीराला जसा एकप्रकारचा गंध असतो तसा मनुष्याला देखील असतो. भगवंताच्या पूजेच्या वेळीं हा मनुष्यगंध नाहीसा व्हावा म्हणून एक प्रक्रिया सांगितली आहे. ज्या मनुष्याचा हा गंध नाहीसा झाला त्याला अन्य माणसांच्या अंगाला येणारा वास तीव्रपणाने जाणवतो. हा गंध ज्याप्रमाणें या मंत्रानें जातो त्याप्रमाणें गुरु चरित्रांत कथन केलेल्या आचाराचा कांटेकोरपणे अवलंब केला तरीही नाहीसा होतो. ज्यावेळी हा मनुष्यगंध नाहीसा होतो तेव्हा त्याची जागा सुगंध घेतो. अशा माणसाच्या अंगाला नेहमी सुगंध येतो. इतकेच नव्हे तर अशा माणसाचा पार्थिव देह देखील अनेक दिवसपर्यंत न कुजतां अगदीं ताजा राहातो. अशा माणसानं स्पर्श केलेली वस्तू दोष रहित होते. स्वामी रामदासांनीं आपल्या मातेच्या डोळयांवरून आपला हात फिरवितांच त्या अंध मातेला दिव्य दृष्टी प्राप्त झाली आणि ती नारायणाचें खरें वैभव पाहूं शकली. ही ऐतिहासिक साक्ष सर्वांना विदित आहे.

२ ) **धनस्थान**–दोन कोटी जप झाल्यावर हे स्थान शुद्ध होते. हें स्थान शुद्ध होताच स्वतःची जी कांहीं स्थावर जंगम मालमत्ता असेल ती सुरक्षित होते. कर्जमुक्त होतां येतें. मूळच्या संपत्तीमध्यें वाढ होते.

३ ) **सहज किंवा पराक्रम स्थान**– आपल्या बांधवांशी असलेले सर्व संबंध जिव्हाळ्याचे बनतात. अमूक एक गोष्ट करावी अशी इच्छा झाल्यास ती नेहमी पूर्ण होते; आणि मनुष्य कीर्तीवान होतो.

४ ) **मातृस्थान**–चार कोटी जप पूर्ण झाला की हें स्थान शुद्ध होतें. या स्थानाच्या शुद्धतेबरोबर मातुल कुळ आणि माता यांना वैभवी स्थिती प्राप्त होते. मातुळ कुळाची आकिंचनता पूर्ण नाहीशी होते. शारीर

पीडा दूर होते. आयुष्यवृद्धि होते आणि त्यायोगे मातेचा अमोघ आणि समृद्ध असा आशीर्वाद प्राप्त होतो. या आशीर्वादाची आवश्यकता परमार्थपंथीयांना अतीव जरूरीची आहे. किंबहुना मातेचा आशीर्वाद मिळाला नाही तर परमार्थात होणारी प्रगती होणारच नाही. चार कोटीचा जप झाला म्हणजे मातृऋणांतून साधक अर्धा मुक्त होतो असें म्हणावयास हरकत नाहीं.

५ ) **संतती आणि विद्या स्थान** – पांच कोटी जपानें हें स्थान शुद्ध होतें. संतती हा विश्वप्रसाद आहे तर विद्या ही दैवी संपत्ती आहे. त्यावर साधकाचे स्वामित्व सिद्ध होते. प्रत्येक ज्ञानक्षेत्रांत प्रवेश होतो. योग्यायोग्य, चांगलें वाईट यांची सहजतया पारख होते. कोणत्याही ग्रंथाला स्पर्श करण्याबरोबर त्यांत काय सांगितलें आहे याचें संपूर्ण ज्ञान साधकाला प्राप्त होतें. गुप्त विद्या, गुप्त मंत्र यांची चांगली माहिती होते. त्याला लोकांच्या मनांत प्रवेश करतां येतो. लोकांच्या अंतःकरणांत चाललेल्या विविध विचारांच्या लहरी आत्मसात करतां येतात. या स्थानाच्या शुद्धतेनें मन निष्पंद होते.

या घरांत अत्यंत वाईट ग्रहदशा असतां विद्या आणि संतती यांना मनुष्य दुरावतो. ज्याला संतती होत नाहीं किंवा होऊन मृत होते अशा वेळीं या स्थानाच्या शुद्धतेच्या योगानें संतती होते. ती संतती सुविचारी निरोगी आणि दीर्घायुषीही होते. वडिलांच्या पवित्रतेचा आणि विद्येचा वारसा मुलांना आपोआप प्राप्त होतो आणि त्यांचें जन्माचें कल्याण होतें.

६) **रिपुस्थान**–मानवाला दोन तऱ्हेचे शत्रू असतात. एक बाहेरचे आणि दुसरे आंतील. किंबहुना एक शरिराचे आणि दुसरे

मनाचे असें म्हटल्यास ते वावगें होणार नाहीं. देहाला संसारी जगांत अनेक कारणानें अनेक शत्रु निर्माण होतात. त्यांत माणसें, पशु, पक्षी अथवा अन्य जीव सुद्धां असण्याची भरपूर शक्यता आहे. त्यांचा परिणाम देहावर आणि पर्यायानें आपल्या संसारी जीवनावर होतो. सहा कोटी जपानंतर या सर्वांपासून अभयता प्राप्त होते. दुसरे प्राणी आपल्याला मित्र मानूं लागतात. हा सर्व देहिक परिणाम आहे. मनांच्या स्थिरतेबरोबर षड्रिपूंचा नाश होतो. मनावर कोंणतेही परिणाम होत नाहींत अथवा होऊं लागल्यास तो परिणाम मनांतच जिरतो आणि पुन्हा मन निष्पंद होतें. अशा निष्पंद मनाचाच उपयोग साधकाला आपल्या साधनेंत चांगल्या प्रकारें होतो.

७) **जायास्थान** – सात कोटी जप पूर्ण झाला म्हणजे हें स्थान शुद्ध होतें. साधनेच्या दृष्टीनें हें स्थान अत्यंत महत्वाचें आहे. या स्थानाचे देखील दुहेरी फायदे आहेत. स्वतःच्या पत्नीचे आरोग्य या योगें चांगलें राखलें जातें. पत्नीच्या विचारांत अथवा आचारांत कोठें विकृती असेल किंवा तिच्या कृतीचा साधकाला आपल्या साधनेंत अडथळा होत असेल तर तो दूर होतो. मनुष्याची सर्व इंद्रियें संयमशील बनतात. ब्रह्मचर्याचा साधनेला जो फायदा आवश्यक असतो तो सर्वेच्या सर्व आपोआप मिळूं लागतो. घरांत ईश्वरत्वाचा सुगंध ओसंडू लागतो आणि साधनेला अधिक चांगला वेग येतो.

८) **मृत्युस्थान**-ह्या स्थानीं येतांना साधकास बराच त्रास पडतो. मागें झालेला जो जप आहे त्यायोगें सर्व शरीर चांगलें होतें. सर्व इंद्रियें संयमशील होतात. हें जरी खरें असले तरी या पुढें जपाला प्रारंभ केल्यावर साधकाला नकोत असें अनेक अडथळे येण्यास प्रारंभ होतो. निरनिराळ्या ठिकाणची विलोभनें एकत्र येऊन साधकावर एकदम

हल्ला करतात. त्यायोगें साधकाची वृत्ती अस्थिर होते. ही सर्व विलोभनें त्याला पुन्हा संसारी बनविण्याच्या खटाटोपांत असतात किंवा त्याच्या जवळचें पुण्य कशा तऱ्हेनें हिरावून घेतां येईल याचा प्रयत्न करतात. साधकाला कफल्लक करण्याकडे या सर्वांचा कल असतो. दोन नव्हे एका क्रमाक्रमाने एक एक विलोभन त्याच्यापुढें दत्त म्हणून उभें राहातें. साधकानें त्या विलोभनाला किंचितशी मूक संमत्ती जरी दाखविली तरीही विलोभन त्याला तेथून खेचून खाली आणतें. या विलोभनांचे प्रकार लक्षावधी आहेत. कोणते विलोभन केव्हां पुढे येईल आणि आपला कसा घात करील याची ग्वाही चांगल्या साधकाला सुद्धां देतां येणार नाहीं. पुराणांतरीचा दाखला ध्यानीं घेवून साधकाला याची किमया कळूं शकेल. विश्वामित्र हा महान् तपस्वी पुरुष होता. त्यानें आपल्या सर्व इंद्रियांना काबूत ठेविलें होते. परंतु त्यालाही वसंताच्या वातावरणाची आणि मेनकच्या शृंगारिक हावभावांची भुरळ पडली. त्याचा आपल्या इंद्रियांवरील संयम ढिला झाला. त्यानें आसुरी संपत्तीचा आश्रय केला. स्वतःचें हित त्याला पारखे झाले. आतां आपले कर्तव्य केवळ एकच अशा

**स्त्रिया गाइले आइकावें । स्त्रीरुप डोळां देखावें ।**
**सर्वेंद्रियें आलिंगावें । स्त्रियेतेचि ॥**

या ज्ञानेशांच्या उक्तीचे त्यांनें स्वागत केलें आणि मेनकेशी संसारी व्यवहार केले. या आचरणांत विश्वामित्राची पुण्यपुंजी किती संपली याची दाद त्यालाही लागली नाहीं. त्याच्या पुण्याईने डळमळलेला इंद्र पुन्हा स्थिर झाला. यावरून त्याच्या मिळविलेल्या पुण्याईची महती काय होती आणि त्यानंतर त्या पुण्याईची कशी दशा झाली याचा साधकांना चांगलाच परिचय आहे. अशी अनेक उदाहरणें आजही दिसतील इतका हा

विषय बोलका आहे. त्यामुळें या ठिकाणीं आल्याबरोबर साधकानें अतिशय सावधगिरी ठेवावी लागते. किंबहुना साधक अशा गिरीमध्यावर येतो कीं त्याठिकाणाहून त्याला पुढचा मार्गही दिसत असतो आणि अद्याप पावेतों आक्रमण केलेला मार्गही दिसत असतो. त्या ठिकाणच्या विलोभनांना साधकानें मान दिला कीं तो तेथून जो हादरतो तो पुनरपि अगदीं तळापर्यंत न थांबतां येतो. परंतु त्यानें या विलोभनांना कांहींही मान दिला नाहीं तर मात्र पुढची चढण चढण्यास तो समर्थ होतो. या ठिकाणचा साधकाचा निर्णय हा अतिशय महत्वाचा असतो. या ठिकाणीं अविद्या संपते. या स्थानाचें वर्णन ईशावास्य उपनिषदांत खालीलप्रमाणें केलें आहे.

**अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययामृतमश्नुते ।**

सांधक अविद्येनें मृत्यूला ओलांडतो आणि त्यानंतर जें ज्ञान प्राप्त होतें त्या विद्येनें त्याला अमृतत्व प्राप्त होतें. या अमृतत्त्वाकडे जाण्यासाठीं जो मार्ग आहे तो मार्ग या ठिकाणाहून स्पष्ट होतो. साधकाला विवेक-बुद्धी प्राप्त होते. ज्ञानदेवांच्या भाषेंत सांगायचे तर ही दशा कर्मसाम्य अवस्था आहे. या ठिकाणी साधकानें चांगला निर्णय घेतला तर त्याला गुरूकृपेचा लाभ होतो. अर्थात गुरुकृपेच्या लाभानंतर साधकाला प्रवाहानुरूप जाण्याचे कार्य राहातें. तें सहजतया होते. या स्थितींत आलेल्या साधकास सद्‌गुरुची आपोआप प्राप्ती होते. या दशेचें वर्णन ज्ञानेश्वरांच्या मुखांतून अक्षरांकित झालेल्या ज्ञानेश्वरीत अप्रतिम असें आहे.

**ऐसी कर्मसाम्य दशा । होय जेथ वीरेशा ॥**
**तेथ सद्गुरु आपैसा । भेटेचि गा ॥**

**मग आलिंगिला पूर्णिमा । उणीव सांडी चंद्रमा ।।**
**तैसं होय वीरोत्तमा । गुरुकृपा तया ।।**
**तेव्हां अबोधमात्र असे । तो तंव तया कृपा नासे ।।**
**तेथ रात्रीसवें जैसे । आंधारें जाय ।।**
**तियेपरतें कांहीं । निपजणें येथ नाहीं ।।**
**म्हणौनि म्हणिपे पाही । परमासिद्धि ते ।। ज्ञा. १८**

ही साधकाची महनीय दशा आहे. या ठिकाणीं येण्याची तयारी सातकोटी जप झाला की होते. आठ कोटी जप झाला असतां या दशेतून तो पार होतो आणि मगच त्याचा भाग्यकाळ प्रारंभ होतो.

९ ) **भाग्यस्थान** – या दशेंत प्रारंभ करतांनाच साधकाच्या भाग्य-रेखा उमलू लागतात. नऊ कोटी जप पूर्ण झाला म्हणजे त्याला आवश्यक वाटणाऱ्या सर्व गोष्टी त्याच्या सानिध्यांत आपोआप येतात. विलोभनें या ठिकाणीं दूर झाल्यानें पुढचा परमार्थ पथ सुलभ होऊ लागतो.

१०) **पितृस्थान किंवा कर्मस्थान**–या स्थानाच्या शुद्धतेनें पित्याची सर्व दुःखें दूर होतात. साधकानें केलेली सर्व कर्मे बोलकी आणि परिणत होतात. कर्मेंद्रियांना विशिष्ट तऱ्हेची नजर प्राप्त होते. ज्ञानदेवांच्या शब्दांत सांगायचें तर–

**कर्माचे डोळे ज्ञान । ते निर्दोष होवावे ।**

ही दशा या ठिकाणी प्राप्त होते. योगदशेनें जें कांहीं साधतां येते तें सर्व याठिकाणीं आल्यावर साध्य होते. कुण्डलिनी केवळ योगानेच

साध्य होते असे नाहीं तर अशा तऱ्हेच्या मंत्र जपानें नऊ कोटीची मजल गांठली कीं ती कुण्डलिनी आपोआप जागृत होते. अर्थात कुण्डलिनी जागृत झाली कीं साधकाच्या इंद्रियांना कसलाही अडथळा निर्माण होत नाहीं. त्यांची नजर कितीही दूरचें पाहूं शकते किंवा त्या साधकाचे कान कितीही दूरचे ऐकूं शकतात.

याठिकाणीं अशा तऱ्हेच्या अनेक प्रकारच्या सिद्धि साधकाच्या पुढें हात जोडून उभ्या असतात. परंतु साधकानें त्या सिद्धींचा उपयोग केल्यास मात्र साधकाला तें बाधक ठरतें. आठव्या स्थानाप्रमाणेंच हें स्थान देखील परमार्थ मार्गावरील एक धोक्याचा लाल दिवा आहे. याच्याकडे दुर्लक्ष करून साधकाला चालणार नाहीं.

११) **आयस्थान**—या ठिकाणीं साधक येताच त्यांचे सर्व पूर्व-संचित पाप नाहींसें होते. ईश्वर दर्शन अनेकविध रूपानें होण्यास प्रारंभ होतो.

१२) **व्ययस्थान**—संसारी जीवनांतील सर्व लक्ष निघून तें ईश्वरमय बनतें. संसारांत राहून संसार त्यांना बाधत नाहींसा होतो. माया, मोह नाहींसा होऊन सर्वाभूती असलेल्या परमेश्वराचा अनुभव येवूं लागतो.

या प्रमाणें सर्व बारा स्थानें शुद्ध होतांच त्या साधकाला साक्षात् ईशदर्शन होतें. त्यांतच तो विलीन होतो. सर्वज्ञानी मुक्त आणि शुद्ध अशी या साधकाची स्थिती होते. या परिस्थितींत या साध-काचे म्हणून स्वतंत्र असे कांहीही राहात नाहीं तो ईश्वरमय होतो. उन्मनी किंवा तुर्या नांवाची जी महत्तम अवस्था आहे ती याच ठिकाणीं प्राप्त होते.

मंत्राचें हें जे वैभव आहे ते विशिष्ट अधिकार असल्याशिवाय साधकाला प्राप्त होत नाहीं किंवा त्यासाठीं जी पथ्यें पाळावी लागतात त्याचे पालन केले तरच त्यांची जी फळें सांगितली आहेत ती प्राप्त होतात. स्तोत्र अगर कवचें यांच्या मानानें मंत्राचें वैभव मोठें आहे यांत शंका नाहीं. परंतु स्तोत्रांची महती सुद्धां कांही कमी नाहीं. विस्तार पावलेला एखादा मंत्र म्हणजे स्तोत्र असें म्हटलें म्हणजे स्तोत्र याची स्वतंत्र व्याख्या करण्याची आवश्यकता नाहीं. मंत्र हा अत्यंत सूक्ष्म आहे. त्या मानाने विचार करतां स्तोत्र किंवा कवचें स्थूल आहेत. अर्थात त्यांचे परिणाम देखील स्थूल असल्यास नवल नाहीं. अर्थात अल्पकाळी केलेल्या मंत्रोपासनाचे जें फळ आहे तसेच फल स्तोत्राच्या अनेक दिवसांच्या पठणानें लाभते. प्रत्येक स्तोत्रांत कोणत्यातरी मंत्राचे बीज निश्चितपणें असते. ज्यांना मंत्र म्हणता येत नाहीत, म्हणण्याचा अधिकार नाहीं अथवा ह्या मंत्राबाबतचे पथ्य सांभाळता येणार नाहीं त्यांनीं स्तोत्राचा अवलंब करावा हें चांगलें. अशा तऱ्हेची अनेक स्तोत्रे अनेकांच्या पठणांत असतात. याच स्तोत्रां- पैकी काहींचा विचार या ठिकाणीं करावयाचा आहे. प्रत्येक स्तोत्राचा विचार करतांना त्याचा परिसर, शब्दार्थ, भावार्थ, फल, उपासनाकाल आणि पद्धती या सर्वांचा विचार करणें आवश्यक ठरेल. कारण या सर्व गोष्टींचा विचार केल्याविना कोणत्याही स्तोत्राची महनीयता प्रत्ययाला येत नाहीं. भारतीयांच्या नित्यक्रमांत अनेक लहानमोठ्या स्तोत्रांचा अंतर्भाव करण्यांत आलेला आहे. पूर्वीच्या लोकांनीं ही सर्व स्तोत्रें लिहि- तांना त्यांचे प्रत्यय घेतलेले होते. त्याच क्रमानें, परंपरेनें तीं आजपर्यंत चालत आलेली आहेत. परंतु त्यांचें महत्त्व आणि उपासना पद्धती यांचा विसर मात्र काळाच्या ओघांत पडला. बाबा हें स्तोत्र म्हणत होते म्हणून मुलगा म्हणतो एवढेंच पाळलें जातें. यांशिवाय त्या स्तोत्रांच्या परिसरचा

विचार कधींच केला जात नाहीं. आज अशी अनेक घराणी भारतांत आहेत कीं ज्यांच्या घरीं कोणत्या ना कोणत्या तरी स्तोत्राची उपासना सदैव चालू असते. कित्येक पिढ्यांत त्यांत खण्ड पडलेला नाहीं. परंतु त्या स्तोत्राच्या पठनपद्धतींत आणि त्याच्या बरोबरच्या विविधाचारांत मात्र फरक पडत गेलेले आहेत. लहानपणापासून हे स्तोत्र म्हटले म्हणजे चांगले होते. नेहमी ते म्हणावे इतकाच उपदेश मोठ्यानी लहानांना करावयाचा आणि लहानांनी तो तंतोतंत अमलांत आणावयाचा. त्या बाबतीत शंका म्हणून विचारण्याचा कोणी प्रयत्न केल्यास त्याच्या शंकेचे सविस्तर उत्तर देण्याऐवजी बाबा-वाक्यम् प्रमाणम् । हें शस्त्र वापरून त्या शंकेचे निरसन केलें जात असे. अर्थात हीच परंपरा आज चालू आहे. परंतु डोळसपणानें या गोष्टी समजावून घेण्याचा प्रयत्न केला आाण त्याचा स्वतः आचरण करून प्रत्यय घेतला तर तें स्वतःला जसे मार्गदर्शक ठरेल त्याप्रमाणेंच ते दुसऱ्याला देखील मार्गदर्शक ठरेल. परंतु या अर्थानें त्याच्याकडे पाहाण्याचें धाडस करणारें लोक मुळांतच थोडे आणि जे कोणी कांहीं करतात त्यांतील धीरानें न कंटाळतां आपले-पणानें करणारे तर त्याहीपेक्षां कमी. उलट स्वतःच्या चुकीमुळें ज्या वेळीं प्रत्यय येत नाहींत त्या वेळीं हें सर्व झूट आहे असा डंका पिटून कांहीं लोक मोकळे होतात. पण त्यांना जर विचारलें कीं आपण या बाबतींत काय प्रयत्न केलेत कीं ज्यामुळें तुम्ही या निर्णयाला आलांत? तर त्याचें उत्तर ठरलेलें असतें. मी फारसे प्रयत्न जरी केले नसले तरी पण हें शास्त्र सर्व झूट आहे. ज्यांना त्याचें फळ पाहाण्याची मनीषा नाहीं, उतावळेपणाने वागून सर्व कांही झूट आहे असें म्हणण्याची ज्यांना संवय लागली आहे, त्यांनी एक वेळ आपल्या स्वतःचा स्वतःच्या प्रयत्नांचा विचार करावा आणि मगच ठरवावें कीं खरें काय नि खोटे काय तें. दुसऱ्याच्या पायाजवळ काय आहे तें चटकन दिसतें पण

स्वतःच्या पावलांशी काय आहे त्याचा विसर पडतो अशी आपली भारतीयांची आजची स्थिति आहे. या स्थितीलाही आपणच जबाबदार आहोंत. जें पूर्वी होतें परंतु प्रस्तुतच्या काळांत जें विसरलें आहे तें पुन्हा स्मृतिबद्ध करण्याचा प्रयत्न करणें जरूरीचे आहे.

—: समाप्त :—